# परलोकाच्या छायेत

लेखक

**मुहम्मद फारुक खान**

अनुवादक

**मुबारक हुसेन मनियार**

# अनुक्रमणिका

# दोन शब्द

आम्ही सर्वजण हे पाहतो की मनुष्य जगात येतो, परंतु तो जगात जगासाठी येतो काय? कदापि नाही. जर तो जगासाठी आला असता तर मग तो येथून परत गेला नसता. त्याचे ठिकाण तर अन्यत्र कुठेतरी आहे. मानवाला आपले ठिकाण प्राप्त करावयाचे आहे. त्याला आपल्या खऱ्या घरात प्रवेश करावयाचा आहे. त्या घरात की ज्याला सोडण्याची त्याला गरज भासू नये. जे त्याच्या अभिलाषेचे जग असावे. जेथे त्याचे संपूर्ण संरक्षण व्हावे. जे त्याचे इच्छित जग असावे. ज्यात कोणत्याही प्रकारची कसलीही उणीव राहू नये. जेथे अडथळे नसावेत. अज्ञान असू नये. जे मानवव्यक्तित्वाचे खऱ्या अर्थाने परिवेश असावे. तेच इस्लामचे गंतव्य स्थान आहे. तेथेच त्याला पोचावयाचे आहे. त्यालाच धर्माने 'परलोक' असे नाव दिले आहे. परलोकाचे जग सर्वोत्तम आहे. परंतु परलोकात उत्तम व उच्चतम स्थान त्याच लोकांना मिळू शकेल जे त्याच्यायोग्य असतील; आणि असे असावयास सुद्धा पाहिजे. जर प्रत्येक पात्र व अपात्र माणसाला तेथे समान रूपाने उच्च स्थान दिले गेले तर ही गोष्ट त्या लोकच्या (परलोक) प्रतिष्ठेला साजेशी ठरणार नाही.

इहलोक (जग) तर निवडीसाठी आहे की कोण त्या शाश्वत आनंदाचा परलोकाचा अधिकारी आहे आणि कोणाला त्याचा अधिकार नाही. ही निवड एका तऱ्हेने मानवाने स्वत: करावयाची आहे. निवडीचे पूर्ण स्वातंत्र्य मानवालाच दिले आहे. खरी निवड तर तीच होय जी मनुष्य स्वत: करतो. एखाद्या गोड फळाचा आनंद लुटण्यासाठी आवश्यक आहे की त्याची चव घेतली जावी. चव घेतल्याशिवाय त्याचा आनंद घेणे शक्य नाही. फळ चाखल्याशिवाय फळाचा आनंद कसा लुटता येईल? असेही शक्य नाही की चव एखाद्या अन्य व्यक्तीने घ्यावी व आनंद मात्र लुटावा दुसऱ्यानेच. परम लोकात स्थान प्राप्त करणे किती आनंदाची गोष्ट आहे याचे वर्णन शब्दांत करणे शक्य नाही. त्यात दाखल होण्याची क्रिया फळ चाखण्यासारखी होय. आनंद लुटण्यासारखी होय. त्यात मानव केवळ शरीरानेच प्रवेश करू शकत नाही, त्यात पायानेच दाखल होणे शक्य नाही तर आपल्या संपूर्ण व्यक्तित्वाद्वारे प्रवेश करावयाचा असतो. तेथे तर आनंदाद्वारे दाखल व्हावयाचे असते.

वर्तमान जीवन तर अशासाठीच आहे आणि वर्तमान लोकात मनुष्याचे अस्तित्व अशासाठीच आहे की त्याने त्या लोकात (परलोकात) प्रवेश प्राप्त करण्याचा मार्ग अवलंबावा. मग हे आमच्यावर अवलंबून आहे की आम्ही त्या मार्गाचा अवलंब करतो की याच वर्तमान लोकाला सर्वकाही समजून जीवन जगतो. वर्तमान जीवन वस्तुत: एक

क्रिया आहे, परलोक या क्रियेचा प्रभाव अथवा परिणाम आहे. वर्तमान जीवन फळ कापून तोंडात घालण्यासारखे आहे तर याची चव पारलौकिक जीवन होय. ज्याने फळच खाल्ले नाही त्याला चव कशी कळू शकते? अशाचप्रकारे ज्याने कडू फळ खाल्ले त्याला गोडी कशी मिळेल? जो चांगले बी पेरील त्यालाच चांगले पीक मिळेल. काटे पेरणाऱ्याच्या हिश्श्यात तर काटेच येतील.

सदर पुस्तकात जीवनाच्या याच मूलभूत पैलूवर विचार केला गेला आहे. या बाबतीत ज्या शंका निर्माण केल्या जातात त्यांचे निवारण करण्याचा प्रयत्न केला गेला आहे. ईश्वराजवळ आमची प्रार्थना आहे की आमचा हा प्रयत्न सफल व्हावा आणि जीवनाच्या वास्तविक उद्देशाला समजण्यात हे पुस्तक सहाय्यक सिद्ध व्हावे.

विनम्र

**मुहम्मद फारुक खान**

दिल्ली, दि. १० मार्च १९७६

*अध्याय - १*

# आहे कोणी जो विचार करील!

## कोडे जीवनाचे!

मानवाला जीवन प्राप्त झाले आहे. त्याला या जीवनाची अनुभूतिसुद्धा होते, परंतु असले लोक कमी आहेत ज्यांनी हे जीवन गंभीरतापूर्वक ग्रहण केले आहे. साधारणपणे मनुष्य एक समतल व वरील स्तरावर जगण्यासाठी व समतल मार्गावर पुढे जाण्यासाठी प्रयत्नशील असतो. त्याच्या जीवनात सखोलपणाच्या मार्गाचा लोपच होत असल्याचे दिसून येते. असे का आहे? याची काही ज्ञात-अज्ञात कारणे आहेत.

मनुष्य ज्या वातावरणात व परिवेशात जीवन जगतो त्यात प्रचलित क्रियाकलाप, भावना वगैरेंची त्याला अशी काही सवय होते की सामान्य मार्गावर त्याचे पाय आपोआप उठू लागतात आणि त्याला याची संधीच मिळतनाही की त्याने जीवनासंबंधीच्या गहन व मौलिक प्रश्नावर विचार करू शकावे. अशा स्थितीत मानव हे धैर्य हरवून बसतो की त्याने गंभीरतापूर्वक प्राप्त जीवन व जीवनाशी निगडीत मौलिक प्रश्नांवर विचार करावा.

जीवनाचा अर्थ काय आहे? आम्ही कोठून आलो आहोत व कोठे जाणार आहोत? जीवन व मृत्यु दरम्यानच्या या संक्षिप्त अवधीत आम्हाला काय करावयाचे आहे व काय बनले पाहिजे? जीवन शापाचे की वरदानाचे फळ आहे? संयोग आहे की जबाबदारी आणि कर्तव्य? शोध आहे अथवा परिप्राप्ती? हे जीवन स्वत: परिपूर्ण आहे की अपूर्ण? भूमिका आहे की अद्याप सर्व काही? या जीवनाचा कोणी दाता आहे की नाही? या प्रश्नांच्या उत्तराचा कोठे लोप झाला आहे? ते कोठे सापडेल? कोण देईल? जर कोण जीवनदाता असेल तर त्याने या प्रश्नांची उत्तरे दिली आहेत की जीवन देऊन त्याला मौन धारण करणेच योग्य वाटते?

या प्रश्नांचा मानवी जीवनाशी इतका घनिष्ठ संबंध आहे की यांना जीवनापासून वेगळे करणे शक्य नाही. जीवनाचा उदय या प्रश्नासमवेतच होत असतो. हेच कारण आहे की मानव या प्रश्नांचा सदैव विचार करीत आला आहे.

जीवनासंबंधीच्या या प्रश्नांचे विचार व चिंतन केवळ एका दार्शनिक अभिरुचिची समस्या नव्हे तर याचा मानवाच्या जिवंत इच्छा, कामना व गरजांशी गहन संबंध आहे. मानव प्रत्येक गोष्टीची उपेक्षा करू शकतो. परंतु त्याने आपल्या मनाचे काय करावे?

उदाहरणार्थ, मानवी मनाची ही एक प्रबळ इच्छा आहे की त्याच्या जीवनाचा अंत

होऊ नये. तो एका अशा वसंत ऋतूचे स्वप्न पाहतो की ज्याने समाप्त होऊ नये. मनुष्य एकदा जगात येऊन कायमस्वरुपी मातीत लुप्त होऊ इच्छित नाही. म्हणूनच तो मृत्युच्या पलीकडे डोकावून पाहू इच्छितो आणि त्यासंबंधी विभिन्न कल्पना करतो.

*इस पार प्रिये तुम हो मधु है। उस पार न जाने क्या होगा।*

अर्थात- हे प्रिये! अलीकडे तू आहेस आणि मदिरा आहे, कल्पना नाही की पलीकडे काय असेल!

पृथ्वीतलावर मानवाचा मृत्यु ज्याप्रकारे होतो ते पाहण्यात अत्यंत भयावह व दुःखद आहे. जीवनाच्या आनंदात-प्रमोदात तो काही अशाप्रकारे मग्न असतो की त्याला असा विचार करण्यास वेळ मिळत नाही की हे जीवन व त्यातील आनंद कोठून आले? आणि हे कोठपर्यंत टिकतील? परंतु दुःखाची मात्र गोष्ट वेगळीच असते. दुःख व कष्टांत त्याला असा विचार करणे भाग पडते की अरेरे! हे काय घडले? जो आनंद मिळाला होता तो का हिरावून घेतला गेला? हा आनंद आमच्यापासून कायमचा वेगळा झाला काय? तो गेला तरी कोठे? मग तो परत आम्हाला मिळेल की नाही? मानवाच्या या दुर्बलतेमुळे तो साधारणपणे सृष्टी व खुद्द आपल्या अस्तित्वस्रोताविषयी फारच कमी विचार करतो. तो अशी चिंता करीत नाही की आम्हाला हे जीवन कसे, कोठून व का मिळाले आहे? परंतु जेव्हा आपल्या डोळ्यांदेखत आपल्या प्रियजनांना विवशतेने मरताना पाहतो, तेव्हा मृत्युची कटुता त्याच्या डोळ्यावरील झापड व त्याची बेहोशीची समाधी भंग करते व कठोरतम हृदयाच्या व्यक्तीलासुद्धा हे हृदय विदारक दृश्य हेलावून सोडते आणि मग मनाच्या शांतीसाठी त्यालासुद्धा भौतिक वस्तु सोडून एखाद्या अन्य गोष्टीच्या आवश्यकतेचा भास होतो.

मृत्यु व दुःखप्रसंगी कित्येक अन्य गंभीर गोष्टींकडेसुद्धा आमचे लक्ष जाते. हे स्वाभाविक आहे. साधारणपणे आमच्या ज्ञानशक्तीवर जडत्वाचे पडदे पडतात आणि आम्ही जीवनाच्या गंभीर प्रश्नांवर व गहन विषयाकडे लक्षच देत नाही. दुःख जडत्वाचे पडदे फाडते. हेच कारण आहे की आम्ही जीवनाला गांभीर्याने दुःख व वेदनेद्वारेच पाहू शकतो, सुख व शांतीच्या माध्यमाने नव्हे. ठोकर बसल्यावर संवेदनशील मनुष्यविचार करतो की जगातील सर्व सुखे व सोयी असूनदेखील मानवाच्या कित्येक इच्छा व मनीषा पूर्ण होत नाहीत. त्याच्या कित्येक कामना व अभिलाषा तर इतक्या उत्तम व आकर्षक असतात की मानव-स्वभाव तर त्याची उपेक्षा करू शकत नाही. त्या पूर्ण न होणे अत्यंत दुःखदायी वाटते. आपल्या प्रियजनांचा आपल्यापासून वियोग होणे व कायमस्वरूपी त्यांचे दूर जाणे एक अशी हृदयविदारक घटना आहे जी आमचे धैर्य नष्ट करते. त्यांच्याकडून

कायमचे निराश होणे मनुष्याला अशाप्रकारे अपंग करून टाकते की तो मनातल्या मनात तडफडून राहतो. त्याचे आंतर्मन हे स्वीकारण्यास तयार नसते की जाणारी व्यक्ती त्याच्यापासून कायमची दूर जात आहे. आपल्या डोळ्यांदेखत सर्वकाही घडत असतानादेखील त्यांची अचेतन रूपात पुनर्मिलनाची आशा टिकून राहते.

कित्येक लोक असे आढळतात की जे सत्कर्म व कल्याणकारी कार्यात निमग्न राहतात. त्यांचे बलिदान व त्याग महान असते, परंतु त्यांच्या हिश्श्यात दु:ख व अनादराशिवाय काहीही येत नाही. या उलट कित्येक दुर्जन आयुष्यभर आपल्या दुष्ट वृत्तीने लोकांना सदैव त्रास देतात व त्यांचा तळतळाट घेत राहतात. त्यांच्यामुळे मानवसमाजात भयंकर दहशत व बिघाड उत्पन्न होतो. ते दुष्टपणाचे असे बीज पेरून जातात की शतकानुशतके लोकांना त्या विषारी फळांची चव घेत राहावे लागते. त्यांच्या अत्याचार व अनाचाराने जनता आक्रांत होते व त्यांचा हृदयद्रावक आवाज दीर्घकाळापर्यंत प्रतिध्वनित होत राहतो; परंतु ते मात्र असे असतात की ते सुख व आनंदाचे जीवन जगत असतात. अशा वेळी एक विचारवंत मनुष्य असा विचार करू लागतो की तो हे काय पाहत आहे! मग काय पुण्यात्मा लोकांना त्याच्या सेवेचे कोणतेही फळ मिळणार नाही? काय जगात गुणग्राहकतेची भावना केवळ एक फसवणूक आहे? काय पाप व पुण्य, सत्कर्म व दुष्कर्म, सेवा व अत्याचारांत मुळापासूनच काही तात्त्विक व प्रभावशाली अंतर नाही? पापाने पापी माणसाचा पाठलाग करू शकावे, पाप काही अशी गोष्ट नाही काय? पुण्यात इतकी अपुण्यता आहे काय की त्याने आपल्या कर्त्याला मुळापासूनच विसरून संतुष्ट व्हावे?

याशिवाय विचारवंत व्यक्तीच्या मनात असासुद्धा प्रश्न उत्पन्न होतोकी हे जग सदैव चालत राहील का? मनुष्य पाहतो की येथे एकीकडे मनुष्य मरतो तर दुसरीकडे माणसांचा जन्म घेण्याचा क्रम सुरूच आहे. एक जातो तर दुसरा त्याचे स्थान ग्रहण करतो. हीच स्थिती पशु-पक्षी व वृक्ष वगैरेंचीसुद्धा आहे. त्यांचादेखील वंश चालूच आहे. ज्यामुळे जग निर्जन व ओसाड लोक बनत नाही व लोकांना याचा आभास होत नाही की त्यांच्याकडून काही हिरावून घेतले गेले आहे आणि जगाचा जगपणा या जगातून निघून गेला आहे. त्याला जग संपन्न असल्याचेच दिसते. येथील क्रियाकलाप व ये-जामध्ये काहीही फरक पडत नाही. परंतु हा क्रम असाच चालत राहील काय? लोक अशाप्रकारेच मरत-जगत राहतील काय? हा क्रम एखाद्या सीमेपर्यंत जाऊन कधी संपेल की नाही? वायु, जल, प्रकाश, ऊर्जेसारख्या भौतिक शक्ती कधी क्षीण अथवा समाप्त होऊ शकणार नाहीत काय? ब्रह्मांडाची व्यवस्था अशीच टिकून राहील की इथेही काही निश्चित वय अथवा मुदत आहे? जर ब्रह्मांडाचे काही निश्चित वय आहे जे पूर्ण केल्यानंतर वर्तमान

जग अथवा लोक आणि याची व्यवस्था शिल्लक उरणार नाही तर मग यानंतर केवळ स्मशान स्तब्धता उरेल काय? जगाची क्रियाशील ऊर्जा शून्यात विलीन होईल काय? आणि एखाद्या नव्या जीवन किंवा नव्या जगाचा शुभारंभ होणार नाही काय? आणि कायमस्वरूपी हा मनोरम खेळ संपुष्टात येईल? आणि मग कोणीही असा असणार नाही की ज्याला माहीत असावे की कधी काळी एखादा सूर्य उगवला होता अथवा एखादी पृथ्वी अशी होती की जी आपल्यासमवेत जीवनाच्या कित्येक मनोरम गोष्टी, राग-विराग व रुदन आणि हास्य आपल्या उदरात घेऊन कायमस्वरूपी लुप्त झाली.

अथवा असे की या जगाचा अंत झाल्यानंतर एखादे अन्य उन्नत किंवा कमी दर्जाचे जग अस्तित्वात येईल? आणि जर अस्तित्वात येणार असेल तर वर्तमान जगाच्या (लोक) प्राण्यांना त्यात प्रवेश मिळू शकेल काय? की ते जग दुसऱ्याच लोकांचे निवास राहील? जर या जगातील लोकांना त्या जगात प्रवेश मिळणार असेल तर त्यांचे ते जीवन वर्तमान जीवनाचे कोणत्याही प्रकारे ऋणी राहील किंवा नाही? दुसऱ्या शब्दांत, त्या जीवनाचे सुंदर-असुंदर असण्यात आमचे चांगले वाईट विचार, भाव, कर्म वगैरेंचा हात असतो किंवा नाही?

हे आणि अशाप्रकारचे कित्येक महत्त्वपूर्ण प्रश्न असे आहेत जे मानवमनात उत्पन्न होतात, मग ते एक तर असेच भटकत राहतात किंवा त्यांचे समाधान होते अथवा मनुष्याला त्यांची संतोषजनक उत्तरे न मिळाल्यामुळे मनुष्य निराश होतो व त्यांची मनोवृत्ती अशी होते जशी एखाद्या निराशाग्रस्त व्यक्तीची होते. निराशाजनक मनोवृत्तीमुळे जगात जे काही व जसे काही आहे त्याच्याशी तो समझोता करतो; आणि याच वर्तमान जीवन व जगाला प्रथम व अंतिम असल्याचे समजून बसतो आणि याच्यानुसारच त्याचे जीवन आकार-प्रकार ग्रहण करते. तो येथील सुख-दुःखांना अंतिम सुख-दुःख समजून बसतो. येथीलच सुप्रसिद्धी व यशाला यश मानतो व येथील अपयशाव्यतिरिक्त त्याच्या दृष्टीने कुठेही अन्यत्र कोणतेही अपयशाचे स्थान नसते.

भविष्याकडून निराश झाल्यानंतरसुद्धा मनुष्याच्या प्रश्नांचा शेवट होत नाही. हे मान्य केल्यानंतर व समजल्यानंतर की पुढे काहीही नाही, तरीसुद्धा हा प्रश्न उरतोच व आपल्या उत्तराची मागणी करतो की सद्‌भावना व सहानुभूती, दया, सत्कर्म वगैरे शून्यात लुप्त होणाऱ्या गोष्टी वाटतात. त्या लोकाची (जगाची) गोष्ट काही वेगळी असेल काय? ही भिन्नता वर्तमान लोकाचे विरोधात्मक रूप न राहता विकासात्मक असेल काय? आता आम्ही उपरोक्त विषयाला धरून काही विचारपूर्वक चर्चा करू जेणेकरून जे सत्य आहे ते ग्राह्य होऊ शकावे व असत्य हे असत्य असल्याचे स्पष्ट व्हावे. यासंबंधी सर्वप्रथम

आम्हाला हे पाहिले पाहिजे की जीवनाचा स्रोत कोठे आहे? हे जग आणि यात आढळणारे प्राणी व वनस्पतींना नानाप्रकारे सुसज्जित करणारी शक्ती व मन कोणते आहे? सारांश असे की मनुष्यासाठी हा प्रश्न काही कमी गंभीर नाही की जरी वर्तमान जीवनाशिवाय त्याचे कोणतेही भविष्य नसले तरीसुद्धा आज त्याने कोठे उभे राहावे? त्याला एखादे शाश्वत व चिरस्थायी भविष्य जरी नसले की ज्यामुळे त्याची व्याख्या करण्याच्या भारापासून त्याने मुक्त व्हावे तरीसुद्धा वर्तमान जी एक वास्तविकता आहे त्यापासून तो कसा पिच्छा सोडवू शकतो? वर्तमानची तर व्याख्या त्याला करावीच लागेल. याची व्याख्या केल्याशिवाय तो स्वत:ला कसा समाधानी करू शकेल? याच कारणास्तव जेव्हा डार्विनने उत्क्रांतीवादाचा सिद्धान्त मांडला तेव्हा त्याला फार मोठे महत्त्व प्राप्त झाले, कारण त्याचा सिद्धान्त म्हणजे जग व जीवनाची व्याख्या होती, ज्यात जीवनाच्या प्रश्नाची सोडवणूक अथवा उकल असल्याचा दावा केला गेला होता. म्हणून कळत अथवा न कळतपणे डार्विनच्या कार्याशी लोकांचा भावनात्मक संबंध असल्याचे आढळते. जरी डार्विनच्या सिद्धान्तात त्रुटी होत्या, तरीसुद्धा प्रारंभी त्यांच्याकडे फार दुर्लक्ष केले गेले. त्याला कारण असे की हा मानवी स्वभाव आहे की सापडलेला धातूचा तुकडा की ज्याला सोने म्हणून त्याने उचलले होते तो तुकडा पितळी ठरावा असे तो कदापि इच्छिणार नाही. हेच कारण आहे की डार्विनचा सिद्धान्त अथवा त्याच्या परिकल्पनेची पुष्टी करण्यासाठी मानवाने खूप प्रयत्न केला आणि कित्येक शास्त्रज्ञांनी याकरिता आपल्या बहुमूल्य वेळ आणि शक्तीची आहुती दिली, आणि आजसुद्धा यासंबंधी अनेक प्रयत्न व संशोधनाचा क्रम सुरूच आहे.

## परलोकाची कल्पना

इस्लाम एकप्रकारे त्या मौलिक प्रश्नांचे सुस्पष्ट उत्तर आहे जे जीवनाच्या संबंधाने निर्माण होतात की ज्यांचा उल्लेख आम्ही वर केला आहे. जीवनासंबंधीच्या मौलिक प्रश्नांचे अत्यंत आशाजनक उत्तर म्हणून इस्लाम आमच्यासमोर येतो. म्हणून तो आमच्या उपेक्षेचे नव्हे तर तो आमच्या मनन, चिंतन आणि अनुभूतीचा विषय बनतो. इस्लामी शिकवणीनुसार हे जग एका चेतनसत्तेची रचना आहे. ही रचना व्यर्थच केली गेली नाही तर याच्या पाठीमागे एक महान उद्देश कार्यरत आहे. याचे एक निश्चित लक्ष आहे की ज्याच्या पूर्तीसाठी जग प्रयत्नशील व कार्यमग्न आहे. जग तीव्र गतीने आपल्या उद्दिष्टाकडे सरसावत आहे. कोणीही त्याला ती अवस्था प्राप्त करण्यापासून रोखू शकत नाही की ज्याच्यासाठी तो गतिमान आहे. जगाच्या स्वभावात दडलेल्या मूळ प्रयोजनात परिवर्तन आणणे मानवाच्या अधिकारकक्षेच्या बाहेरील गोष्ट आहे.

इस्लाम सांगतो की ज्याअर्थी जग ही एक रचना आहे त्याअर्थी त्याचा आरंभही

आहे आणि ते उद्देशयुक्त असल्यामुळे या जगात एक महान परिवर्तनसुद्धा येणार आहे. त्या परिवर्तनाला आम्ही हवे तर चरम विकास म्हणून नाव द्यावे अथवा त्याला निर्माणात्मक सृजनाच्या उपाधीने विभूषित करावे; परंतु ज्याप्रकारे प्रत्येक महान निर्माणकार्यापूर्वी विध्वंस होणे आवश्यक असते, त्याचप्रकारे त्या विकसित व परिपूर्ण जगाची निर्मिती होण्यापूर्वी वर्तमान जगांचे पतन व विनाश अनिवार्य आहे. एक प्रलयकारी घटना अवश्य घडेल ज्याच्या परिणामस्वरूप वर्तमान विश्वाची व्यवस्था छिन्न-विछिन्न होईल. त्यानंतर नवसृजनाची वेळ येईल की जेव्हा एक असले जग आमच्यासमोर असेल जे वर्तमान जगापेक्षा कित्येक पैलूने भिन्न असेल. वर्तमान लोकात ज्या उणिवा व त्रुटी आढळतात त्या त्यात उरणार नाहीत. ती विकास व सृजनाची चरम् व परम् स्थिती असेल. ते जग पाहून प्रत्येक व्यक्तीच्या लक्षात येईल की हे ते जग आहे जे जरी आमच्या दृष्टीपासून अदृश्य होते तरी पूर्वीचे जग (लोक) याच जगाकडे अग्रेसर होते आणि त्याचा प्रत्येक संकेत याजगाकडेच होता.येथपर्यंत पोहचणे व पोहचविणेच त्याचे मुख्य ध्येय होते.

ज्याप्रमाणे समुद्र पाहिल्यानंतर त्या जल व आर्द्रतेचे रहस्य उघड होते जे नद्या, तलाव, झाडे-झुडपांत व मानवशरीरात विद्यमान असते व प्रवाहित होते. त्याचप्रमाणे ते लोक (जग) समोर आल्यावर एकीकडे आम्हाला वर्तमान जगाच्या उगम व आधारासंबंधी माहिती मिळेल व दुसरीकडे आम्हाला जगाच्या मूळ उद्देश व अभिप्रायाचे तात्त्विक ज्ञानसुद्धा क्रियात्मक रूपात होईल. मनातील सर्व शंका दूर होतील. आमची हल्लीची असमर्थता सामर्थ्यात परिवर्तीत होईल. ज्या गोष्टी आज दृष्टीआड आहेत त्या आम्हाला प्रत्यक्षपणे दिसतील. जे झाले पाहिजेतेच तेथे होंईल व जे अनिष्ट आहे त्याचा अविर्भाव तेथे शक्य होणार नाही.

उदाहरणार्थ, आज भौतिक वस्तूच सामान्यपणे आकर्षक दिसतात. सूक्ष्म व अदैहिक वस्तूंची अवहेलना केली जाते. येथे शरीराचे मूल्य तर लक्षात येते, परंतु आत्मा व प्रेम अदृश्यच राहतात.

## सावधगिरीची आवश्यकता

वर जे काही सांगितले गेले आहे त्यावरून असे स्पष्ट होते की पवित्र कुरआनने जग व मानवजीवनाच्या परिणामासंबंधी जी सूचना दिली आहे ती काय आहे? उपरोक्त विवेचनावरून ही गोष्ट उघडपणे समोर येते की या जगाचे व वर्तमान जीवनाचे काय होणार आहे. पवित्र कुरआनने स्पष्ट शब्दांत म्हटले आहे की जग व मानव शून्य व सर्वथा लोपकडे नव्हे तर एका विकसित व परिपूर्ण लोक (जग) आणि जीवनाकडे अग्रसर आहे.

मानवाची दशा अत्यंत नाजुक व गंभीरआहे. ते अशासाठीकी त्याचे पारलौकिक

जीवन तसेच असेल जसे त्याने बनविण्याचा प्रयत्न केला असेल. वर्तमान जीवन वास्तविकतेच्या दृष्टीने एक प्रयत्न व प्रयास आहे, त्यानुसार मानवाचे भावी व सार्वकालिक जीवन संगठित होईल व त्याचे सृजन होईल. लौकिक जीवनात मिळणारे सुख व लाभ आणि सवलती वास्तविकत: गौण व नगण्य आहेत.म्हणून सत्य काय आहेते जाणून घेण्यात अजिबात विलंब होता कामा नये. या बाबतीत आमची साधारण बेसावधगिरीसुद्धा लहानसहान नाही.

शहाणा मनुष्य तर तोच आहे जो आजच जागा व सावध होईल आणि जीवनाच्या संभाव्य गोष्टींचा विचार करील व त्या इशाऱ्याकडे लक्ष देईल जो इशारा त्याला ईश्वराकडून मिळत राहिलेला आहे आणि ईश्वराने अवतरित केलेला अंतिम ग्रंथ पवित्र कुरआन ज्याबद्दल मानवाला वारंवार सावध करीत आहे.

येथे हे स्पष्टपणे लक्षात ठेवावे की पवित्र कुरआन मानवासाठी गंभीर इशाराही आहे व मंगल सूचनादेखील आहे. तो त्या लोकांसाठी शुभवार्ता व मंगलसूचनाच बनून उतरलेला आहे जे त्याच्या गोष्टीकडे लक्ष देतात व जीवनाचा त्याच्या वास्तविक स्वरूपात स्वीकार करून येणाऱ्या जीवनाच्या तयारीस लागतात आणि आपलेकर्तव्य पार पाडतात; परंतु पवित्र कुरआन याचबरोबर त्या लोकांसाठी भय दाखविणारा व इशारासुद्धा आहे जे त्याच्या म्हणण्याकडे लक्ष न देता जीवनाची अवहेलना करतात व आपल्या कर्तव्याकडून तोंड फिरवितात.

परलोकाच्या बाबतीत पवित्र कुरआनने जीधारणा प्रस्तुत केली आहे तो केवळ दार्शनिक विषय नाही तर तिचा आमच्या वर्तमान व भावी जीवनाशी गहन संबंध आहे. अंतिम दिन व परलोकाची धारणा मान्य केल्यावर मनुष्याच्या जीवनाची दिशा व त्याचा आत्मा त्या जीवन-दिशा व आत्म्यापासून पूर्णत: भिन्न होते जी परलोकाचा इन्कार केल्यावर होते. या बाबतीत आम्ही मध्यममार्गसुद्धा अवलंबू नये की परलोकाचा इन्कारही करू नये आणि त्याचा स्वीकारही करू नये, तर परलोकासंबंधी मौन पाळावे ते अशासाठी की परलोकासंबंधी आम्ही जरी आपली काही धारणा बनविली नाही तरीसुद्धा परिणामाच्या दृष्टीने आमचे जीवन आणि जीवनाचे प्रयत्न स्वभावत: तसेच असतील जसे परलोकाचा इन्कार केल्यावर असू शकतील. आम्ही परलोक अथवा अंतिम दिवसासंबंधी जोपर्यंत काही धारणा निश्चित करीत नाही तोपर्यंत हे स्पष्ट आहे की आम्ही परलोकाच्या साफल्यासाठी प्रयत्नसुद्धा करणार नाही. मग जर पारलौकिक जीवन सत्य आहे तर आम्ही परलोकातील वाईट परिणामापासून स्वत:ला कसे वाचवू शकू? म्हणून आम्हाला नाइलाजास्तव या विषयावर विचार करणे भाग पडते.

## विचारणीय गोष्ट

जसे की वरील विवेचनावरून स्पष्ट होते, परलोकाची धारणा ही अत्यंत तर्कसंगत धारणा आहे.या धारणेत कोणतीही अशी गोष्ट नाही की जी बुद्धी व तर्काच्या विरूद्ध आहे. एखाद्या लोकाची (जगाची) धारणा अथवा कल्पना काही अशी गोष्टसुद्धा नाही की मनुष्य ज्याच्याशी अपरिचित असावा. वर्तमान लोक खुद्द एक असे जग आहे ज्यातमनुष्य आज श्वास घेत आहे. ही आश्चर्याची गोष्ट ठरेल जर मानवाने जगात राहून लोकाचा (जगाचा) इन्कार करावा.

विचारणीय गोष्ट अशी आहे की जर या जगाव्यतिरिक्त अन्य कोणतेही जग असंभव आहे तर हे जगसुद्धा कसे संभव होऊ शकते? आम्ही मुलला पाहत नाही काय की ते सदैव मूल राहत नाही? ते तरुणसुद्धा होते, मग जर हे जग एखाद्या निश्चित समयी अन्य एखादे विकसित रूप धारण करणारे असेल तर त्यात आश्चर्य वाटण्याजोगे काय आहे? जर दोन निहारिका आपल्या कोट्यवधी नक्षत्रांसह परस्पर एकमेकांना ओलांडून जाऊ शकतात आणि दोन तारे एकमेकांना टक्कर देत नाहीत तर हेका संभव होऊ शकत नाही की एक वेळ अशी यावी की जेव्हा गतिशील पृथ्वीच्या कार्यक्रमाचा विशिष्ट टप्पा पूर्ण व्हावा आणि जगाचा दुसरा पैलू आमच्या समोर यावा. अगदी त्याचप्रमाणे जसे रात्र गेल्यानंतर दिवसाचा प्रकाश चोहीकडे पसरावा आणि असे वाटावे की जणू जगच बदलले आहे.

वस्तुस्थिती अशी आहे की आम्हीसुद्धा तेच असतो आणि जगसुद्धा तेच असते. परंतु प्रकाशाच्या प्रमाणात वाढ होते. दिवसाच्या प्रकाशात त्या सर्व वस्तु दिसू लागतात ज्या रात्रीच्या अंधारात लपलेल्या होत्या. रात्रीच्या अंधारात पर्वतसुद्धा लपतात व दिवसाच्या प्रकाशात तृणकणसुद्धा दिसतात.

जर सूर्याच्या प्रकाशात पृथ्वी आल्यामुळे जगात एक महान परिवर्तन येते, तर एखाद्या अशा लोकाची कल्पना का केली जाऊ शकत नाही की ज्याच्यामुळे जगातून कायमस्वरूपी अज्ञान, दु:ख, अन्याय, अपूर्णता वगैरे उणिवांचा अंधार दूर व्हावा. लोकांनी अशा प्रकाशात यावे जेथे आमच्यापासून काहीही अदृश्य राहू नये. लोकांनी सत्य व वास्तविकता स्पष्टपणे पाहावी. पवित्र कुरआनमध्ये आहे-

**''पृथ्वी आपल्या पालनकर्त्याच्या तेजाने उजळून निघेल, कर्माची नोंदवही आणून ठेवली जाईल, सर्व नबी (प्रेषित) आणि सर्व साक्षीदार उपस्थित केले जातील. लोकांच्या दरम्यान ठीक ठीक सत्याधिष्ठित निर्णय दिला जाईल, त्यांच्यावर कोणताही अन्याय होणार नाही.''** -३९:६९

जगात भिन्न भिन्न मत-मतांतर आढळतात. लोक वेगवेगळ्या प्रकारच्या बरे-वाईट कर्मांत लागले आहेत. याचे वास्तविक कारण असेच आहे की जग व जीवनाची वास्तविकता अशाप्रकारे नाही की मनुष्याने त्याच्याविरूद्ध विचारच करू न शकावे आणि त्याच्याविरूद्ध एखादे कामही करू न शकावे.

जग आणि जीवनासंबंधी सामान्यपणे माणसाला फारच थोडी माहिती आहे. कित्येक असे रहस्य आहेत जे अद्याप प्रत्यक्षपणे प्रकाशात येऊ शकले नाहीत. आपल्या विचारशक्तीने मानवाला हे मान्य करावे लागते आहे की त्याला जितक्या गोष्टी ज्ञात आहेत त्यांच्यापेक्षा अनेक पटींनी गोष्टी त्याला अज्ञात आहेत.पवित्र कुरआनमध्ये आहे-

**''आणि तुम्हाला केवळ थोडेच ज्ञान दिले गेले आहे.''** -१७:८५

मानवाच्या ज्ञानाची दशा अशी आहे की घन पदार्थाचासुद्धा केवळ तीन टक्के अंशच तो पाहू शकतो. वास्तविकता तितकीच नाही की जितकी आम्ही डोळ्यांनी पाहू शकतो. वस्तूंची व्याख्या व विश्लेषण तोपर्यंत संभव नाही जोपर्यंत आम्ही त्या काही अन्य वस्तु जोडत नाही ज्या आमच्यासाठी आवश्यक आहेत.

## तर्कसंगत धारणा

कोणतीही धारणा ग्रहण करण्याचा योग्य मार्ग अथवा विशुद्ध पद्धत काय असू शकते? आम्ही हे जाणतो की आमच्यापाशी केवळ पाहणे, ऐकणे, स्पर्श करणे वगैरेसाठीच ज्ञानेंद्रिय आहेत असे नव्हे तर आम्हाला विचार-चिंतन करण्याचीसुद्धा अपार शक्ती मिळालेली आहे. हेच कारण आहे की मानव सदैव भौतिक व आभासित जगाच्या परिधिचा बंदी बनून राहण्यास नकार देत राहिला आहे. तो स्वभावत: असे इच्छितो की त्याने आपल्या चिंतनशक्तीचा प्रयोगकरावा आणि त्या आंतर्निहित रहस्यांचे ज्ञान करून घ्यावे, ज्यांना आमचे ज्ञानेंद्रिय स्पर्श करू शकत नाहीत. चिंतनाची एक पद्धत तर अशी असू शकते की आम्ही बाह्य जगताकडून डोळे बंद करून केवळ कल्पनालोकात विवरण करावे आणि अशी धारणा बनवावी ज्यांचा अपार तर्क व अंदाजाशिवाय काही असू नये. ही विचारपद्धती पूर्णत: भ्रामक व मार्गभ्रष्ट करणारी आहे. अशा विचारपद्धतीने आम्ही ज्याधारणा निर्धारित करू त्यावर कदापि विश्वास केला जाऊ शकत नाही. हेतर केवळ अंधारात बाण मारण्यासारखे होय. हे आवश्यक नाही की बाण लक्ष्यावर लागावा.

याउलट एक दुसरी विचारपद्धतीसुद्धा आहे आणि ती अशी आहे की आम्ही उघड्या डोळ्यांनी जगात व खुद्द आपल्या स्वत:मध्ये अशा तत्त्वांचा व चिन्हांचा शोध घ्यावा जी वास्तविकता ओळखण्यात आम्हाला सहायक ठरतील. जर अशी चिन्हे

आम्हाला प्राप्त झाली तर ती आमच्यासाठी असे दीप सिद्ध होऊ शकतील ज्यांना घेऊन आम्ही आपल्या चिंतनशक्ती व बुद्धीच्या सहाय्याने त्या वास्तविकतापर्यंत पोचू शकतो, ज्या मानव जाणून घेऊ इच्छितो. बर्ट्रेंड रसेलनेसुद्धा या विचारपद्धतीची आपले पुस्तक 'ह्युमन नॉलेज'मध्ये पुष्टी केली आहे. या पद्धतीला अशास्त्रीय समजणे योग्य नव्हे. कोणत्याही वास्तविकतेचा इंद्रियाद्वारे साक्षात्कार करणे शक्य नाही. हेच कारण आहे की शास्त्रीय जगतातसुद्धा ज्या सिद्धान्तांना मान्यता प्राप्त आहे त्यांचे कुणीही इंद्रियाद्वारे निरीक्षण केलेले नाही. प्रत्येक शास्त्रीय धारणा अथवा सिद्धान्त एक प्रकारचे निष्कर्ष आहे व त्या निष्कर्षाला पोचण्यासाठी शास्त्रज्ञांनी जगात घडणाऱ्या घटना व आढळणाऱ्या विशेष चिन्हांवर विचार व चिंतन केले आहे. गुरुत्वाकर्षणाचा नियम असो अथवा सापेक्षता सिद्धान्त असो यापैकी कोणालाही प्रत्यक्ष इंद्रियाद्वारे निरीक्षणानंतर स्वीकृती दिली गेलेली नाही. तर हे सर्व सिद्धान्त वास्तविकत: विचारशक्तीनेच निर्धारित केले गेले आहेत. ज्या सामुग्रीच्या आधारे मानवाच्या विचारशक्तीने या सिद्धान्तांचा शोध लावला आहे ती काही कल्पनाजगतातून एकत्र केली नाही तर ती याच भौतिक जगाचा अंश आहे. वर्तमान जगासाठी ती काही अपरिचित बाब नाही.

पवित्र कुरआन विचार व वास्तविकतेच्या प्रमाणीकरणाच्या याच शास्त्रीय पद्धतीची पुष्टी करतो. पवित्र कुरआनच्या दृष्टीनेसुद्धा मानवात तर इतकी शक्ती नाही की त्याने त्या वास्तविकता प्रत्यक्षपणे पाहू शकावे, ज्या त्याच्या इंद्रियांना दिसत नाहीत. परंतु जर त्याने ब्रह्मांडात आढळणाऱ्या चिन्हांचे व लक्षणांचे उघड्या डोळ्यांनी निरीक्षण केले आणि स्वत: आपल्या व्यक्तित्व आणि आपल्या जन्मासंबंधी विचार केलाव अशाप्रकारे त्या विशेषलक्षणांना व चिन्हांना ज्या सत्यसमजण्यासाठीसहाय्यक वाटतील त्यांना एकत्रित करून त्यांना सुनियोजित पद्धतीने क्रमवार ठेवून पाहिले की यातून काय निष्कर्ष निघतो, तर अशाप्रकारे तो सत्याच्या अधिक जवळ पोचू शकेल. अशातऱ्हेने त्याला सत्याची अनुभूतीसुद्धा होऊ शकेल आणि ते सत्य जे साधारणपणे दिसत नाही ते तो आभासित रूपात पाहण्याची योग्यता प्राप्त करू शकेल. पवित्र कुरआनमध्ये आहे-

**''आकाशात व पृथ्वीत कित्येक निशाण्या आहेत ज्या त्यांना आढळतात आणि ते त्याकडे लक्ष देत नाहीत.''** -१२:१०५

**''त्यांनी आकाश व पृथ्वीच्या राज्यावर (शासन व नियंत्रण व अन्य जे काही अल्लाहने निर्माणकेले आहेत्यावर दृष्टी टाकली नाही काय?''**-७:१८५

**''आम्ही यांना आपली चिन्हे दाखवू बाह्य जगतात व खुद्द त्यांच्या आत्म्यात, येथपावेतो की त्यांच्यावर उघड व्हावेकी हे सत्य आहे.''** -४१:५३

# जगाची भाषा समजून घ्या

## परलोकाची पुष्टी

पवित्र कुरआनने जेव्हा परलोक आणि मृत्युनंतर जीवनाची धारणा प्रस्तुत केली आहे तेव्हा याचा अस्वीकार करणे व आपल्या अस्वीकृतीच्या पुष्टीसाठी एखादा तर्क आणि अखंडनीय प्रमाण ते प्रस्तुत करू शकले नाहीत. ते केवळ आश्चर्य व्यक्त करीत राहिले, असले आश्चर्य जे कदापि तर्कसंगत नव्हते. एखादीगोष्ट आश्चर्यजनक असण्याचा असा कदापि अर्थ होत नाही की ती असंभव असणे आवश्यक आहे. परंतु ही मानवाची दुर्बलता आहे की तो बहुतेक आश्चर्यचकित होऊन जीवनाचे सत्यदेखील मान्य करण्यास नकार देतो. पवित्र कुरआन मानवाची ही दुर्बलता दूर करू इच्छितो. त्याला वाटतेकी मानवाने विचार व चिंतन करावे आणि त्याने आपल्या विचारशक्तीचा चांगल्या प्रकारे प्रयोग करावा व त्यावर विश्वास करावा.

अल्लाहचा हा दयाळूपणाच आहे की तो पवित्र कुरआनच्या माध्यमाने मानवाला केवळ शास्त्रीय विचारपद्धतीचाच परिचय करवीत नाही तर त्या सत्यांचा व सृष्टीच्या त्या रहस्यांचासुद्धा स्पष्ट शब्दांत उल्लेख करतो जी तो वैज्ञानिक अनुशीलन व अचूक विचारपद्धतीने प्राप्त करू शकेल. असे त्याने अशासाठी केले आहे की मनुष्याने आपल्या एखाद्या क्षुल्लक निर्बलता अथवा गफलतीमुळे एखाद्या अशा निष्कर्षाला पोचू नये की जो असत्य असावा; अशाप्रकारे त्याने सत्यापासून वंचित राहून आपला सर्वनाश करून घेऊ नये. याच्या महत्त्वाची कल्पना आम्हाला पूर्णपणे त्यावेळी येते जेव्हा आम्ही पाहतो की अल्लाहच्या या उपकारानंतरसुद्धा कित्येक लोकसत्यापासून लांब राहून जीवन जगत आहेत. पवित्र कुरआनने जेव्हा पारलौकिक जीवनाविषयी म्हटले तेव्हा लोकांनी त्यावर आक्षेप घेतला आणिते त्यांचे आश्चर्यचकित होण्याशिवाय अन्य काहीही नव्हते, आजसुद्धा पारलौकिक जीवनाला न मानणारे आपल्या आश्चर्याशिवाय अन्य कोणताही विचार मांडू शकले नाहीत.ते असेच म्हणतात की आम्ही हे कसे मान्य करावे की मनुष्य मेल्यानंतर तर मातीशी एकरूप होईल, मग त्याला पुन्हा जिवंत केले जाईल? पवित्र कुरआनने असे विचार व्यक्त करणाऱ्यांच्या आक्षेपाला उद्धृत केले आहे-

**''जेव्हा आम्ही मरू आणि माती बनू? हे परतणे तर लांबची गोष्ट आहे.''**

-५०:३

**"कोण या हाडात प्राण फुंकेल की जेव्हा ही नाहीशी झाली असतील?"**
-३६:७८

**"आणि ते म्हणाले, काय आम्ही (मेल्यावर) जेव्हा हाडांचा चुरा बनू तेव्हा आम्हाला पुन्हा निर्माण करून उठविले जाईल?"** -१७:९८

**"आणि ते म्हणाले, जेव्हा आम्ही मातीशी एकरूप होऊ काय तेव्हा आम्हाला पुन्हा जन्मास घातले जाईल?"** -३२:१०

पवित्र कुरआन अशाप्रकारचा विचार करणाऱ्यांची अडचण दूर करीत म्हणतो की जर तुम्हाला जगातील नवीन रचना व परलोक जीवनाचे आश्चर्य वाटते तर सध्याचे जग व वर्तमान जीवनाचे तुम्हाला आश्चर्य का वाटत नाही? मग आश्चर्यचकित होऊन तुम्ही वर्तमान सृष्टी व वर्तमान जीवनाचासुद्धा का इन्कार करीत नाही? जर तुम्ही असे करू शकत नाही तर मग जगाच्या कोणत्याही संरचनेला मान्य करण्यात तुम्हाला का अडचण येत आहे? ते मान्य करण्यात कोणतीच अडचण नाही. अडचण जरकाही आहे तर ती तुमच्या मनात आहे. तुमची दृष्टीच मुळी संकुचित आहे, तुमचे हृदयच लहान आहे जे सत्याचा स्वीकार करण्यात अडसर बनलेले आहे.

दृष्टीच्या या संकुचितपणाला व हृदयाच्या संकीर्णतेलादूर करा. हृदयाच्या विशालतेला हरवून तुम्ही केवळ सत्यापासूनच दूर जात आहात असे नव्हेतर तुम्ही आपल्या आत्म्यालासुद्धा आघात पोहचवीत आहात. तुम्ही त्या कामना व आकांक्षांचासुद्धा गळा दाबीत आहात ज्यांच्यासमवेत तुम्ही जन्माला आला आहात आणि ज्या तुमच्या स्वभावाच्या अभिन्न अंग आहेत. खरे बोला, तुम्हाला अमरत्वाची इच्छा नाही काय? तुम्हाला वाटत नाही काय की जीवनाचे सुख व आनंद अमर्याद असावेत? मग तुम्ही तो आवाज का ऐकत नाही जो तुम्हाला निराशेतून आशेकडे आणि अंधारातून प्रकाशाकडे घेऊन जाऊ इच्छितो?

## जग आणि जीवनाचे संकेत

पवित्र कुरआन म्हणतो की तुम्ही उघड्या डोळ्यांनी जगाचे निरीक्षण करा. मग तुम्हालाते सर्वकाही दिसू लागेल जे मान्य करण्याचा तुम्हाला आग्रह केलाजात आहे-

**"तो अल्लाहच आहे ज्याने आकाशांना अशा आधाराविना स्थापित केले जे तुम्हाला दिसत आहे, मग तो आपल्या राजसिंहासनावर विराजमान झाला आणि त्याने सूर्य व चंद्राला एका कायद्याच्या आधीन केले, या साऱ्या व्यवस्थेतील प्रत्येक वस्तू एका ठरलेल्या वेळेसाठी चाललेली आहे आणि अल्लाहच या सर्व कार्याची तजवीज करीत आहे. तो निशाण्या उघड करून करून देतो कदाचित**

**तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा विश्वास बाळगाल.''** -१३:२

**''काय त्यांना हे उमगले नाही की ज्या अल्लाहने आकाश व पृथ्वी निर्माण केली तो या सारख्यांना निर्माण करण्याचे सामर्थ्य अवश्य राखतो? त्याने यांच्या पुनरुत्थानाची एक वेळ निश्चित केली आहे जिचे येणे निःसंशय आहे, पण अत्याचाऱ्यांचा हट्ट आहे की ते त्याचा इन्कारच करतील.''** -१७:९९

**''काय तुम्हा लोकांची निर्मिती अधिक कठीण काम आहे की आकाशाची? अल्लाहने ते बनविले.''** -७९:२७

अर्थात जो अल्लाह या विशाल विश्वाचा सृष्टा आहे, ज्याने मोठमोठे ग्रह व उपग्रहांना आपल्या नियमांच्या बंधनात जखडून ठेवले आहे, ज्याची शक्ती व सामर्थ्य असे आहे की विश्वाच्या विभिन्न क्षेत्रांना त्याने अशा अदृश्य आधारांवर स्थापित करून ठेवले आहे की मानवाने आश्चर्यचकित व्हावे. त्याच्याविषयी अशी कल्पना करणे की तो मनुष्याला त्याच्या मृत्युनंतर पुन्हा जिवंत उभा करू शकत नाही. अल्पज्ञतेशिवाय अन्य काही नाही.

लांब कशाला जा, आपल्या पृथ्वीलाच पाहा की ती कशाप्रकारे अल्लाहच्या शक्ती व सामर्थ्याचा परिचय देते (कुरआनात म्हटल्याप्रमाणे),

**''यांना सांगा की भूतलावर हिंडा, फिरा आणि पहा की त्याने कशाप्रकारे सृष्टीचा प्रारंभ केला आहे. मग अल्लाह दुसऱ्यांदादेखील जीवन प्रदान करील. निश्चितच अल्लाह प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे.''** -२९:२०

**''आणि अल्लाहच्या संकेतांपैकी एक हेही आहे की, जमीन ओसाड पडलेली आहे, मग आम्ही तिच्यावर पाण्याचा वर्षाव करताच अकस्मातपणे ती तजेलदार होते आणि फुलते. निश्चितच जो ईश्वर मृत जमिनीला जीवित करतो, तो मृतांनादेखील जीवन प्रदान करणारा आहे. निश्चितपणे तो प्रत्येक वस्तूवर प्रभुत्व राखतो.''** -४१:३९

**''पहा, अल्लाहच्या कृपेचे परिणाम की मृत पडलेल्या जमिनीला तो कशाप्रकारे जीवित करतो. निःसंशय तो मृतांना जीवन प्रदान करणारा आहे व तो प्रत्येक गोष्टीवर समर्थ आहे.''** -३०:५०

अर्थात तुम्ही हे पृथ्वीवर पुन्हा पुन्हा पाहता की अल्लाह केवळ याचेच सामर्थ्य बाळगत नाही की त्याने एखाद्याला जिवंत निर्माण करावे तर त्याच्याबरोबर त्याचा असा स्वभावसुद्धा तुम्हाला दृष्टिगोचर होतो की त्याने मृताला पुन्हा जीवन प्रदान करावे.

उन्हाळ्यात कित्येक भूभाग वाळून जातात. तेथे अजिबात हिरवळ शिल्लक राहत नाही. सर्वत्र धूळ उडत राहते आणि अशा वेळी पावसाळा येतो आणि अल्लाह त्या मृतावस्थेत पडलेल्या भूभागाला पुन्हा जिवंत करतो. जेथे धूळ होती तेथे सर्वत्र हिरवळ दिसू लागते. म्हणून अल्लाहसंबंधी अशी कल्पना करणे की तो मेलेल्या लोकांकडे दुर्लक्ष करील, कधीही बरोबर ठरणार नाही. त्याच्यापासून काहीही अदृश्य नाही आणि तो लोकांच्या गरजांपासून कधीही अनभिज्ञ असू शकत नाही. याचे प्रत्यक्ष पुरावे आमची पृथ्वी पुन्हा पुन्हा प्रस्तुत करीत असते (कुरआननुसार),

**"तो अल्लाहच तर आहे जो वारे प्रवाहित करतो. मग ते ढगांना जोडतात. नंतर आम्ही त्याला एका ओसाड प्रदेशाकडे नेतो आणि त्याद्वारे आम्ही त्या धरतीला नवजीवन देतो जी मृत पडलेली होती, दिवंगत माणसाचे पुनरुत्थान सुद्धा त्याचप्रकारे असेल."** -३५:९

जर तुम्ही सत्याचे दर्शन अधिक जवळून करू इच्छित असाल तर स्वत:विषयी विचार करा की तुमचा जन्म कसा झाला होता. तुमची रचना या गोष्टीची कल्पना देत नाही की ज्या गोष्टीचा तुम्ही अशक्य समजून इन्कार करीत आहात ती शक्य असल्याचे मानवाच्या जन्मावरून निरंतर प्रकट होत राहिलेली असावी? मग अखेर असे सांगणे कसे तर्कसंगत होऊ शकते की आम्ही मेल्यावर दुसऱ्यांदा जिवंत उभे राहणे अशक्य आहे? त्या महान शक्तिशाली प्रभु अल्लाहमध्ये हे सामर्थ्य नाही काय की त्याने एखाद्याला त्याच्या मृत्युनंतर पुन्हा जीवन द्यावे? पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"काय मानवावर अनंत काळाची एक वेळ अशीही येऊन गेली आहे जेव्हा तो काही उल्लेखनीय वस्तू नव्हता?"** -७६:१

**"लोकहो, जर तुम्हाला मरणोत्तर जीवनासंबंधी काही शंका असेल तर तुम्हाला माहीत असले पाहिजे की आम्ही तुम्हाला मातीपासून निर्मिले आहे,"** -२२:५

**"आता तो आम्हावर दृष्टांत लावीत आहे आणि आपल्या निर्मितीस विसरत आहे. सांगतो, कोण या हाडांना जिवंत करील जेव्हा ती जीर्ण झाली असतील? त्याला सांगा, यांना तोच जिवंत करील ज्याने यांना पूर्वी निर्मिले होते आणि तो निर्मितीचे प्रत्येक कार्य जाणतो."** -३६:७८-७९

**"ते विचारतील, "कोण आहे तो जो आम्हाला पुन्हा जीवन देईल?" उत्तरादाखल सांगा, तोच, ज्याने तुम्हाला पहिल्यांदा निर्माण केले."** -१७:५१

**"तोच आहे जो सृष्टीचा प्रारंभ करतो, मग तोच तिची पुनरावृत्ती करील आणि हे त्याच्यासाठी अधिक सुलभ आहे. आकाश आणि पृथ्वीत त्याचे गुणवैशिष्ठ्य सर्वात वरचढ आहे, आणि तो जबरदस्त आणि बुद्धिमान आहे."** -३०:२७

सारांश असा की तुम्ही ज्याचा इन्कार करता ते तर अल्लाहसाठी काही नवीन काम नाही की तुम्हाला त्याच्या करू शकण्यावर काही शंका असावी.तुम्ही काहीही नव्हता, त्याने तुम्हाला अस्तित्व प्रदान केले. निर्जीव मातीत त्याने प्राण घालून दाखविले. एक काम जे त्याने केलेले आहे तो ते पुन्हा करू शकत नाही का? शेवटी तुमचा इन्कार करण्याचा काहीतरी आधार असला पाहिजे. जो अल्लाह हिरवीगार जमीन वाळून गेल्यानंतर ती पुन्हा हिरवीगार करतो आणि हे दृश्य तुम्ही वारंवार पाहतच असता, मग जर त्याने मनुष्य मेल्यानंतर त्याला पुन्हा जिवंत करून उभा केले, तर यात अखेर आश्चर्याची कोणती बाब आहे? हिरवी जमीन वाळून गेल्यानंतर पुन्हा हिरवी होऊ शकते आणि रात्र आल्यानंतर पुन्हा दिवस उगवण्याची आशा केलीजाऊ शकते, परंतु पुन्हा जीवन मिळू शकत नाही, असे केवळ तेच लोक बोलू शकतात ज्यांनी जीवनाचे मूल्यअद्याप जाणलेच नसावे. जीवनाचे मूल्य कोणत्याही जमिनीपेक्षा अधिक नाही काय? आमचे प्राण व आमची चेतना दिवसाच्या प्रकाशापेक्षा अधिक मौल्यवान नाही काय? मग तुम्हाला असे वाटते काय की जगाची व्यवस्था ज्या विश्वचेतनेच्या हातात आहे तिला पृथ्वी व सूर्यप्रकाश आणि भव्यतेचा तर आदर करणे माहीत असावे, परंतु तिने जीवन व प्राणाला उपेक्षित ठरवावे?

पृथ्वीच्या संकेतांना समजण्यासाठी पवित्र कुरआनातील आणखी एक उदाहरण पाहण्याजोगे आहे,

**"शपथ आहे त्या वाऱ्यांची जे धूळ उडविणारे आहेत, मग पाण्याने भरलेले मेघ उचलणारे आहेत, मग चपळतेने वाहणारे आहेत, मग एका मोठ्या कार्याचे (पावसाचे) वाटप करणारे आहेत, सत्य असे आहे की ज्या गोष्टीचे भय तुम्हाला दाखविले जात आहे ती खरी आहे. आणि कर्मफळनिष्पत्ती खचितच घडून येणार आहे."** -५१:१-६

ईश्वरी दयाळूपणा व ईश्वरी प्रकोप काही कल्पना नव्हे. हे वर्तमान जगातसुद्धा दिसून येतात. उदाहरणार्थ, पवित्र कुरआनच्या आयतीत वाऱ्यांना प्रस्तुत केले गेले आहे. मानवाने जरी केवळ वाऱ्यांचाच गंभीरपणे विचार केलातरी त्याला सत्याचे आकलन होण्यात अडचण येणार नाही. वारे आमच्यासाठी किती उपयुक्त आहे. हेच वारे मेघांना उडवून आणतात व कित्येक तप्त भूभागांना पाण्याच्या वर्षावाने सिंचित करतात आणि

त्यांना हिरवेगार करतात. परंतु हे वारे कित्येक भूभागांना तसेच कोरडे सोडून देतात, तर कित्येक ठिकाणी विनाशाला कारणीभूत ठरतात. कित्येक भूभागांत आम्ही वादळ व गारांच्या वर्षावामुळे विनाश पसरताना पाहतो. आद, नूह, समूद वगैरे कित्येक जातींना भयंकर वारे, वादळ व जलप्रलयाने नष्ट केले गेले.यावरून स्पष्ट दिसते की हे वारे कुणाच्या तरी इच्छेचे पालन करीत आहेत. त्याच्या इच्छेनुसार यांच्या व्यवहारात भिन्नता आढळते. ईश्वराच्या आदेशाने हे कुठे आनंदाचे विषय बनतात, तर कुठे विनाशाला कारणीभूत ठरतात. हे या सत्याचे स्पष्ट प्रमाण आहे की ईश्वराला केवळ दयाच दाखविणे येते असे नव्हे तर त्याला शिक्षाही देणे येते. त्याच्याकडून अशी आशा केली जाऊ शकत नाही की तो चांगले व वाईट यामध्ये काही अंतर करणार नाही आणि चांगल्या लोकांना चांगला व वाईटांना वाईट मोबदला मिळणार नाही. म्हणून एक असला दिवस अवश्य येईल की ज्या दिवशी चांगल्या लोकांवर ईश्वराची कृपा होईल आणि ते आपल्या प्रयत्नांचा पुरेपूर मोबदला प्राप्त करतील व वाईट लोकांनासुद्धा त्या दिवशी आपल्या दुष्कृत्यांचे कडू फळ मिळेल. ऐहिक जीवनात जे कित्येक दुष्टाचारी सुखाचा उपभोग करताना आणि कित्येक पुण्यात्मा लोक हालअपेष्टा सहन करताना दिसतात, ही गोष्ट फळप्राप्तीच्या दिवसाला अधिकच आवश्यक बनविते.

पवित्र कुरआनच्या दृष्टीने जर मनुष्य संवेदनशील व डोळस असेल तर त्याला जगातील प्रत्येक वस्तु व येथील प्रत्येक दृश्य असा संकेत करताना दिसेल की हे वर्तमान जगच केवळ आहे असे नव्हे तर एखादे परलोकसुद्धा आहे, जेथे प्रत्येकाला आपल्या केलेल्या कृत्यांचा बरा-वाईट मोबदला प्राप्त करावयाचा आहे. उदाहरणार्थ, पवित्र कुरआनच्या याआयतीचे मनन करा,

**''कदापि नाही. शपथ आहे चंद्राची आणि रात्रीची जेव्हा ती पालटते, आणि सकाळची जेव्हा ती उजळते, हा नरकाग्नीसुद्धा मोठ्या गोष्टीपैकी एक आहे, माणसासाठी भय दाखविणारी.''** -७४:३२-३६

मनुष्य सदैव अंधारात राहू इच्छित नाही. तो स्वभावत: प्रकाशाचा इच्छुक आहे. ईश्वर त्याच्यासाठी प्रकाशाची व्यवस्था करतो. चंद्र रात्रीचा अंधकार दूर करीत असल्याचे आढळते. रात्री सदैव अंधकारपूर्ण नसतात. शिवाय रात्रीसुद्धा कायमस्वरूपी स्थिर राहण्यासाठी नसतात. रात्र अखेरीस ढळते व जग प्रात:काळाचे दर्शन करते. तो ईश्वर जो अंधार दूर करून प्रकाश पसरविणे जाणतो, तो हे जाणणार नाही काय की मानवाला आणखी एका प्रकाशाचीसुद्धा गरज आहे? जीवनाच्या कित्येक वास्तविकता अशा आहेत ज्या आज मनुष्याच्या दृष्टीआड आहेत, मानव इच्छितो की त्या प्रकाशात याव्यात आणि

जीवनाच्या गूढतम रहस्यांचे उद्घाटन व्हावे आणि मानवाच्या लक्षात यावे की यथार्थ जीवनात मानवाने ज्या धारणा बनविल्या होत्या व जी कर्मे केली होती त्या काळाच्या गर्भात लुप्त होण्यासाठी निश्चितच नव्हत्या.

## सृष्टीत योजनेचा नियम

जगाचे प्रत्येक कण स्वत:मध्ये एक अद्भूत जग आहे तरी सुध्दा जगाच्या विभिन्न वस्तूंचे आपले स्वतंत्र अस्तित्व नाही तर त्या परस्पर एक-दुसऱ्याशी संबंध व संपर्क असणे निरर्थक नाही तर यामुळे जीवन व जगाचे कित्येक हित व उद्देशांची पूर्तता होते. हे अगदी असेच आहे जसे आमच्या शरीरातील सर्व अवयव वेगवेगळे असून सुध्दा त्यांचा एकमेकांशी दृढ संबंध आहे. आणि अशा प्रकारे एका सुगठित व सुव्यवस्थित शरीराला ते साकार करीत असल्याचे दिसते. याच्या अभावात मानव या धरतीवर जीवन जगण्यास असमर्थ ठरला असता.

ज्या प्रकारे स्पष्टपणे लक्षित होते की आमचे शरीर एका सुनिश्चित योजनेप्रमाणे बनते आणि आपले कार्य करते, त्याच्याप्रमाणे बाह्य जगात सुध्दा एक महान योजना दृष्टिगोचर होते. जर योजनेप्रमाणे जगाची रचना झाली नसती तर इतक्या विस्तृत व जटिल लोकाचे (जगाचे) इतक्या चांगल्या पध्दतीने संचालन झाले नसते. म्हणून हे मान्य करावे लागते की कोणीतरी योजनाकार व महान चेतनशक्ती आहे, संपूर्ण जग ज्याचा एक चमत्कार आहे. प्रतेक वस्तुच्या रचनेत त्याची बुध्दी व बळ समाविष्ट आहे. जरी प्रत्याक्षपणे आम्हाला त्याची बुद्धी व बळ दिसून येत नाही तरी त्याच्या कार्यावरून आम्ही त्याला ओळखतो.

मग आम्ही जेव्हा या प्रश्नाचा विचार करते की काय जीवन व जगाचा अर्थ आणि उद्देश इतकाच आहे जितका आमच्या समक्ष आहे आणि जितक्याचा आम्हाला लाभ होत आहे, तर आमची बुध्दी याचा स्वीकार करत नाही. आम्हाला हे मान्य करावे लागते की जग व जीवनाचे कार्य इतक्यावरच संपुष्टात येत नाही की जगाने आपल्या दडवलेल्या खजिन्याला उघडे करून ठेवावे आणि जीवनाने त्यापासून आपल्या गरजा भागवाव्यात आणि शिवाय हे सर्व काही केवळ एका सीमित वेळेचे प्रदर्शन असावेत. जीवन व जगाने तर स्वत:मध्ये गूढ व शाश्वत रहस्य लपवून ठेवले आहे. ही सारी आंधळी कोशिंबीर तर अशासाठी आहे की आमच्या अन्तर्मनाने त्या रहस्याला जाणावे व आम्हाला जीवनाच्या वास्तविक लक्ष्याची व आशयाची अनुभूति व्हावी. व आम्ही जीवनाची दिशा ठरवावी. जीवनाचा संचालक व प्रेरक तत्त्व तोच जीवनाभिप्राय आहे ज्याला समजण्यास सामान्यत:

लोक असमर्थ ठरतात.

पवित्र कुरआनने जीवनाच्या ज्या संभावनांचा उल्लेख केला आहे वास्तविकत: तीच ही रहस्ये आहेत ज्यांना जीवनाशी जोडल्यास आम्हाला सर्व मूलभूत प्रश्नांचे उत्तर मिळते आणि आमच्या सर्व शंकांचे पूर्णपणे समाधान होते. जीवन एक प्रकारच्या झोपेत आहे. या झोपेचा सुद्धा स्वत: एक उपयोग व उद्देश आहे, परंतु ही झोप दीर्घकाळ राहणार नाही. ही मोडेल आणि जग जागेल व जगाची वास्तविक स्थिती समोर येईल.

एकच परम सत्ता आहे ज्याची शक्ती, सामर्थ्य व मनोहरतेची अभिव्यक्ती या लोकात (जगात) होत आहे. जीवनाची परिपूर्ती त्याच स्थितीत शक्य आहे, जेव्हा ते इष्ट आमच्या जीवनात येईल. या बाबतीत विघ्न त्याच्याकडून नव्हे तर ते आमच्याकडून आणले जाते.

## निराशेला कोणतेही स्थान नाही

जर या प्रक्रियेत आम्ही विघ्न आणले नाही व तिचा आपल्य जीवनात स्वीकार केला तर मग कोणत्याही अपयशाला व जीवनात स्थान राहणार नाही. काय आपण पाहिले नाही की वसंत ऋतु आल्यावर सर्वत्र फुले उमलतात, हवेत सुगंध दरवळतो आणि चोहीकडे नवजीवन खेळत असल्याचे दिसू लागले? मग हे कसे शक्य आहे की ईश्वराशी आमचा संपर्क यावा व त्याने आमच्या जीवनात पदार्पण करावे तरीसुद्धा आमच्या दु:खाचे अन्त होऊ न शकावे आणि आमच्या इच्छा अपुर्णच रहाव्यात व त्या होण्याची कोणतीही शक्यता नसावी आणि आम्ही असेच समजत रहावे की आम्हाला मरून मातीत मिसळावयाचे आहे व पुढे काहीही घडणार नाही? हा एक प्रकारे ईश्वराशी अविश्वास आहे.

अखेर मनुष्य विचार का करीत नाही? काय मनुष्य पर्वत, वृक्ष, तारांगण वगैरेपेक्षा सुद्धा अधिक उपेक्षित व अर्थहीन आहे की मनुष्याने तर काही दिवसापर्यंत पृथ्वीवर चालत-फिरत रहावे व नंतर कायमचे नष्ट व्हावे आणि हे तारे चमकत रहावेत,पर्वतांनी निश्चल रहावे? असे होणे शक्य नाही. ईश्वर यापासून अनभिज्ञ असणे शक्य नाही की चेतन शरीर अचेतन पर्वतापेक्षा कितीतरी मूल्यवान आहे. मग जर आम्ही माणसाला मरताना पाहतो तर या मृत्यूचे ज्ञान घेण्यासाठी आम्हाला प्रयत्न केले पाहिजेत.

मृत्यूचा असा अर्थ असणे आवश्यक नाही की मनुष्याचा कायमस्वरुपी अंत व्हावा आणि मृत्यूनंतर काही असू नये. पवित्र कुरआन सांगतो की मृत्यूमुळे एखाद्या व्यक्तीचा अंत होत नाही तर मृत्यू या गोष्टींचा सूचक आहे की त्या व्यक्तीची ती निश्चित वेळ समाप्त झाली आहे, ज्यात त्याला विशेष उद्देशाची पूर्तता करावयाची होती. आता पुढे त्याला

त्याच्या कार्मानुसार जीव प्राप्त होईल. ते जीवन कसे असेल? याचा निर्णय त्याच्या कर्मानुसार असेल. त्याच्यावर कदापि कसलाही अन्याय होणार नाही.

## सृष्टी निरुद्देश असू शकत नाही

जग व जीवनासंबंधी विचार करताना हा प्रश्न सुध्दा आमच्या समोर येतो की जग व जीवनाचा काही वास्तविक उद्देश तरी आहे की नाही? ईश्वराची कोणतीही रचना निरुद्देश कशी असू शकेल? ही गोष्ट वेगळी आहे की तो उद्देश समजण्यात आम्ही चूक करु शकू.

जर आम्ही ईश्वरालाच मानले नाही आणि असे म्हटले की हे जग कोणत्याही ईश्वराविना आपोआप बनले आहे आणि भौतिक शक्तीद्वारे आपोआप चालत आहे. याचा कोणताही उद्देश व गंतव्य नाही. आंधळ्या व चेतनाहीन त्या निसर्गाद्वारे हे संचलित आहे ज्याला बुध्दीही नाही व त्याला ज्ञानही नाही. म्हणून सृष्टीत कोणत्याही मौलिक उद्देशाचा शोध करणे व्यर्थ आहे. जर सृष्टीचा काही उद्देशच नसेल तर मग कोणत्याही उच्च उद्देशाचा शोध करणे व्यर्थ आहे. जर सृष्टीचा काही उद्देशच नसेल तर मग कोणत्याही उच्च उद्देशाच्या आधारे एखाद्या नवीन जीवन व नवीन लोकाचे (जगाचे) स्वप्न पाहाणे आपल्या बुध्दिहीनतेचा परिचय देणे होय. येथे जे काही आहे तो भौतिक शक्तीचा चमत्कार आहे. या शिवाय काही नाही. वास्तविकत: हात वस्तु उचलण्यासाठी नाहीत व पाय चालण्यासाठी नाहीत आणि मस्तक अशासाठी बनविले गेले नाही की मानवाने त्याचा प्रयोग विचार करण्यासाठी करावा. या वस्तु बनविलेल्याच कुठे आहेत की आम्हाला कळावे की ही वस्तु अमुक कार्यासाठी आहे आणि ती याच्यापेक्षा भिन्न कार्यासाठी आहे. या वस्तु बनविल्या गेल्या नाहीत तर आपोआप बनल्या आहेत आणि संयोगाने त्या आम्हाला उपयोगी सिध्द होत आहेत. याचा प्रश्नच मुळात उद्‌भवत नाही की हे जग एखाद्या चेतन सत्तेच्या इच्छा व निश्चयाप्रमाणे चालत आहे आणि त्या सत्तेसमक्ष एखादी चिरकालीन योजना आहे.

परंतु ही धारणा बुध्दि व तर्काच्या एकदम विरुद्ध आहे. या धोरणेच्या समर्थनार्थ केवळ इतकेच म्हटले जाते की या जगाचा सृष्टा व ते चालविणारा कोणी ईश्वर आम्हाला दिसत नाही आणि या सृष्टीचा आम्हाला कोणताही उद्देश दिसत नाही म्हणून ईश्वर व जगाचा काही वास्तविक उद्देश असल्याचे मान्य करणे निव्वळ अंधविश्वास आहे. परंतु एखादी वस्तु डोळ्याने न दिसणे हे मान्य करण्यास कदापि पुरेसे नाही की ती वस्तु मुळातच नाही. जर एक यंत्र किंवा कारखाना निर्मात्याविना आपोआप तयार होत नाही व

आपोआप चांगल्या प्रकारे चालत नाही, तर मग हे कसे शक्य आहे की, जगाचा हा प्रचंड कारखाना स्वत:च कोणत्याही इच्छेविना व योजनेविना बनला व स्वत:च अत्यंत व्यवस्थितपणे चालत सुद्धा आहे.

मानवाने थोडा तरी विचार करावा की ज्या ब्रह्मांडाविषयी त्याची अशी धारणा आहे की ते अकस्मात संयोगाने निर्माण झाले आहे, ते ब्रह्मांड आहे तरी कसे? हे ब्रह्मांड अत्यंत विशाल, व प्रचंड व अत्यंत व्यवस्थित व सुनियोजित आहे. ते इतके विशाल आहे की आकाशात पृथ्वीपेक्षा लक्षावधी पट मोठे ग्रह चेंडूप्रमाणे भ्रमण करीत आहेत. आमच्या सूर्यापेक्षा पटीने अधिक प्रकाशमान तारे त्यात चमकत आहेत.

हे सौर जगत ब्रह्मांडाच्या केवळ एका आकाशगंगेच्या एका पडलेल्या तुच्छ वस्तुसमान आहे. केवळ या एका आकाशगंगेत या सूर्याप्रमाणे तीन अब्ज तारे आढळतात. आणि अजूनपर्यंत अशा दहा लक्ष आकाशगंगांचा शोध लावला गेला आहे. त्यांच्यापैकी सर्वात जवळची मंदाकिनी इतक्या अंतरावर स्थित आहे की तिचा प्रकाश पृथ्वीतलावर दहा लक्ष वर्षांनंतर पोचतो आणि याचे स्मरण रहावे की, प्रकाशाचा वेग एका सेकंदाला एक लक्ष ८६ हजार मैल आहे. आधुनिक रेडियाई खगोल विशेषज्ञांनी एका अशा निहारिका-मंडळाचे निरीक्षण केले आहे ज्याचा प्रकाश अदमासे चार अब्ज वर्षांपेक्षा अधिक वेळाने पृथ्वीवर पोचतो. ब्रह्मांडाची ही विशाल रचना व त्याची अत्यंत कलात्मक व्यवस्था संयोगावर आधारित आहे अशी गोष्ट तोच म्हणू शकतो जो बुद्धीला एक निरर्थक वस्तु म्हणण्याचे धाडस करु शकतो.

शिवाय जीवनाचे कोडे घ्या जे सोपविण्यात सर्वच शास्त्रज्ञ अपयशी ठरते आहेत. अजूनपर्यंत प्राण्यांच्या सुमारे दहा लाख व वनस्पतींच्या सुमारे दोन लाख जीतींचा शोध लागलेला आहे. या आपल्या आकार-प्रकाराला अत्यंत प्राचीन काळापासून अखंडपणे आश्चर्यकारक पद्धतीने सुरक्षित ठेवीत आल्या आहेत. याला आजपर्यंत एखादा डार्विन सुद्धा याचे काही अन्य भौतिक कारण असल्याचे सिद्ध करण्यात यशस्वी झालेला नाही. या संबंधी भौतिकवादी लोकांकडून जे दावे केले गेले ते कालांतराने असल्याचे सिद्ध झाले.

निर्जीव पदार्थापासून प्राणधारी जन्तु उत्पन्न करण्याचे जितके प्रयोग केले गेले ते अपयशी झाले. जास्तीत जास्त करुन जी वस्तु उत्पन्न केली गेली तिचे नाव डी. एन. ए आहे. ही जीवित कोशिका (सेल्स) मध्ये आढळते. परंतु त्यात जीवनतत्व असून देखिल ती स्वत: जीवन माणसांच्या दृष्टीने चमत्कारच आहे. ज्या पदार्थापासून मानवाची रचना होते ते सर्व निर्जीव आहेत आणि ते या जगात आढळतात. कार्बन, कलशियम, सोडियम

वगैरेसारख्या पदार्थापासून मानव-शरीराची रचना झालेली आहे. मानवात चेतना, बुद्धी, संवेदना, भावना, कल्पना वगैरेसारख्या काही अशा आश्चर्यकारक शक्ती आढळतात ज्यात कोणत्यही एका शक्तीच्या स्त्रोताचा शोध त्यांच्या शारीरिक तत्वांच्या संरचनेत केला जाऊ शकत नाही.

शिवाय याबरोबरच मानवाला संतानोत्पत्तीची अशी शक्ती दिली आहे की ज्यामुळे कोट्यावधी मानव सर्व मानवीय वैशिष्ट्ये व अगणित पैतृक व व्यक्तिगत वैशिष्ट्यांसह जन्म घेत असतात. आणि या महान कार्यात पृथ्वी व आकाशातील ज्ञान व अज्ञान शक्ती आपले योगदान देत असतात. याबाबतीत हे सुद्धा लक्षात ठेवले पाहिजे की, मानवाचा वंश स्त्री-पुरुषाच्या जोडप्याने चालत असतो. परंतु वृक्षाचा वंश सामान्यपणे एकापासूनच चालतो, म्हणून त्यांच्या जन्मासाठी एखाद्या जोडप्याचे असणे आवश्यक नाही. जीवलोकात ही अत्यंत सुव्यवस्थित प्रणाली संयोगवंश असणे अधिक बुद्धिसंगत आहे की जगाचा कोणी सृष्टा व संचालक आहे आणि हे सर्व चमत्कार त्याच्या शक्ती व सामर्थ्याचे परिचायक आहेत.

ज्याअर्थी हे जग व जीवन एका ईश्वराच्या अस्तित्वाविना नाही तर याचा अवश्य एक ईश्वर आहे. ज्याच्या ज्ञान, सामर्थ्य, शक्ती वगैरेचा परिचय आम्हाला त्याच्या सृष्टीकडून होतो, त्याअर्थी काय अशा ईश्वराकडून या गोष्टीची अपेक्षा केली जाऊ शकते की त्याने या जगाला विनाकारण एखाद्या उद्देशाविना बनविले असेल? त्याने दिलेल्या या जीवनाचे कोणतेही लक्ष्य नसेल आणि या जीवनयात्रेचे कोणतेही गंतव्य नसेल का? ईश्वरासंबंधी यापेक्षा मोठा गैरसमज व दुर्भावना अन्य काय असू शकत?

'आखिरात' अथवा परलोकाच्या धारणेचा अर्थ असा झाला की या जगाची रचना निरुद्देश नाही आणि मानवी जीवनाला देखिल लक्ष्य आहे, जे प्राप्त करण्या न करण्यावर आमचे यश व अपयश अवलंबून असते. परलोकाच्या धारणेमुळे जग व जीवनाचे जे लक्ष्य आमच्यासमोर येते त्यापेक्षा अधिक चांगल्या व एखाद्या अन्य वास्तविक लक्ष्याची कल्पना केली जाऊ शकत नाही, कारण केवळ हीच एक अशी धारणा आहे ज्यात केवळ असेच नव्हे की जगासंबंधी मनात येणाऱ्या प्रश्नांची उत्तरे मिळतात, तर जग व जीवनाला अशा लक्ष्याची प्राप्ती सुद्धा होते की ज्यामुळे आमच्या नैसर्गिक व आंतरिक गरजांची पूर्तता सुद्धा होते. मनुष्याच्या सर्व इच्छा परलोकात पुऱ्या होतील. मग त्यांचा संबंध ज्ञानाशी असो की आनंद किंवा अन्य एखाद्या गोष्टीशी असो.

## निसर्गात उपयुक्ततेचा नियम

जगात प्रत्येक वस्तुच्या एका उपयुक्ततेचा आणि त्याच्या काही न काही प्रभाव दिसून येतो. येथील कोणत्याही वस्तुला पुर्णपणे निकामी म्हटले जाऊ शकत नाही. काय येथील फळे-फुले व्यर्थ आहेत की खनिज पदीर्थांचा काही उपयोग नाही? स्पष्ट आहे की असे नाही. येथील कोणत्याही वस्तु निकामी नाही. मग या संपुर्ण जगाला आम्ही कसे म्हणू शकतो की याची काही गरज अथवा उद्देश नाही? काय हे जग निरुद्देश व निकामी आहे? असे असणे कदापि शक्य नाही. ज्याअर्थी या जगातील प्रत्येक वस्तुला एक स्थान व महत्त्व आहे त्याअर्थी हे शक्य नाही की खुद्द या जगाचे आपले महत्व व उद्देश नसावे.

जर आम्ही या जगाला एका वृक्षाच्या रुपात पाहिले तर निश्चितपणे याचेसुद्धा एखादे रसाळ फळ असेल. आणि ते फळ आखिरत (परलोकात) च्या रुपात समोर येईल. जर वृक्ष महान आहे तर त्याचे फळसुद्धा महानच असले पाहिजे. जर हे जग एक क्रियाकलाप आणि सक्रियण (ॲक्टिवेशन) आहे तर अनिवार्यपणे याचा एखादा परिणाम व प्रभाव सुद्धा समोर आला पाहिजे. तो परिणाम अथवा प्रभाव सुद्धा समोर आली पाहिजे. तो परिणाम अथवा प्रभाव पारलौकिक जीवन व पारलौकिक जगच असू शकते, ज्याचा या जगाशी तोच संबंध आहे जो क्रिया व तिच्या परिणामात दिसून येतो.

या जगाला प्रभावहीन व परिणामशून्य म्हणण्याचा अर्थ असा होईल की जग हे एक उद्देशविरहित खेळ आहे. अशी धारणा करुन आम्ही जगाच्या वास्तविकतेला बदलू शकणार नाही, केवळ स्वत:च्या संकुचित भावनेचा परिचय देऊ. पवित्र कुराआनमध्ये स्पष्ट शब्दात म्हटले गेले आहे-

**''आम्ही या आकाशात व पृथ्वीली व जे काही या दोघांच्या दरम्यान आहे व्यर्थ निर्माण केलेले नाही. हा तर त्या लोकांचा गैरसमज आहे ज्यांनी इन्कार केला व इन्कार करण्यासाठी विनाश आहे (नरकाच्या) अग्नीपासून.''** -३८:२७

अर्थात, सृष्टी एखाद्या वास्तविक उद्देशविना आहे असे समजणारे आपल्या इन्कार व कृतघ्नतेच्या दुष्परिणामापासूनच वाचू शकणार नाहीत. सत्याचा विरोध त्यांना सर्वनाशाप्रत नेईल. त्यांच्या इन्कार करण्याने असे तर घडणार नाही की, ती वेळ येणार नाही जेव्हा जगाचे वर्तमान क्रियाकलाप समाप्त होऊन ते एक कायमस्वरुपी परिणामाच्या रुपात परिणत होईल. त्यावेळी इन्कार करणाऱ्यांचा आणि त्यांचा अवज्ञाकारी नीतीचा प्रभाव व परिणाम सुद्धा भयंकर रुपात त्यांच्या समोर येईल.

जर वर्तमान जगाचे प्रामाणिक अवलोकन केले गेले तर ईश्वराबाबतीत कोणत्याही

प्रकारच्या गैरसमजाला वाव नाही. जगातील कोणती अशी वस्तु आहे जिने स्वत:मध्ये अपार ज्ञान व तत्वज्ञानाच्या क्रियाशीलतेला तपविलेले नाही? एका कणापासुन ते मोठमोठ्या ग्रहापर्यंत ज्याला पहावे ते सर्वच एखाद्या अपार बुद्धी व बळाचे परिचायक आहेत. त्या बुद्धी व शक्तीसंबंधी असे समजणे की त्याने हे सर्वकाही निरुद्देश बनविले असेल असे कदापि सत्य ठरु शकणार नाही. पवित्र कुरआन म्हणतो,

**''आणि आम्ही हे आकाश व पृथ्वी आणि त्यांच्या दरम्यानातील वस्तू आम्ही काही खेळ म्हणून बनविल्या नाहीत. यांना आम्ही सत्याधिष्ठित निर्माण केले आहे परंतु यांच्यापैकी बहुतेकजण जाणत नाहीत. या सर्वांच्या उठविण्यासाठी ठरलेली वेळ निर्णयाचा दिवस आहे.''** -४४:३८-४०

**''यांनी कधी आपल्या स्वत:शी मनन-चिंतन केले नाही काय? अल्लाहने पृथ्वी व आकाशांना आणि त्या सर्व वस्तू ज्या त्यांच्या दरम्यान आहेत, सत्याधिष्ठित व एका ठराविक मुदतीसाठीच निर्माण केल्या आहेत. परंतु बहुतेक लोक आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करणारे आहेत.''** -३०:८

''काय तुम्ही हे समजून बसला होता की आम्ही तुम्हाला व्यर्थच निर्माण केले आहे आणि तुम्हाला आमच्याकडे कधी परतावयाचेच नाही? म्हणून सर्वोच्च आहे अल्लाह, खरा सम्राट, कोणी ईश्वर त्याच्याशिवाय नाही, स्वामी आहे महान सिंहासनाचा.'' -२३:११५-११६

''मनुष्याला असे वाटते की काय, त्यास (वाटेल ते करण्यासाठी) असेच सोडून देण्यात येईल?'' -७५:३६

पवित्र कुरआनच्या या आयतींवरुन अनेक गोष्टी लक्षात येतात. पहिली गोष्ट अशी की या जगाची रचना उद्देशासह झाली आहे. दुसरी गोष्ट अशी की वर्तमान व्यवस्था कायमस्वरुपी नाही, याचा एक ठराविक अवधी आहे. परंतु असेही नाहि की हा कारखाना एका निश्चित काळापर्यंत चालून एखाद्या उद्देशाची प्राप्ती व वास्तविक परिणामाविना कायमस्वरुपी लुप्त होऊन जाईल.

या आयती दर्शवितात की जर असे घडले तर जगाची रचनाच मुळापासून निरर्थक सिद्ध होईल. आणि वास्तविकतेच्या दृष्टीने याची अवस्था एका खेळापक्षा अधिक काही असणार नाही. शिवाय अल्लाहविषयी असा विचार करणे की त्यानी जगाला निरर्थक बनविले असेल, कोणत्याही प्रकारे बरोबर ठरु शकत नाही. आम्हाला जगात ईश्वराचा परिचय एक अपार तत्वदर्शी, सर्वज्ञ, बलवान, दयाळू वगैरे रुपात प्राप्त होतो.

वरील आयतीवरून या गोष्टीचे सुद्धा ज्ञान होते की जर या लोकानंतर कोणत्याही लोकात अल्लाहशी भेट होण्यावर विश्वास केले गेले नाही तर वर्तमान लोक निरर्थक सिद्ध होईल. जेव्हा मानव प्रत्यक्षपणे ईश्वराच्या समोर असेल ती वेळ चांगल्या लोकांकरिता किती सुखदायी व आनंदमय असेल आणि त्या लोकासाठी ती वेळ किती कठीण व भयानक असेल जे अत्याचारी आहेत? याचे विस्तारपूर्वक वर्णन पवित्र कुरआनमध्ये आढळते.

हे जग जर स्वत: परिपूर्ण असते तर यात कोणत्याही प्रकारची उणीव व न्यूनता कदापि दिसली नसती. याचा आशय व अभिप्राय तर अपूर्ण असू शकत नाही. जर आशय अपूर्ण असेल तर हे या गोष्टीचे सूचक असेल की रचनाकार पूर्णत्वापासून अनभिज्ञ आहे. ईश्वराबद्दल कोणत्याही प्रकारची अनभिज्ञता व अपूर्णतेची कल्पना केली जाऊ शकत नाही. ईश्वराच्या कोणत्याही बाबतीत असा विचार करणे की तो एखाद्या अपूर्ण स्थितीलाच अंतिम स्थिती ठरवील हे सत्य असू शकत नाही. ईश्वराच्या अपार ज्ञान व सामर्थ्याची द्योतक जगातील प्रत्येक लहान-मोठी वस्तू आहे. म्हणून हे मान्य करावे लागेल की वर्तमान लोकाचा (जगाचा) उद्देश खुद्द वर्तमान लोक नसून एखादे अन्य लोक आहे, ज्यात कोणत्याही प्रकारची कमतरता, न्यूनता अथवा दोष असणार नाही. अनिवार्यपणे या जगाचा अंत एखाद्या अशा लोकाच्या रूपात होणर आहे जे दोषरहित व परिपूर्ण असेल. वर्तमान लोक सार्वकालिक व शाश्वत नाही ही गोष्ट तर शास्त्रज्ञांनी सुद्धा स्वीकारली आहे. कारण या जगात ज्या भौतिक शक्ती क्रियाशील आहेत त्या सर्वच्या सर्व सीमित आहेत. उदाहरणार्थ सूर्य प्रत्येक क्षणी आपली अपार उष्णता खर्च करीत आहे. एक वेळा अशी अवश्य येईल जेव्हा त्याच्या उष्ण तापमानामध्ये घट येईल. पवित्र कुरआनचे म्हणणे आहे की, या लोकाचा अंत एका नवीन जगाचा लोकाच्या संरचनेची भूमिका सिद्ध होईल आणि तेच जग वास्तविकत: सध्य जगाचे लक्ष्य होय. त्याच लोकाकडे प्रत्येक वस्तु अग्रसर आहे. जर एखाद्या परिपूर्ण व दोषरहित जगाच्या अविर्भावाची शक्यता नसेल तर वर्तमान जग केवळ मिथ्या व सारहीन बनेल. आणि आम्ही ईश्वरासंबंधी अशी कल्पना देखील करु शकत नाही की तो एखादे असे कार्य करु शकतो. ज्याचा कोणताही वास्तविक व स्थायी उद्देश नाही. हेत कारण आहे की जे लोक जगाच्या रचनेसंबंधी विचार करतात त्यांची पुकार पवित्र कुरआनच्या शब्दात अशीच असते,

**"कसले नादान आहेत हे लोक की त्यांना अल्लाहचा भागीदार ठरवितात जे कोणतीही वस्तू निर्माण करीत नाहीत, उलट स्वत: निर्मिले जातात."**

-४:१९१

थोडक्यात असे की हे जग व्यर्थ बनविले गेले नाही तर याचा काही वास्तविक परिणाम अवश्य समोर येणार आहे, ज्यात लोकांचे बरे-वाईट कर्म आपला वास्तविक व कायमस्वरुपी प्रभाव दाखविल्याशिवाय राहणार नाहीत. त्याला कारण असे आहे की वर्तमान जगाची व्यवस्था आम्हाला येथे आपल्या इच्छेनुसार चांगले वाईट कर्म करण्याची सवलत देते. जर हे जग कर्मस्थळ व परीक्षागृह आहे तर अवश्य आमच्या समोर येईल, आणि हे वर्तमान लोकात नव्हे तर पुढे येणाऱ्या लोकात शक्य होईल. त्याला कारण असे की वर्तमान लोकाची व्यवस्थाच अशी आहे की येथे मनुष्य चांगले अथवा वाईट कर्म आपल्या इच्छेप्रमाणे करु शकतो. खरे पाहता फळाची इच्छा या लोकात केली जाऊ शकत नाही. येथे मोठमोठाले पापी व दुष्कर्मी आपल्या बचावासाठी क्लृप्त्या लढविण्यात सफल होऊ शकतील आणि मोठ्यात मोठ्या धर्मात्मा व सत्कार्य करणाऱ्यांना येथे कष्ट सहन करावे लागतील. वर्तमान जगात याची फारच थोडी संधी आहे की एखाद्या व्यक्तीला त्याच्या चांगल्या वाईट कर्माचे योग्य व पुरेपूर फळ दिले जाऊ शकेल.

## आवश्यकतापूर्तीचा व्यापक नियम

पवित्र कुरआनच्या दृष्टीने परलोक अथवा आखिरतच्या धारणेची पुष्टी त्या नियमानेसुद्धा होते ज्याच्या मानवाला चिर-परिचय आहे. ज्यावर मनुष्य भरोसासुद्धा करू शकतो. जर मानवाने त्यावर विश्वास केला नाही तर त्याचे निश्चितपणे जगात राहणे शक्य होणार नाही. परंतु काय विडंबना आहे ही की मानव ज्या सखोलात व व्यापकतेकडे दुर्लक्ष करतो. वास्तविकत: जर त्यांच्या खोलीत आम्ही शिरलो नाही तर आम्ही त्या बाबींची कोणतीही व्याख्यासुद्धा करू शकणारे नाही की ज्यांच्याशी आम्ही केवळ परिचितच आहोत, तर त्याचा आम्ही पूर्ण लाभसुद्धा घेतो. हा केवढा मोठा अन्याय आहे की निसर्गाच्या ज्या क्रियाशील नियमांनी आम्हाला अशी संधी दिली की आम्ही जिवंत राहावे आणि जीवनाचा पुरेपूर लाभ घ्यावा, त्याच नियमांवर आघात करण्यास आम्ही कुचराई करीत नाही. जणू काय त्यांच्याशी आमचे वैर असावे अथवा ते आम्हाला माहीतच नसावेत. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"काय ही वस्तुस्थिती नाही की आम्ही पृथ्वीला बिछाना बनविले, आणि पर्वतांना मेखांसमान रोवले, आणि तुम्हाला (पुरुष आणि स्त्रियांच्या) युगल रुपात निर्माण केले, आणि तुमच्या निद्रेला विश्रांतीसाठी बनविले आणि रात्रीला पांघरूण आणि दिवसाला उपजीविकेची वेळ बनविली आणि तुमच्यावर सात मजबूत आकाश कायम केले आणि एक अत्यंत तेजस्वी व उष्ण दीप निर्माण**

**केला. आणि ढगांतून निरंतर पाऊस वर्षविला जेणेकरून त्याद्वारे धान्य व भाजीपाला आणि घनदाट बागा उगविल्या. निःसंदेह निर्णयाचा दिवस एक निश्चित वेळ आहे.''** -७८:६-१७

सारांश असा की तुमची अशी कोणती गरज आहे जी पुरी केली जात नाही? जीवन जगण्यासाठी ज्या गोष्टींची आवश्यकता पडू शकत होती काय त्या गोष्टी तुम्हाला प्राप्त होत नाहीत? ही पृथ्वी, हे आकाश, सूर्य,चंद्र, हा पाऊस, हे धान्य व फळे-फुले काय तुमच्या गरजा दर्शविणारे व त्यांची पूर्तता करणारे नाहीत? मग या व्यवस्थेमुळे तुमचा या गोष्टीवर विश्वास का बसत नाही की जगात जो व्यापक नियम अंमलात आहे तो आवश्यकतांच्या पूर्ततेचा नियम आहे?

हा नियम ज्या व्यापक व सुदृढ रुपात जगात दिसतो त्यावरून या गोष्टीचा अनुमानच नव्हे तर विश्वास सुद्धा होतो की हा नियम आकस्मिक नव्हे तर योजनामूलक आहे. या नियमात फारच सजीवपणा व जागरूकता आढळते. या नियमाच्या सजीवपणा व जागरूकतेचे हे चिन्ह आहे की बाळाचे रक्षण व पालन-पोषणासाठी आईची मांडीच फक्त दिली नाही तर तिच्यात वात्सल्य व ममत्व भावनादेखील संचित केली गेली आहे.

आता हे कोण सांगू शकेल की हे जग चेतनेचे नव्हे तर अचेतन पदार्थाचा खेळ आहे? एखाद्या चेतन सत्तेपासूनच ही अपेक्षा केली जाऊ शकते की त्याने अबोध शिशुसाठी दयाभाव व वात्सल्य उपलब्ध करुन द्यावे व त्याच्या पालन-पोषणासाठी योग्य व्यावस्था करु शकावे. म्हणून हे मान्य करावे लागले की जगात आवश्यकतापूर्वीचा जो व्यापक नियम अंमलात आहे. चेतन सत्तेचा या जगापासून व या जगात क्रियाशील नियमाच्या माध्यमाने जो परिचय प्राप्त होतो त्यावरुन एखाद्या अशुभ गोष्टीची कदापि आशा केली जाऊ शकत नाही.

वात्सल्य, प्रेम, दया व करुणरुपी चेतनेची अपेक्षा एखाद्या चेतनेपासूनच केली जाऊ शकाते. येथे मागणी व आवश्यकतापूर्तीचा जो नियम कार्यान्वित आहे तो आकस्मितही नाही आणि निर्मूल सुद्धा नाही, कारण यात आकस्मिकपणा व निर्मूलतेचे चिन्ह अजिबात दिसत नाही. म्हणून या व्यापक नियमावर विश्वास केला जाऊ शकतो आणि याच्या संभावनेवर विचार केला जाऊ शकतो.

या नियमात परलोकाची संभावना सुद्धा लपलेली आहे. आमच्या काही गरजा अशासुद्धा आहेत की ज्या पुऱ्या होण्याची अद्याप वेळ आलेली नाही. त्या गरजांचा संबंध वर्तमानाशी नसून भविष्याशी आहे. त्या भविष्यातच पूर्ण व्हावयास हव्यात. जर त्या

भविष्यात पुऱ्या झाल्या तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखे काही नाही. मागण्या पूर्ण होण्याचा नियम इतका सशक्त आहे की भविष्यात आमच्या भविष्य काळीतील गरजा अवश्य पुऱ्या होतील. यात शंकेचे कोणतेही कारण नाही.

आईच्या पोटात बालकाला जे कान-डोळे व हात-पाय मिळतात, त्या अवयवांची मागणी अशी आहे की बालकाला त्या अवयवांचा प्रयोग करण्याची संधी प्राप्त व्हावी. आणि ही संधी बालकाला तेव्हा मिळते जेव्हा ते जमिनीवर आपले पाय ठेवते. पृथ्वीवर आल्यानंतर त्याला पाहणे, एकणे वगैरेचे अवयव मिळतात आणि चालण्या-फिरण्याची संधी सुद्धा. आशाप्रकारे त्याच्या सर्व अवयवांच्या मागणीची पूर्तता योग्यवेळी होते. अगदी त्याचप्रमाणे आमच्या त्या मागण्या व गरजांची पूर्तता सुद्धा त्याचवेळी होईल ज्या आज पूर्ण व्हावयाच्या दिसत नाहीत.

अशा आमच्या कोणत्या आवश्यकता आहेत की ज्या भविष्यकाळात अवश्य पूऱ्या व्हाव्यात? त्या त्याचा गरजा आहेत ज्यांचा संकेत आम्ही वर दिलेलाच आहे. मानवांची ही आवश्यकता आहे की त्याच्या जीवनरूपी कथेचा शेवट त्याच्या चारित्र्याप्रमाणे समोर यावा जेणेकरून त्याचे जीवन सार्थक होऊ शकावे. मानव जीवन खुद्द व आपापसात एकमेकाच्या संपर्कात येऊन इतके जटिल झाले आहे की त्याच्या गुंतागुंतीला पुरेपूर समजणेसुद्धा प्रत्येक व्यक्तीच्या आवाक्याबाहेरची गोष्ट असल्याचे दिसते. प्रत्येक व्यक्तीने स्वत:मध्ये किती राग-वैराग्य, आशा-निराशा, हास्य-रोदन, सत्चारित्र्य-कुचारित्र्य, न्याय-अन्याय लपविलेले आहेत आणि त्यांचे मूल्यांकन करणे त्या सत्तेच्याच सामर्थ्यातील गोष्ट असू शकते. जिने जीवन व चेतनेसारख्या विचित्र व आश्चर्यकारक गोष्टी दान म्हणून प्रदान केल्या आहेत. म्हणून एक अशी वेळ येणे अटळ ठरते जी जीवन व मानवतेसाठी निर्णायक सिद्ध व्हावी.

वर्तमान जगात आम्हाला मागणीपूर्ततेच्या नियमाचे दर्शन करविले गेले. यानंतर तर तो निर्णयाचा दिवस आमच्यासाठी काही अदृश्य व अशक्य कल्पना राहत नाही तर तो दिवस समजलेली-उमजलेली व चिरपरिचित गोष्ट बनतो. जर एखादा मनुष्य एखाद्या पक्षाला जमिनीपासून थोड्या अंतरावर उडताना पाहत असेल तर त्या मनुष्याला या गोष्टीचा स्वीकार करण्यात काही संकोच वाटेल का की तोच पक्षी आपल्या त्याच पंखाने आवश्यक वाटल्यास वायुमंडळात उंच उड्डान सुद्धा घेऊ शकेल. म्हणूनच जगाच्या वातावरणात पवित्र कुरआनचे हे कथन  निस्संदेह निर्णयाच्या दिवसाची वेळ निश्चित आहे. - काही अतिशयोक्तीपूर्ण नाही. जर या धारणेच्या विरुद्ध एखादा मनुष्य विचार करीत असेल तर त्याला स्वत:च्या मनोवृतीचे विश्लेषण केले पाहिजे. जर खरोखर एखादी अशी

निर्णायक वेळ येईल या गोष्टीचा तो स्वीकार करीत नसेल तर याचे कारण असे नव्हे की असा दिवस येणे अशक्य आहे, तर याचे खरे कारण स्वत:त्या मनुष्याच्या मनात लपलेले असते.

तो आपल्या संकुचितपणमुळे ईश्वर व त्याच्या कार्यरत असलेल्या मागणी-पूर्ततेच्या नियमाला एखाद्या कंजुष माणसाप्रमाणे श्रेय देत नाही आणि त्याला याची आशा वाटत नाही की दानशूरता, न्याय आणि दयाळूपणाचे एखादे भव्य व अक्षय रुप सुद्धा मानवतेसमोर येऊ शकते.

असा विचार खुद्द त्या व्यक्तीला हीन व कृतघ्न करतो. यामुळे ईश्वर व त्याच्या गुण व नियमामध्ये कोणतेही अंतर येऊ शकत नाही.

एखाद्याने जर स्वत:ला खोल खड्ड्यात झोकून आत्महत्या केली तर यात त्या उद्यान व बागांचा काय दोष ज्यात तो सुखाने जीवन जगू शकत होता. पवित्र कुरआन म्हणतो,

**"काय त्यांना हे उमगले नाही की ज्या अल्लाहने आकाश व पृथ्वी निर्माण केली तो या सारख्यांना निर्माण करण्याचे सामर्थ्य अवश्य राखतो? त्याने यांच्या पुनरुत्थानाची एक वेळ निश्चित केली आहे जिचे येणे नि:संशय आहे, पण अत्याचाऱ्यांचा हट्ट आहे की ते त्याचा इन्कारच करतील. हे पैगंबर (स.), यांना सांगा, जर एखादे वेळी माझ्या पालनकर्त्याच्या कृपेचे खजिने तुमच्या ताब्यात असते तर तुम्ही खर्च होण्याच्या भीतीने त्यांना जरूर रोखून ठेवले असते, खरोखरच मनुष्य मोठा संकुचित मनाचा आहे."** -१७:९९-१००

## निसर्गात परिवर्तनाचा नियम

मनुष्य पारलौकिक जीवनाचा इन्कार कोणत्या आधारे करतो? या इन्काराचे कोणतेही योग्य कारण नाही. हे मानवाचे अल्प ज्ञान व विद्रोह आहे की तो परलोकाचा इन्कार करुन जगरुपी काव्यापासून त्याच्या मधुमय भावार्थ हिरावून घेण्याचे दुष्कृत्य करीत आहे. काय त्याला परिवर्तनाचा नियम ठाऊक नाही? हा नियम तर असा नाही जो जग व जीवनासाठी सर्वथा अज्ञात असावा, अथवा ती अशी गोष्ट असावी की ज्याची कुणालीही कल्पना करता येऊ नये. जर असे असते तर आम्ही मनुष्याच्या विवशतेचा स्वीकार केला असता, परंतु जगात परिवर्तनाच्या नियमाचे प्रत्यंतर सर्वत्र येते. एका बीजातून अंकुर व अंकुरातून विशालकाय वृक्षाचे उभे राहणे एक महान परिवर्तन नाही काय? काय रात्रीनंतर दिवस आणि शीत ऋतुनंतर ग्रीष्मऋतुचे आगमन हे परिवर्तनाच्या

एका व्यावस्थित नियमाचा चमत्कार नव्हे काय? मग मानव खुद्द आपल्यासंबंधी विचार कोण करीत नाही? काय महान परिवर्तनानेच त्याला तुच्छ वीर्यपासून प्राणधारी व चालणारा फिरणारा मनुष्य बनवून उभे केले नाही? मग ही शक्यता मान्य करण्यात कोणती अडचण आहे की ज्या तऱ्हेने मानव विभिन्न परिवर्तनातून स्थितीतून गेला आहे. त्याचप्रमाणे त्याला आणखी एका परिवर्तनातून जावयाचे चिन्ह शिल्लक राहू नये? कोणत्याही प्रकाराची अपूर्णता किंवा उणीव खुद्द एक याचना आहे. प्रत्येक दोष व त्रुटी स्वतः दूर जाण्याची प्रतक्षा करीत असते. जीवन व जगाच्या रचनाकारांकडून ही अपेक्षा केली जाऊ शकत नाही की त्याने एखाद्या अस्तीत्वात मागणी अथवा त्रुटीला तर जागा ठेवावी, परंतु त्या मागणीची पूर्तता करण्याची कोणतीही व्यवस्था करु नये, जर एखादा असे समजत असेल की आमच्या अस्तित्वात कोणतीही उणीव नाही तर हा सुद्धा त्याच्या संकुचित दृष्टीचाच परिणाम आहे. काय ही आमच्या अस्तित्वाची अपूर्णता नव्हे की आम्ही दुःख, पीडा व क्लेशाची इच्छा करीत नाही, तरीसुद्धा जगात त्यापासून वाचू शकत नाही? काय आम्हाला वाटत नाही की आम्ही निरोगी व आरोग्यवान राहावे, म्हातारपणाने आमच्या शरीराला जर्जर करु नये आणि मृत्यूने आमच्या इच्छा आमच्याकडून हिसकावून घेऊन नयेत? काय आमच्या इच्छा आणि आमच्या अस्तित्वात एकात्मता आढळते? काय या विषम परिस्थिती ओरडून ओरडून सांगत नाहीत की मनुष्य अद्याप अपूर्ण आहे, अजून काही उणीवा आहेत. अद्याप काही त्रुटी आहेत, ज्या त्याच्याशी जुडलेल्या आहेत, ज्या दूर व्हावयाच्या आहेत? ज्या परम सत्तेने त्याला तुच्छ वीर्याने प्राणधारी मनुष्याचे रुप दिले तो त्याची वर्तमान दुर्बलता सुद्धा दूर शकतो. ही दुर्बलता व हे काही अभाव तर अशासाठी आहेत की मानवाने चिंतन करावे की त्याला जीवनात एका ईश्वराची व त्याच्याकृपेची गरज आहे व त्या ईश्वरासंबंधी असलेल्या कर्तव्याची जाणीव व्हावी. पवित्र कुरआनमध्ये याच तथ्याकडे संकेत करुन सांगितले आहे,

**''तोच तर आहे ज्याने तुम्हाला मातीपासून निर्माण केले, मग वीर्यापासून, मग रक्ताच्या गोळ्यापासून, मग तो तुम्हाला अर्भकाच्या रूपांत काढतो, मग तुम्हाला वाढवितो जेणेकरून तुम्ही आपल्या पूर्ण शक्तीप्रत पोहोचता. मग आणखी वाढवितो जेणेकरून तुम्ही वृद्धावस्था गाठावी. आणि तुमच्यापैकी एखादा अगोदरच परत बोलाविला जातो. हे सर्वकाही अशासाठी केले जाते की तुम्ही आपली ठरलेली वेळ गाठावी आणि अशासाठी की तुम्हाला वस्तुस्थिती कळावी.''**

-४०:६७

# प्रतिकाराचा नियम (Law of Retribution)

पवित्र कुरआनचे कथन आहे की, जगात मनोरथपूर्तीचाच नव्हे तर प्रतिकाराचा नियम सुद्धा कार्यरत आहे. जेव्हा एखाद्या जातीचा अत्याचार सीमा ओलांडतो तेव्हा त्या जातीला वाईट दिवस पहावे लागतात. ती जात एकतर पूर्णत: नष्ट केली जाते अथवा ती अत्यंत दयनीय व तिरस्कृत स्थितीपर्यंत पोहचविली जाते. तिचा प्रभाव संपुष्टात येतो. ती मागे पडते. पवित्र कुरआनमध्ये वर्णित या नियमाची पुष्टि इतिहासावरुन सुद्धा होते.

जगात कित्येक जातींचा आविर्भाव झाला ज्यांनी संस्कृती व आपल्या पराक्रमाने जगाला प्रभावित केले, परंतु त्याच जातींनी जेव्हा अनैतिकतेचा मार्ग अवलंबिला आणि जगातील भोग-विलासालाच सर्वकाही समजले, तेव्हा त्यांची सर्व शक्ती क्षीण पडली. मग एक तर त्या संपूर्णत: नष्ट झाल्या किंवा त्यांना दुसऱ्यांची गुलामी स्वीकारावी लागली. अशी जातींना आपल्या कर्माचे फळ भोगावे लागले. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"कित्येक वस्त्या आहेत ज्यांना आम्ही नष्ट केले. त्यांच्यावर आमचा प्रकोप अकस्मात रात्रीच्या वेळी कोसळला, अथवा दिवसाढवळ्या अशा समयी आला जेव्हा ते विश्रांती घेत होते."** -७:४

**"आम्ही यापूर्वी ज्या कोणा वस्तीला नष्ट केले आहे तिच्यासाठी एक विशिष्ट कार्यकालावधी लिहिली गेली होती."** -१५:४

यावरुन ज्ञात झाले की प्रत्येक जातीसाठी काम करण्याची व सुधारणा करण्याची सवड देण्याचे अगोदरच निश्चित केलेले असते. जर त्या जातीत सुधारणा झाली नाही आणि ती आपल्या अन्यायपूर्ण नीतीमध्ये परिवर्तन करण्यास तयार होत नाही तेव्हा त्या जातीला दुष्परिणामपासून कोणीही वाचवू शकत नाही.

**"हे पैगंबर (स.), जर ते (म्हणजे अश्रद्ध) तुम्हाला खोटे ठरवीत असतील तर त्यांच्यापूर्वी नूह (अ.) चे लोक व आद लोक आणि समूद लोक आणि इब्राहीम (अ.) चे लोक व लूत (अ.) चे लोक आणि मदियननिवास्यांनी देखील खोटे लेखले आहे आणि मूसा (अ.) यांनादेखील खोटे लेखले गेले आहे. त्या सर्व सत्याचा इन्कार करणाऱ्यांना मी अगोदर सवड दिली, मग पकडले, आता पाहून घ्या की माझी शिक्षा कशी होती. कित्येक अपराधी वस्त्या आहेत ज्यांना आम्ही नष्ट केले आहे आणि आज त्या आपल्या छतासह पालथ्या पडलेल्या आहेत, कित्येक विहिरी निरुपयोगी आणि कित्येक महाल भग्नावशेष बनले आहेत. काय हे लोक भूतलावर वावरत नाहीत की जेणेकरून यांची हृदये बोध**

**घेणारी व यांचे कान ऐकणारे बनले असते? वस्तुस्थिती अशी आहे की डोळे आंधळे नसतात तर ती हृदये आंधळी बनतात जी उरात स्थित आहेत.''**

-२२:४२-४६

हजारो वर्षाच्या मानव-इतिहासात आम्ही ज्याप्रकारे विभिन्न जातींचे उत्थान व पतन व्यवस्थितपणे निरंतर पाहत आहोत आणि त्या जाती व टोळ्यांच्या उन्नती व अवनतीमध्ये आम्हाला काही नैतिक कारणे आढळतात हे सर्व या गोष्टिचे द्योतक आहेत की जगात केवळ काही आंधळ्या व बहिऱ्या भौतिक शक्तीच क्रियाशील नाहीत तर मानव-इतिहासामागे एक सुदृढ प्रत्ययकाराचा नियम कार्यरत आहे.

या नियमानुसार जी जात नैतिक मर्यादांचा आदर करते आणि स्वत:मध्ये नैतिक ऱ्हास येऊ देत नाही, तिला उन्नती व प्रतिष्ठा प्राप्त होते आणि या उलट जी जात नैतिक मर्यादांचा त्याग करते आणि अत्याचाराचा मार्ग अवलंबिने तिला काही काळापर्यंत सवड व सुधारण्यासाठी संधी प्राप्त होते, परंतु जेव्हा ती आपल्या दुष्कृत्यापासून विमुख होत नाही तेव्हा मग तिचे पतन करुन असे फेकून दिले जाते की ती जगासाठी केवळ एक धडा बनून राहते.

या प्रतिकाराच्या नियमावर जेव्हा आम्ही गंभीरतापूर्वक विचार करतो तेव्हा प्रत्यक्षपणे हा नियम एका अन्य लोकाची (जगाची) अपेक्षा करतो ज्यात व्यक्ती, जाती व सामूहिक रुपाने संपूर्ण मानव जातीला न्याय मिळावा. त्याला कारण असे आहे की एखादी अत्याचारी जात केवळ नष्ट झाल्याने पूर्णपणे न्यायाच्या सर्व मागण्या पुऱ्या होत नाहीत. या विध्वंस व विनाशामुळे त्या अत्याचारी मंडळींना अजिबात शिक्षा मिळत नाही जे विनाशापूर्वी भोग-विलासात सुखाने जीवन व्यतीत करुन इहलोक सोडून गेलेले असतात. विनाश व प्रकोपाच्या कचाट्यात तर ते लोक सापडतात जे विनाशाच्या वेळी हजर असतात. ते लोक अथवा पिढ्या सहज वाचतात ज्यांनी दुराचाराचे बीज पेरले आणि अत्याचार व जुलुमाला प्रोत्साहन देण्यात मदत केली.

यामुळे त्या त्रस्त व पीडित लोकांना न्याय मिळत नाही ज्यांच्या शवावर अत्याचाऱ्यांनी आपल्या भव्य महालाजी निर्मीती केलेली असते. या विनाशाने त्या आत्याचाऱ्यांना शिक्षा मिळत नाही, जे आपल्या पाठीमागे कित्येक पिढ्यासाठी मार्गभ्रष्टता व अनैतिकतेचा वारसा सोडून जातात आणि त्यामुळे कोट्यावधी व अब्जावधी लोक प्रभावित होतात.

जगात यातना पाठवून तर ईश्वर अत्याचाराला एका सीमेच्या बाहेर जाऊ देत नाही, परंतु न्याय व निर्णयाचे हे मूळ कार्य तर शिल्लकच राहते की प्रत्येक अत्याचाऱ्याला

त्याच्या अत्याचाराचा मोबदला दिला जावा आणि प्रत्येक पीडित माणसाला जी हानि पोहचली आहे त्याची नुकसानभरपाई केली जावी, आणि त्या लोकांना चांगला मोबदला व सन्मान दिला जावा जे दुराचाराच्या भयंकर वातावरणात सुद्धा सत्य व न्याय व त्यासाठी अनेक प्रकारच्या यातना सहन केल्या. हे सर्व अनिवार्यपणे एकदे होणे अटळ आहे.

प्रतिकाराच्या नियमाजी प्रवृत्ती व स्वभाव खुद्द याची शाश्वती देतात की असे होणे शक्यच नव्हे तर अवश्य होणार आहे. जर असे झाले नाही तर जगात कार्यान्वित या नियमाचा आम्ही कोणताही संतोषजनक अर्थ लावू शकत नाही. तो तर आपल्या ठरलेल्या वेळी येणारच. एखाद्या इन्कारामुळे काहीही फरक पडणार नाही. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''(त्या दिवशी ती गोष्ट घडेल.) कोणत्या दिवसासाठी हे काम तहकूब ठेवले गेले आहे? निर्णयाच्या दिवसासाठी.''** -७७:१२-१३

पूर्ण न्याय व पूर्ण प्रतिकारासाठी ज्या प्रकाराच्या लोकाची (जगाची) अपेक्षा आहे तो तर अद्याप परोक्षात आहे. न्यायाच्या वर्तमान लोकात अनेक गोष्टींवर परीक्षाचे आवरण पडलेले आहे. न्यायाच्या सर्व मागण्या पुऱ्या होऊ शकत नाहीत उदाहरणार्थ न्यायाची एक अशी सुद्धा मागणी आहे की अपराध्याच्या समक्ष त्याच्या कर्माचे संपूर्ण विवरण त्याच्या दुष्परिणामासह प्रस्तुत केले जावे: आणि त्याला आपल्या ईश्वराच्या न्यायालयात उभे केले जावे सर्व प्रकारचे साक्षीदार व पुरावे सादर केले जावेत आणि त्या लोकांनी आपल्या डोळ्यांनी त्याला शिक्षा होत असता पहावे, ज्यावर त्याने अत्याचार केले होते व त्या पीडित लोकांना त्याने जे नुकसान पोहचविले होते त्याची नुकसानभरपाई सुद्धा व्हावी.

स्पष्ट आहे की या लोकात (जगात) अशा न्याय व प्रतिदान अथवा प्रत्यपकाराची शक्यता नाही. वर्तमान लोक तर परीक्षास्थळ आहे, येथे परीक्षाला अशाप्रकारे उघड केले जाऊ शकत नाही कोणासाठी त्याचा इन्कार करण्याची संधीच शिल्लक राहू नये. जर असे घडले तर मग परीक्षेचा उद्देश पूर्ण होऊ शकत नाही. म्हणून आम्हाला येणाऱ्या न्यायाच्या दिवसाचा इन्कार नव्हे तर त्याची प्रतीक्षा केली पाहिजे आणि त्याला लांब अथवा अशक्य म्हणण्याची चूक करता कामा नये.

## अनुक्रिया अथवा प्रतिक्रियाचा नियम

मानव जीवन जगाच्या वास्तविकतेपासून स्वत:ला अलिप्त ठेवू शकत नाही. मानव जो काही विचार करतो अथवा जे कार्य करतो तो केवळ विचार अथवा कार्य नसून वास्तविकतेशी एक प्रकारचा व्यवहार असतो. मानव एखाद्या वास्तविकतेच्या भूमीवर उभा आहे. मग हे कसे शक्य होऊ शकते की त्याच्या विचार अथवा कार्याची कसलीही प्रतिक्रिया असू नये? प्रतिक्रियेच्या अनुभूतीत थोडा विलंब होऊ शकतो, परंतु विलंबाचा अर्थ असा कधीच नसतो की त्याच्या कार्याची मुळी कसलीच प्रतिक्रिया नसते. मनुष्य एक उत्तरदयी प्राणी आहे. त्याच्या कर्माची जी काही प्रतिक्रिया होईल ती अवश्य त्याच्या समोर येईल. पवित्र कुरआन सांगतो की, मानवाच्या कर्माच्या प्रतिक्रियेवर सदैव पांघरुण पडून राहणार नाही. ती तर त्याच्या समोर येईल आणि मानवाचे सत्कर्म व दुष्कर्म आणि मग त्या निर्णयानुसार त्याला चांगले अथवा वाईट स्थान मिळेल. ईश्वराच्या या योजनेला निष्फळ करण्याचे जर कोणा व्यक्तीमध्ये धाडस व शक्ती असेल तर त्याने प्रथम रात्रीला ढळण्यापासून व सूर्याला उगवण्यापासून रोखून दाखवावे. पवित्र कुरआनमधून एक उदाहरण घ्या,

**''तर नव्हे मी शपथ घेतो संध्या-लालीमाची, आणि रात्रीची व जे काही ती समेटून घेते आणि चंद्राची जेव्हा तो पूर्णचंद्र बनतो, तुम्हाला जरूर क्रमाक्रमाने एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेकडे वाटचाल करीत रहावयाचे आहे.''**

-८४:१६-१९

या आयतीत सांगितले गेले आहे की मानवाचे जीवन वास्तविकत: नष्ट होण्यासाठी नव्हे तर पूर्णत्व प्राप्त करणयासाठी आहे. मानव-जीवन एक अशा जीवनात परिवर्तित होणार आहे, जे अगदी पूर्ण असेल. ज्या प्रकारे आकाशाची सांध्य-लालिमा क्रमश: वाढत जाते, ज्याप्रकारे रात्र येते आणि पूर्णपणे आच्छादित होते व जसा चंद्र वाढत वाढत पौर्णिमेचा चंद्र बनतो तसेच मानवालासुद्धा पूर्णत्व प्रप्त करावयाचे आहे. त्याचा प्रकाशदेखील पूर्णत्वाला पोहचेल. स्थितीमधील परिवर्तन काही अशी गोष्ट नव्हे की ज्याचे उदाहरण जगात व जीवनात आढळत नसावे.

आम्ही पाहतो की संध्याकाळ होताच दिवस जातो. मग रात्र आपली सावली सर्वावर घालते. दिवसाचे वातावरण पूर्णत: बदलते. अशाच प्रकारे एक दिवस असा येईल जेव्हा संपूर्ण जगाला एक नवीन वातावरण मिळेल. त्या दिवशी मानव अनुभूतींच्या अंतिम टप्प्यात पाऊल टाकीत असेल. आमच्या समोर असे दृश्य प्रत्येक महिन्याला येते

की चंद्र हळूहळू वाढत जाऊन पूर्ण चंद्र बनतो. मग हे कसे शक्य आहे की चंद्र जो मानवाच्या सेवेत मग्न दिसतो. त्याने तर पूर्णत्वाला गाठावे आणि मानवासाठी पूर्णत्वाला पोहचण्याचा कोणताच उपाय नसावा? निश्चितच मानव एक असले जीवन प्राप्त करण्यात यशस्वी होईल ज्यात विवशता त्याचा हात धरु शकणार नाही.

मानवाने लांब न जाता त्याने स्वत:चे रंग-रुप पहावे तर सत्य प्राप्त करण्यात त्याला कोणतीच अडचण येणार नाही. त्याला असे वाटेल की खुद्द त्याचे रंग-रुप सुद्धा मोठमोठ्याने सांगत आहे का वास्तविकता केवळ तितकीच नव्हे जी आज मानवाच्या समक्ष आहे तर येणारा एक भविष्यकाळ सुद्धा आहे आणि हा आज येणारा उद्याचाच एक अंश आहे. पवित्र कुरआनचे शब्द असे आहेत,

**"त्याने पृथ्वी आणि आकाशांना सत्याधिष्ठित निर्माण केले आहे, आणि तुमचे स्वरूप बनविले आणि फारच छान छान बनविले आहे. आणि त्याकडेच सरतेशेवटी तुम्हाला परतावयाचे आहे."** -६४:३

मानवाने विचार केला पाहिजे का जेव्हा त्याला शरीरच नव्हे तर शारीरिक रंग-रुप व सौंदर्य सुद्धा प्राप्त झाले आहे तेव्हा हे कसे शक्य आहे की त्याला अस्तित्व तर मिळले असावे, परंतु ते अस्तित्व (जीवन) आत्मिक व आंतरिक सौंदर्यापासून वंचित असावे. मृत्युला जीवन-यात्रेचा शेवटचा टप्पा समजणे वास्तविकत: या गोष्टीचा स्वीकार करणे होय की मानव-जीवन कोणत्याही वास्तविक उद्देश व भावमय सुंदरतेपासून रिक्त आहे. हा विचार ईश्वरावर लांछन आहे जो अक्षम्य आहे. मानवाच्या सुंदरतम रुपाप्रमाणेच त्याच्या जीवनाचे लक्ष्य सुद्धा महान व सुंदरतम आहे. मनुष्याची वास्तविक लक्ष्य-पूर्ति तर त्याच्या ईश्वराशी मिलनाने होऊ शकते की ज्याचे स्पष्ट संकेत वरील आयतीत आढळते.

*अध्याय- ३*

# आपल्या मनाची आकांक्षा

## नैतिकतेची मागणी

जर एखाद्याने नैतिक दृष्टिकोनाने विचार केला तरीदेखील त्याला परलोकाच्या धारणेला सत्य मानावे लागेल. म्हणूनच आधुनिक दार्शनिकापैकी काण्टने हे स्वीकार केले आहे की जर आम्ही पारलौकिक जीवन अर्थात मृत्युनंतरचे जीवन असते हे मान्य केले नाही तर आम्ही नैतिकतेला मानव जीवनात कोणतेही स्थान मिळणार नाही. वास्तविकत: नैतिकता मानव जातीची एक व्यावहारिक आवश्यकते आहे जिचा इन्कार केला जाऊ शकत नाही.

जगात आम्ही पाहतो की मानवाच्या अधिकारात कित्येक गोष्टी दिल्या गेल्या आहेत. पाणी व जमिनीवरच नव्हे तर वायुमंडळावर सुद्धा त्याचा अधिकार आहे. जगातील सर्व वस्तूंना तो आपल्या प्रयोगात आणतो. त्याला स्वत:ला चेतना, बुद्धि, संकल्प. इच्छा व विचारशक्तीने विभूषित केले गेले आहे. शिवाय या बाबतीत त्याला स्वातंत्र्य प्राप्त आहे की तो आपल्या जीवनात स्वेच्छेने चांगल्या अथवा वाईट मार्गाचा अवलंब करु शकतो. त्याने इच्छिले तर तो न्यायप्रिय बनून जनकल्याणाचे कार्य करु शकतो अथवा तो जगात अत्याचार व उपद्रवाचे बीजारोपण करु शकतो. आणि दुसऱ्यांना त्रास देण्यात व कलह निर्माण करण्यास कारणीभूत ठरु शकतो.

या शिवाय मानवात नैतिक चेतनादेखील आढळते, आर्थात तो चांगले व वाईटमध्ये फरक करु शकतो. आणि त्याला हे मान्य आहे की सत्कर्माचा मोबदला चांगला व दुष्कर्माचा मोबदला वाईट मिळाला पाहिजे. याच नैतिक चेतनेच्या आधारावर जगात न्यायालयांची स्थापना झालेली आहे, जेथे गुन्हेगारांना शिक्षेस पात्र समजले जाते व योग्य माणसांना त्यांचे हक्क दिले जातात, आणि कोणाचे असे धाडस नाही का त्याने या कायद्याचा विरोध करावा. यावरुन मग हा संकेत मिळत नाही का की या जगात मानवाला जे अधिकार, शक्ती, नैतिक चेतना व स्वातंत्र्य प्राप्त आहे त्यांचा हिशेब एके दिवशी अवश्य घेतला जाईल? जो ईश्वर मानवाला इतके विपुल अधिकार व कार्य करण्याच्या संधी प्रदान करतो आणि खुद्द मानवाच्या अंतरात्म्याला बरे-वाईट ओळखण्याची क्षमता देऊ शकतो. मग त्याला मानवाच्या कर्माचा हिशेब कसा घ्यावा हे कळणार नाही का?

आम्ही जगात पाहतो की जे लोक या जगात आयुष्यभर प्रामाणिक व पुण्यशील राहिले. ज्यांनी न्याय व सत्यविरुद्ध कोणतेही पाऊल उचलले नाही. पुष्कळ लोकांच्या सेवेत निमग्न राहिले. जे कधी ईश्वराशी विमुख झाले नाहीत की त्यांनी कधी कुणाचा हक्क मारला नाही तरी सुद्धा त्यांचे जीवन दु:खपूर्ण गेले. त्यांना विभिन्न दु:खांना व कष्टांना तोंड द्यावे लागले. शेवटी त्रासाच्या स्थितीतच ते जग सोडून गेले.

या उलट येथे अशा लोकांची सुद्धा उणीव नाही की जे आयुष्यभर जुलुम व अत्याचारच करीत राहिले. असे कोणतेही दुर्गुण नाही जे त्यांच्यात नव्हते, परंतु जगातील सुख व संसारिक वैभवाच्या दृष्टीने ते अत्यंत संपन्न राहिले. त्याचे संपूर्ण जीवन अथवा जीवनाचा अधिकांश सुखातच गेला. अखेर याचे रहस्य तरी काय आहे? काय ईश्वराच्या दृष्टीने पुण्यशील व सदाचारी लोकांचे कोणतेही विशेष स्थान नाही? काय ईश्वराच्या नजरेत ते उपेक्षित आहेत व दुराचारी व अत्याचारी लोक ईश्वराला प्रिय आहेत?

असे असणे शक्य नाही. जो ईश्वर फुलांना सौंदर्य प्रदान करतो. त्याला सौंदर्याचे ज्ञानदेखील आहे. त्याच्या दृष्टीने सुंदर व असुंदर समान असू शकत नाहीत. म्हणून हे मान्य करावे लागेल की सदाचारी लोकांचा हक्क मारला जाऊ शकत नाही. त्यांना आपल्या सत्कर्मांचा मोबदला मिळाल्याशिवाय राहणार नाही आणि दुष्ट लोकांना आपल्या कुकर्मांची शिक्षा भोगावीच लागेल. आणि ईश्वर या बाबतीत कदापि असावधानी दाखवू शकत नाही. या जगात विभिन्न कारणामुळे लोकांना त्यांच्या कर्माचा पुरेपूर मोबदला दिला जाऊ शकत नाही. त्याकरिता तेच जीवन अपेक्षित आहे जे मानवाला मृत्युनंतर प्राप्त होते. आता आपण पाहू या की पवित्र कुरआन या बाबतीत कसा प्रकाश टाकतो.

**"काय आम्ही अशा लोकांना जे श्रद्धा ठेवतात व सत्कृत्ये करतात आणि त्या लोकांना जे पृथ्वीवर उपद्रव माजविणारे आहेत, एकसमान करावे? काय ईशपरायणांना दुराचाऱ्यांप्रमाणे करावे?"** -३८:२८

**"काय ते लोक ज्यांनी अपकृत्ये केली आहेत, असा समज करून बसले आहेत की आम्ही त्यांना, आणि श्रद्धावंतांना व सत्कृत्ये करणाऱ्यांना एकसमान बनवू की त्यांचे जिणे व मरणे एकसारखे व्हावे? फार वाईट हुकूम आहे जे हे लोक लावीत आहेत."** -४५:२१

अंतिम दिनाचा इन्कार करणारे म्हणत असत की जेव्हा मृत्युनंतर आम्ही मातीशी एकरुप होऊ तेव्हा आम्हाला तो जिवंत करुन उभे करील आणि आमच्या कर्मांचा हिशेब घेईल? जीवन म्हणून जे काही आहे ते हेच होय. यापुढे कोणतेही जीवन नाही की

कोणताही हिशेब-ठिशेब नाही. त्यांच्या या चुकीच्या धारणेचे उत्तर म्हणून असे म्हटले जात आहे की ते ज्या भंपकपणाच्या गोष्टी सांगत आहेत त्यावर त्यांनी थोडा विचार करावा की त्यांच्या अशा प्रकारच्या गोष्टींचा काय अर्थ निघतो?

त्यांनी विचार केला पाहिजे की जर मृत्युनंतर कोणतेही जीवन नाही तर याचा अर्थ असा झाला की चांगले लोक असोत किंवा वाईट सर्वांना एकच परिणाम भोगावा लागेल. सर्वजण मरुन कायमचे लुप्त होतील. मनुष्याने जर थोडा बुद्धीचा प्रयोग केला तर तो असा विचार करु शकणार नाही. जर सदाचार व दुराचार दोन्ही समान नाहीत तर त्यांचा परिणाम एक समान कसा असू शकेल? न्याययुक्त व बुद्धिसंगत गोष्ट तर अशीच असू शकते की मृत्युनंतर एखादे जीवन असावे ज्यात मनुष्याला त्याच्या चांगल्या-वाईट कर्मांचे फळ मिळू शकावे.

पवित्र कुरआनमध्ये आहे की जे लोक जगात ईश्वराला विसरले आहेत आणि ते सत्याचा स्वीकार करण्याऐवजी त्याला हसण्यावारी टाळू इच्छितात त्यांना अंतिमदिनी सांगितले जाईल,

**''काय तुम्ही हे समजून बसला होता की आम्ही तुम्हाला व्यर्थच निर्माण केले आहे आणि तुम्हाला आमच्याकडे कधी परतावयाचेच नाही?''** -२३:११५

अर्थात अखेर तुम्ही असा तर विचार केला नाही की जर पुण्य व पापाच्या कोणत्याही लोकांत (जगात) मोबदला मिळत नाही, तर मग जीवन व जगाची रचनाच व्यर्थ असल्याचे सिद्ध होईल. अखेर तुम्ही अशी समजूत कशी करुन घेतली की ईश्वर सदाचारी व दुराचारी दोघांना एकच समान वागणूक देईल? अशी समजूत करुन घेताना तुमची चेतना कोठे झोपी गेली होती? तुमच्या मनात जर असा विचार का आला की जगाचा एखादा वास्तविक व शाश्वत परिणाम समोर येणार नाही तर असा विचार का आला नाही की अशा प्रकारचा विचार जगाच्या सृष्टिकर्त्यांशी केवळ अन्याय आहे? तुम्ही आपल्या जगातील लाभ-हानीविषयी जर इतके बेसावध असत नव्हता तर मग सत्याच्या बाबतीत तुमच्या या बेपर्वाईचा अर्थ याशिवाय अन्य काय घेतला जाऊ शकतो की तुमची वास्तविक मनोवृत्तीच अपराधाची होती की ज्यामुळे तुम्ही ईश्वरासंबंधी कोणतीच योग्य धारणा बनवू शकला नाही आणि जीवनासंबंधी कोणत्याही जागरुकतेला तुम्ही स्वतःमध्ये स्थान देऊ शकला नाही.

आशा स्थितीत आता तुम्ही स्वतः समजू शकता की तुमचे स्थान पारलौकिक जीवनात काय असू शकते? जर तुमची कुचेष्टा व तिरस्कृत नीति आणि तुमचे घोरतम

अपराध असून देखील तुम्हाला स्वर्गाचे सुख व वैभव सोपविले गेले तर असे आम्ही पूर्वी सुद्धा करु शकतो असलो मग अजूनपर्यंत तुम्हाला स्वर्गापासून दूर ठेवण्याची काही गरज नव्हती. स्वर्गाचे प्रवेश करणे तुम्ही पसंत केले, ज्या दाराने येऊन तुम्ही येथे पोचला आहात ते स्वर्ग नसून नरक आहे. या बाबतीत जर तुमची काही तक्रार असू शकेल तर ती अन्य कोणा विरुद्ध नसून तुमच्या स्वत: विरुद्ध असू शकेल.

मानवात नैतिक चेतना आढळते, परंतु या नैतिक भावनेला तोपर्यंत काहीही अर्थ नाही जोपर्यंत काही अशी नैतिक मूल्ये व मान्यतांचा स्वीकार केला जात नाही ज्या स्थायी असाव्यात. ज्यांचा आदर मानवाने प्राण देऊन सुद्धा करु शकावे. अशा नैतिक मूल्यांचा स्वीकार करण्यासाठी आम्हाला काही अन्य गोष्टींचा सुद्धा स्वीकार करावा लागेल. राशडलने लिहिले आहे की, याकरिता सर्वप्रथम हे मान्य करणे आवश्यक आहे की हे जग निरुद्देश निर्माण केले गेले नाही तर जगाच्या सृष्टीचा उद्देश असा आहे की जगाने ती सामुग्री एकत्रित करावी की ज्यायोगे मानव आत्म्याने आपल्या उद्देशांची प्राप्ती करु शकावे. (The Theory of Good and Evil, Vol.II, P.253)

दुसरी ही गोष्ट मान्य करणे आवश्यक आहे की मानव-आत्मा एक स्थायी व स्वतंत्र वास्तविकता आहे. भौतिक शरीरात कोणत्याही परिवर्तनाने ती प्रथा प्रभावित होऊ शकत नाही. तो त्या कर्मांचे स्वत: कारण आहे, अर्थात मानवी कर्म त्याच्या आंतरिक भावनांना व्यक्त करतात. (The Theory of Good and Evil, Vol.II, P.200-205)

तिसरी गोष्ट जी मान्या करावी लागेल ती अशी की मानवाचे वर्तमान कर्मे त्याच्या भविष्याला प्रभावित करतात. जसे त्याचे वर्तमान कर्म असतील त्याच प्रकारचा त्याचा 'उद्या' असेल. याकरिता जीवनाच्या अखंडतेचा स्वीकार करावा लागेल.

याशिवाय सर्वात आवश्यक गोष्ट अशी आहे की ईश्वरावर विश्वास ठेवावा लागेल. कारण असे की नैतिक आदर्श मनाव्यातिरिक्त अन्यत्र कोठेही आढळू शकत नाही. आणि एक निरपेक्ष व परम नैतिक आदर्श निपरेक्ष व परम मनातच असू शकते, जे प्रत्येक वास्तविकतेचे उगमस्थान व मूळ स्रोत आहे.

(The Theory of Good and Evil, Vol.II, P.212-220)

रांशडल ने लिहिले आहे की एक निरपेक्ष नैतिक नियम अथवा नैतिक लक्ष्य भौतिक वस्तूमध्ये अढळूच शकत नाही.

(The Theory of Good and Evil, Vol.II, P.214)

जर आमच्या नैतिकतेची भावना विद्यमान आहे तर ही या गोष्टीचे प्रमाण नव्हे

काय की दुसऱ्या त्या गोष्टी सुध्दा आवश्य अस्तित्वात आहेत की ज्यांच्याविना नैतिकतेची भावना निरपेक्ष असल्याचे सिद्ध होते? म्हणून हे मान्य करावे लागेल की जर आमच्यात नैतिक चेतना अस्तित्वात आहे तर अनिवार्यपणे ईश्वर सुद्धा आहे. आत्माही आहे आणि आत्म्याचे भविष्य परलोक देखील आहे. ही गोष्ट अशीच आहे जसे की एखादे फूल पाहून आम्ही हे मान्य करण्यास विवश होतो की जर फूल आहे तर एखादे वृक्ष अथवा रोपटे सुद्धा असेल. त्याच्या मुळ्याही असतील व पाने सुद्धा.

जगात कोणताही मनुष्या असा नव्हे की ज्याच्यात अंतरत्मा नावाची गोष्ट नसावी. प्रत्येकात भलेपणा व वाईटपणा असल्याची प्रचीति येते. ही गोष्ट वेगळी की चांगुलपणा व वाईटपणाच्या बाबतीत लोकांत काही मतभेद असू शकतील परंतु हे एक सत्य आहे ज्याला खोटे ठरविले जाऊ शकत नाही की मानवात चांगुलपणा व वाईटपणाचा विवेक विद्यमान आहे.

हे खुद्द मानवाच्या स्वतःच्या अस्तित्वात अंतिम दिनाचे असे जिवंत प्रमाण आहे जे सदैव त्याला राहण्याची शिकवण देते. जेव्हा मनुष्य एखादा अपराध अथवा दुष्कृत्य करतो तेव्हा त्याचा अंतरत्मा त्याला धिक्कारतो व जेव्हा एखाद्या माणसाच्या हातून एखादे सत्कार्याचे व पुण्याचे कृत्य घडते तेव्हा त्याला हार्दिक प्रसन्नता होते. हे या गोष्टीचे प्रमाण नव्हे काय की काही गोष्टी मानवासाठी निंद्य व काही प्रशंसनीय आहेत. जर पुण्य व पाप समान नाही तर यांच्या प्रभाव व परिणामात सुद्धा अवश्य अंतर असेल. प्रश्न असा आहे की हे अंतर अनिवार्यपणे केव्हा स्पष्ट होईल? जेव्हा हे अंतर स्पष्ट होऊन समोर येईल तोच प्रलयाचा दिवस असेल. खुद्द पवित्र कुरआनने हा मानसशास्त्रीय तर्क या शब्दात व्यक्त केला आहे,

**''नव्हे, मी शपथ घेतो पुनरुत्थानाच्या दिवसाची आणि नाही, मी शपथ घेतो निर्भत्सना करणाऱ्या मनाची काय माणूस असे समजतो की आम्ही त्याच्या हाडांना गोळा करू शकणार नाही?''**
-७५:१-३

कियामत अर्थात परलोकाच्या खरेपणाबद्दल या आयतीत एक मानसशास्त्रीय प्रमाण प्रस्तुत केले गेले आहे. मनुष्याचा स्वतःचा आत्मा त्याला काही कृत्याबद्दल धिक्कारतो व विचारणा करतो. जर मनुष्य निरंकुश प्राणी असता की त्याने मनात येईल तसे करावे व ज्याची इच्छा नसेल ते करु नये तर त्याची मनःस्थिती अशी असावयास नको होती. परलोक व मनुष्याच्या चौकस आत्म्यामध्ये गहन संपर्क आढळतो, म्हणूनच दोघांना एकत्र आणले गेले आहे. आमचा अन्तरात्मा आमच्यात कियामत अथवा परलोकाचा साक्षीदार म्हणून असतो. आम्ही आमच्या दुराचाराला जरी दुसऱ्यापासून

लपविण्यात यशस्वी झालो तरी स्वतःच्या अन्तरात्म्यापासून ते लपवू शकत नाही. आमचा आत्मा आमच्या समक्ष आमची सर्व खरी-खोटी कृत्ये प्रस्तुत करतो. हेच वैशिष्ट्य कियामताचे सुद्धा आहे. जेव्हा कियामत येईल तेव्हा लोकांसमोर ते सर्व काही ठेवले जाईल जे त्यांनी जगात केले होते.

असे म्हणणे सुद्धा बरोबर नव्हे की अपराध्यासाठी त्याच्या अन्तरात्म्याकडून होणारी निर्भत्सनाच त्याच्यासाठी पुरेशी शिक्षा आहे. आणि सदाचाऱ्यासाठी त्याच्या मनाचा संतोष व समाधानच सर्वात मोठा मोबदला आहे. अशा प्रकारच्या गोष्टी करणाऱ्यांना जर पाहिले तर असे आढळेल की स्वत: त्यांनी जगात कधीच थोड्यावर समाधान मानले नाही, परंतु अंतिम दिनाला न मानण्यासाठी ते हव्या त्या क्लृप्त्यांचा प्रयोग केल्याशिवाय राहत नाहीत.

प्रश्न असा आहे की एखाद्या निर्दोष व्यक्तीची हत्या केल्यानंतर जर लगेच खुनी एखाद्या अपघातात मेला तर त्याच्याजवळ इतका वेळदेखील उरत नाही की त्याच्या आत्म्याने त्याचा धिक्कार करावा. अशाच प्रकारे असेदेखील शक्य आहे की सत्य व न्यायासाठी मैदानात उतरलेल्या व्यक्तीचा अकस्मातपणे एखाद्या आघाताने मृत्यू व्हावा, अशा स्थितीत त्याच्या आत्म्याला संधीच मिळू शकत नाही की त्याने असा विचार करून प्रफुल्लित व्हावे की त्याने उच्च उद्देशासाठी आपले प्राणार्पण केले आहे.

## अपूर्णतेकडून पूर्णतेकडे

सध्याचे लोक (जग) आपली वैशिष्ट्ये व सुदृढ व्यवस्था असूनदेखील अपूर्ण आहे. ही अपूर्णता अकारण नाही तर ही अशासाठी आहे की मानवाच्या विवेकाची परीक्षा व्हावी. ही अपूर्णता जगाच्या अतिरिक्त संभावनांची कल्पना देते.ही अपूर्णता या गोष्टीची संधी उपलब्ध करून देते की मानवाने आपले चारित्र्य निर्माण करू शकावे. आम्ही सर्वजण जाणतो की एखादे चारित्र्य व्यक्त व विकसित होण्यासाठी आवश्यक आहे की मनुष्याला सदाचार अथवा दुराचार या दोहोंपैकी कोणाचाही अवलंब करण्याची संधी प्राप्त व्हावी. हेच कारण आहे की मानवाशिवाय जड पदार्थ व पशुमध्ये आम्हाला जे काही व्हावयाचे आहे अथवा ईश्वर ज्या अंतिम रूपात पाहू इच्छितो त्याच्या निर्मितीत स्वत: आम्हाला सुद्धा काही भूमिका वठवावयाची आहे, स्वत: आम्हालादेखील काही भाग घ्यावयाचा आहे.

जर आम्हाला त्यात एखादा भाग घ्यावयाचा नसता तर जे काही आम्हाला व्हावयाचे आहे ते आम्ही एकदम झालो असतो. ईश्वराला कदपि कोणत्याही प्रतीक्षेची

गरज भासली नसती. वर्तमान जीवन वास्तविकत: अशासाठी मिळाले आहे की आम्ही यातील संभावनांचे ज्ञान घ्यावे आणि त्या चारित्र्याचा परिचय द्यावा जेणेकरून आम्ही तेच बनावे जे आम्हाला बनावयाचे आहे. परंतु जर आम्ही या संधीचे महत्व समजू शकतो नाही की जी आम्हीला वर्तमान जीवनात उपलब्ध करुन दिली गेली आहे तर आमच्यापेक्षा मोठा आत्मघातकी कोणीही नसेल. अशा तऱ्हेने आम्ही योजनाकार ईश्वराचे काहीही बिघडवू शकणार नाही. परंतु स्वत:चा सर्वनाश अवश्य करुन घेऊ. मग या नुकसान भरपाईसाठी कोणतीही संधी असणार नाही.

सध्याच्या लोकात (जगात) आम्हाला असे दिसते की येथे भौतिक वस्तूंना असे काही प्राधान्य प्राप्त झाले आहे की प्रत्येक वस्तूचे वास्तविक स्वरुप दृष्टीआड लपून गेल्यासारखे झाले आहे. भौतिक आवरणाने येथे वास्तविकतेचे स्थान घेतले आहे. आणि वास्तविकता सामान्य दृष्टीने केवळ भ्रम असल्याचे प्रतीत होतात. ज्या गोष्टी जितक्या जास्त सूक्ष्म आणि भौतिक आवरणापासून मुक्त आहेत त्या तितक्याच जास्त अप्रकट व बुद्धी आणि चेतनेच्या पकडीपासून लांब दिसतात. या वास्तविकतांच्या मोजमापाची कोणतीही विधी आढळत नाही. उदाहरणार्थ येथे आम्ही लाकूड, दगड, धान्य, कापड वगैरेंचे सहज मोजमाप करु शकतो, परंतु येथे बुद्धी, चेतना, संकल्प, इच्छा, आकांक्षा, भावना व अन्तत: प्रेरणांच्या मोजमापाची कसलीही शक्यता आढळत नाही. येथे संपत्ती, रुपये, वगैरेंचे मूल्य ठरविले जाऊ शकते, परंतु येथे असा कोणताही तराजू नाही की ज्यात प्रेम, आभिलाषा, घृणा, द्वेष, वगैरे तोलले जाऊ शकतील. आणि येथे याचीदेखील शक्यता वाटत नाही की सूक्ष्म भावनांचे यथायोग्य मूल्यमापन केले जाऊ शकावे. वास्तविकता अशी आहे की भावनाच खऱ्या अर्थी मनुष्याच्या कर्म व त्याच्या प्रयासाच्या प्रेरक असतात.

वास्तवित: ही एक प्रकारे वर्तमान लोकाची अपूर्णता आहे. बुद्धीची अशी मागणी आहे की एखादे असे लोक असावे ज्यात ही अपूर्णता नसावी. वर्तमान लोक एका अशा विकास व पूर्णत्वाच्या प्रतीक्षेत आहे जसे आंब्याच्या एका लहानशा रोपट्यात एका विशाल वृक्षाची संभावना लपलेली असते की ज्यात फुले व फळे लागावीत ज्याच्या घनदाट सावलीत वाटसरुंना विश्रांती मिळावी. त्याचप्रमाणे वर्तमान लोकात देखील एका परिपूर्ण व विकसित लोकाची (जगाची) संभावना दडलेली आहे.

पवित्र कुरआन या गोष्टीची सुचना देतो की एक असा उन्नत व पूर्ण लोक निश्चितपणे समोर येणार आहे ज्यात फुले व फळे लागावीत व ज्याच्या घनदाट सावलीत वाटसरुंना विश्रांती मिळावी. त्याचप्रमाणे वर्तमान लोकात देखील एका परिपूर्ण व

विकसित लोकाची (जगाची) संभावना दडलेली आहे.

पवित्र कुरआन या गोष्टीची सूचना देतो की एक असा उन्नत व पूर्ण लोक निश्चितपणे समोर येणार आहे ज्यात त्या सर्व गोष्टी उपलब्ध होतील ज्यांची उपलब्धता या वर्तमान लोकात ठेवली गेली नाही. त्या लोकात वास्तविकता (सत्य) मूर्तीमंद होण्यासाठी भौतिक पदार्थ व स्थूलतेचे प्राधान्य आढळते तरी त्या लोकात स्थूलतेपेक्षा सूक्ष्मतेला प्राधान्य प्राप्त होईल. ज्या गोष्टी जितक्या सूक्ष्म व पवित्र असतील त्या तितक्याच स्पष्ट होतील.

वर्तमान लोकात तीच कर्मे प्रभावी ठरतात ज्यांची पुष्टी भौतिक नियम सुद्धा करीत असतील, परंतु जर भौतिक नियम त्यांना साद देत नसतील तर बुद्धी व नैतिकतेची मागणी मग काही का असेना परिणाम मात्र भौतिक नियमाच्या अनुसारच समोर येईल. मग आगीत टाकला जाणारा मनुष्य अपराधी असो किंवा नसो. येथे जर झाडांना पाणी दिले गेले तर ती हिरवीगार होतील, परंतु हे आवश्यक नाही की जर पुण्य कार्य केले तर येथे त्याचे फळ सुद्धा पुण्याच्या स्वरुपात आमच्यासमोर यावे. कित्येक पुण्यकर्म करणाऱ्यांना व सत्यप्रेमींना दु:खच सहन करावे लागले, आणि कित्येक अत्याचारी असे होऊन गेले ज्यांचे जीवन सुख व विलासात व्यतीत झाले. याचे कारण असेच आहे की येथे भौतिक नियमांना एका प्रकारे प्राधान्य प्राप्त आहे. याचा अर्थ असा नव्हे की विश्वावर मुळातच कोणत्याही नैतिकतेची नियंत्रण नव्हते, परंतु या तथ्याचा इन्कार केला जाऊ शकत नाही की सामान्यत: येथे भौतिक नियम व भौतिक शक्तीचेच प्राधान्य आहे. परंतु आगामी लोकात मामला याच्या उलट असेल. म्हणून ते लोक (जग) सर्वार्थाने परिपूर्ण व उन्नत असेल. तेथे बौद्धिक नियम कार्यान्वित असतील. तेथे कर्माचे तेच परिणाम समोर येतील जे बुद्धी व विवेकाला अपेक्षित असतील. तेथे अग्नी त्या व्यक्तीलाच जाळू शकेल जी जाळण्यास योग्य असेल. निर्दोष व्यक्तीवर कोणत्याही प्रकारचे संकट येऊ शकणार नाही. तेथे कर्माचे वास्तविक परिणाम समोर येऊ शकतील. सत्कर्मांचे जे सुपरिणाम भौतिक अडचणीमुळे समोर यावयाचे राहिले आहेत ते तेथे प्रकट होतील आणि अशा प्रकारे प्रकट होतील जणु काय कर्म व त्याचे परिणाम अथवा प्रभावाच्या दरम्यान वेळेचे कसलेही अंतर नव्हते.

आगामी लोकात प्रत्येक मनुष्य ते सर्व काही आपल्या उघड्या डोळ्यांनी पाहू शकेल जे आज त्याला दिसत नाही. त्याला हे कळेल की वास्तविकत: आपल्या या जगातील जीवनात त्याने कोणती भूमिका वठविली आहे, आणि जगात त्याने जी काही कार्ये केली होती त्याचे वास्तविक परिणाम त्याच्या समोर असतील. ते अशासाठी की

प्रत्येक गोष्टीची वास्तविकता त्या लोकात प्रभावशाली रूपात प्रकट होत असेल. पवित्र कुरआनमध्ये आहे-

**''या गोष्टीपासून तू गाफिल होतास, आम्ही तो पडदा दूर केला जो तुझ्यापुढे पडलेला होता आणि आज तुझी दृष्टी खूप तीक्ष्ण आहे.''** -५०:२२

**''तो दिवस असेल जेव्हा तुम्ही हजर केले जाल, तुमचे कोणतेही रहस्य लपून राहणार नाही.''** -६९:१८

**''जेव्हा मालमत्ताही काही फायदा पोहचवू शकणार नाही व संततीदेखील नाही, याशिवाय की एखादी व्यक्ती शुद्ध मनाने अल्लाहच्या ठायी हजर होईल.''** -२६:८८-८९

**''प्रत्येक माणसाचा दर्जा त्याच्या कर्मानुसार आहे.''** -६:१२

**''कदापि नाही खरी गोष्ट अशी आहे की, तुम्ही लोक त्वरित प्राप्त होणाऱ्या गोष्टीशी (अर्थात इहलोकाशी) प्रेम ठेवता, आणि परलोक सोडून देता.''** -७५:२०-२१

**''परंतु तुम्ही लोक ऐहिक जीवनाला प्राधान्य देता वास्तविकपणे परलोक उत्तम आहे आणि बाकी उरणारा आहे.''** -८७:१६-१७

**''आणि कर्मनोंद पुढे ठेवली जाईल. त्यावेळी तुम्ही पहाल की अपराधी लोक आपल्या जीवन पुस्तकातील नोंदीला भीत असतील आणि म्हणत असतील की, ''आमचे दुर्दैव! हे कसले पुस्तक आहे की आमची लहान मोठी कोणतीही कृती अशी उरली नाही जी यामध्ये नोंदली गेली नाही.'' जे जे काही त्यांनी केले होते ते सर्व त्यांच्या पुढ्यात त्यांना आढळेल आणि तुझा पालनकर्ता कोणावर तिळमात्र अन्याय करणार नाही.''** -१८:४९

**''त्यावेळी त्यांच्यावर त्यांच्या कृत्यांचे अरिष्ट उघड होईल आणि ते त्याच गोष्टीच्या फेऱ्यात येतील जिची ते टिंगल-टवाळी करीत होते.''** -४५:३३

**''प्रत्येक मनुष्य आपल्या कमाईच्या बदल्यात गहाण आहे.''** -७४:३८

**''(त्यादिवशी) स्वर्ग, पापभीरूंजवळ आणला जाईल आणि नरक भटकलेल्या लोकांसमोर उघडला जाईल,''** -२६:९०-९१

**''आणि स्वर्ग ईशपरायणांच्या जवळ आणला जाईल, जरादेखील दूर असणार नाही. फर्माविले जाईल, ''ही आहे वस्तू जिचे तुम्हाला वचन दिले जात**

**असे, त्या प्रत्येक माणसासाठी जो रुजू होणारा॰ आणि खूप खबरदारी घेणारा होता.''**
-५०:३१-३२

पवित्र कुरआनच्या या आयतीवरून स्पष्टपणे ज्ञात होते की वर्तमान लोकात ज्या गोष्टींची उणीव दिसते ती उणीव दूर होणारी आहे आणि एक वेळ अशी येऊन राहील की जे काही लपलेले आहे ते प्रकाशात येईल आणि ज्या गोष्टी आज पूर्ण होतील असे दिसत नाही त्या सर्व पूर्ण होतील. दृष्टी तीक्ष्ण बनेल आणि मनुष्याला सर्व काही दिसू लागेल व मानवाला याची जाणीव होईल की तो ज्या जगावर इतका मोहित झाला होता वास्तविकत: ते जीवनाचे कदापि रूप नव्हेत. वास्तविकता तर ही होती ज्याची तो उपेक्षा करीत राहिला आहे. त्या वेळी मनुष्याला तो स्वत: आपल्या कमाई व आपल्या कर्मानुसार असल्याचे आढळेल. वाईटांना त्यांचा वाईटपणा वाईट स्थितीला व चांगल्या लोकांना त्यांची पुण्यकर्मे चांगल्या स्थितीला पोहचवितील. मनुष्याला हे कळेल की त्याचे विचार व कर्म आपल्या प्रभाव परिणामाच्या दृष्टीने सामायिक नव्हते. त्याने जे काही केले त्याच्यातच तो स्वत:ला बांधलेला व घेरला गेलेला पाहील. याच्या परिणामस्वरूप आता एक तर तो स्वर्गाच्या सुखद सावलीत असेल अथवा नरकाच्या यातनेतच ग्रस्त असेल. स्वर्ग अथवा नरकाच्या रूपात त्याला आपल्या कर्मांचा पुरेपूर मोबदला मिळेल.

## परलोकाचे प्रतिबिंब

धरणीवर पाय ठेवण्यापूर्वी मूल आईच्या पोटात (गर्भाशयात) असते. तेथे राहून ते पृथ्वीच्या प्रभावांना ग्रहण करते. येथपावेतो की ते पृथ्वीवर जीवन जगण्यास समर्थ बनते. पृथ्वीवरसुद्धा ते सदैव राहण्यासाठी येत नाही, तर एक वेळ अशी येते की ते येथूनसुद्धा निघून जाते. ज्याप्रकारे गर्भाशयात पृथ्वीच्या प्रभावामुळे ते पृथ्वीवर पदार्पण करण्यास समर्थ बनते. अगदी त्याच प्रकारे जगातसुद्धा एखाद्या अन्य स्थळाच्या प्रभावामुळे त्याची एक अन्य प्रकारची संरचना होते. या संरचनेत जी गोष्ट क्रियाशील असते तिच्या वास्तविक स्वरूपाला जरी आम्ही पाहू शकत नसलो तरी कमीत कमी इतका आभास होतोच की येथे त्याच्या संरचनेत जी गोष्ट क्रियाशील आहे तिला आम्ही नैतिकता अथवा अनैतिकतेचे नाव देऊ शकतो. मनुष्य जगात एक तर नैतिक गुणांचा स्वीकार करून एक आदरणीय व्यक्तित्वाच्या रूपात उभा राहतो अथवा अनैतिकता व दुर्गुणांचा अंगीकार करून अत्यंत पतित रूपात आमच्या समोर येतो. नैतिक भावनेचे वास्तविक स्रोत कोठे आहे की ज्याचा मनुष्य स्वीकार करतो अथवा ज्याची अवहेलना करतो? याचा शोध लावणे काही सोपे कार्य नव्हे. भौतिक शरीरात चेतना व मग यापेक्षा जास्त नैतिक चेतना

कोठून येते? याचे उत्तर भौतिकवादी लोक अद्याप देऊ शकले नाहीत. चेतनेचे व नैतिक चेतनेचे स्त्रोत अचेतन भौतिक वस्तूंना म्हटले जाऊ शकत नाही. जर स्वत: त्यांच्यातच चेतना व चांगले-वाईटात फरक करण्याची क्षमता नाही तर ते दुसऱ्यांना ही क्षमता कशी प्रदान करू शकतील? म्हणून आम्हाला हे मान्य करावे लागते की चेतना व नैतिक भावनेचा स्त्रोत काही औरच आहे, आणि पुष्कळ शक्य आहे की भौतिक जगतात जेथून चेतना व नैतिक भावनेचे अवतरण होते ते भौतिक जगाचेसुद्धा मूळ आधार असेल. ते या कारणास्तव की संपूर्ण जग जसे एका उच्च नियमाच्या अंतर्गत दिसते त्यावरून हेच कळते की जगाची वास्तविकता भिन्न नव्हे तर ती एकच असू शकते. साऱ्या जगाचे संचालनकार्य एकाच हातात आहे, आणि कोणत्याही दृष्टीने त्या एकाशिवाय अन्य कोणाचाही या जगाच्या रचनेत अथवा संचालनात हात नाही. ही वेगळी गोष्ट आहे की जगाचा रचयिता जगाचे नियंत्रण व संचालन अत्यंत विधिपूर्वक करीत आहे. जगात लक्षित विधी व नियमांचे आपले स्वत:चे कसलेही स्वतंत्र अस्तित्व नाही तर हे जगाच्या रचनाकारानेच निर्धारित केलेले आहेत.

आम्ही असे म्हणू शकतो की जगात नैतिक चेतनेचे अवतरण जेथून झाले आहे तिथलाच प्रभाव नैतिकतेला ग्रहण करून मानव स्वीकार करतो. आणि जशा प्रकारे तो जगात या योग्य बनतो की त्या जगात त्याने पदार्पण करू शकावे की ज्याच्या प्रभावामुळे जगात त्याचे व्यक्तित्व निर्माण होते. आणि ते जग तेच आहे ज्याला परलोक म्हणतात. गर्भाशयापासून जग दूरही असते व जवळसुद्धा. त्या मुलासाठी जग फार लांब असते, ज्याची गर्भाशयात रचना अद्याप अपूर्ण असते. परंतु त्या मुलासाठी जग अत्यंत जवळ असते ज्याच्या हात पाय वगैरे अवयवांची रचना पूर्ण झालेली असते. अशाच प्रकारे ज्या व्यक्तीने नैतिक गुणांचा स्वीकार करून आपल्या व्यक्तित्वाच्या निर्माणकार्यात यश प्राप्त केले ती व्यक्ती आगामी लोकात (जगात) विचरण करण्यास योग्य झाली. तिला येणारा लोक (जग) अनुकूलच वाटेल. याउलट ज्याने त्या लोकाच्या प्रभावाला अस्वीकार केले आणि आपल्या चारित्र्याला दूषित केले, त्याच्यासाठी परलोक त्याच्या प्रतिकूल सिद्ध होईल. त्याची दशा त्या मुलासमान होईल ज्याने जगात अवयवरहित दशेत जन्म घेतला असावा. ज्याचे हात-पायही पूर्ण नसावेत व डोळेही तयार झालेले नसावेत असले मूल जगात येऊन जगासाठी अयोग्य सिद्ध होईल व येथे त्याला तऱ्हेतऱ्हेच्या आपत्ती व अडचणींना तोंड द्यावे लागेल. या जगात चेतना व नैतिक भावना आढळणे या गोष्टीचे स्पष्ट प्रमाण आहे की या भौतिक जगाचा आत्मलोकाशी संबंध आहे. मानवशरीरात जी तत्त्वे आढळतात ती जवळ जवळ सर्वच पृथ्वीत उपस्थित आहेत, परंतु चेतनशक्ती

अथवा आत्मा काही भौतिक पदार्थ नाही की जो पृथ्वीतून संचित केला गेला असावा. त्याचा संबंध कुठेतरी दुसऱ्याशी आहे. म्हणून 'त्या कुठेतरी दुसऱ्याशी' आम्ही निरपेक्ष होऊ शकत नाही.

भौतिक जगापेक्षा आत्मलोक श्रेष्ठ आहे यात दुमत असणे शक्य नाही. शरीरापेक्षा आत्मा श्रेष्ठ आहे याचा कोण बरे इन्कार करू शकेल? म्हणून जीवन व जगाच्या वास्तविक अभिप्रायासाठी व उद्देशाच्या निर्धारणासाठी आम्हाला आत्मलोकाकडे पहावेच लागेल. आत्मलोकापासून अभिप्रेत परलोक अथवा आखिरत आहे जे आपली छाया भौतिक जगावर निरंतर घालीत आहे. परलोक एक अशी वास्तविकता आहे ज्याने संपूर्ण ब्रह्मांड आपल्या कुशीत घेतले आहे. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''जड होत आहे ती (अंतिम निवाड्याच्या दिवशीची घटिका) आकाश व धरतीमध्ये. ती तुम्हावर अकस्मात येईल.''** -७:१८७

त्या वेळी जीवन आपला अभिप्राय व लक्ष्य प्राप्त करील. जर आजसुद्धा जगाचे नाते एका परोक्ष जगाशी जुडलेले आहे तर मग ही गोष्ट शहाणपणाची कशी होऊ शकते की आम्ही वर्तमान जगालाच सर्वकाही समजून भविष्यातील संभावनाकडून आपले तोंड फिरवावे. पवित्र कुरआन म्हणतो,

**''ऐहिक जीवनाची काही दिवसाची मौजमजा आहे (लुटून घ्या) नंतर आमच्याकडे तुम्हाला परत यावयाचे आहे, त्यावेळी आम्ही तुम्हाला दाखवून देऊ की तुम्ही काय काय करीत होता. जगातील हे जीवन (ज्याच्या नशेत मस्त होऊन तुम्ही आमच्या निशाण्यांकडे दुर्लक्ष करीत आहात) याचे उदाहरण असे आहे की जसे आकाशांतून आम्ही पाण्याचा वर्षाव केला तर जमिनीचे पीक जे माणसे व जनावरे सर्वजण खात असतात खूप घनदाट झाले, मग ऐन वेळी जेव्हा जमीन अत्यंत बहरलेली होती आणि शेते नटून थटून उभी होती आणि त्यांचे मालक अशा कल्पनेत होते की आम्ही आता याचा उपभोग घेण्यास समर्थ आहोत, अकस्मात रात्री किंवा दिवसा आमची आज्ञा आली आणि आम्ही तिला असे नष्ट करून टाकले जणूकाही काल तेथे काहीच नव्हते. अशा प्रकारे आम्ही संकेत उघड करून करून दाखवितो त्या लोकांसाठी जे विचार करणारे आहेत.''**

-१०:२४

आशय असा आहे की ज्याप्रकारे आकाशातून पृथ्वीवर पाण्याचा वर्षाव होतो तेव्हा त्या पाण्यामुळे धरित्री हिरवीगार बनते. झाडे-झुडुपे, धान्य वगैरे सर्व उत्पन्न होतात,

ज्यामुळे मनुष्य व गुराढोरांना लाभ होतो. अज्ञानी लोक समजतात की सर्व त्यांच्या अधिकारात आहे. वास्तविकत: हा त्यांचा निव्वळ भ्रम आहे. आम्ही रात्री किंवा दिवसा हवे तेव्हा हे सर्व नष्ट-भ्रष्ट करू शकतो. ठीक त्याचप्रमाणे या मानवशरीर व मानवजीवनाची बहारसुद्धा ज्या आत्म्यामुळे आहे तोसुद्धा ईश्वराने पाठविलेला असतो. तोच ईश्वर जो आकाशातून पाण्याचा वर्षाव करतो, तोच शरीरात आत्म्याचा संचारदेखील करतो. येथपावेतो की मनुष्य जगात एक बलवान व कुशल प्राणी म्हणून विचरण करू लागतो आणि त्याला स्वत:ची शक्ती व सामर्थ्यावर पूर्ण विश्वास होतो. तो अशा भ्रमात पडतो की सर्वकाही त्याच्या अधिकारात आहे. आता आणखी काही उरले नाही की ज्याच्यासाठी त्याने प्रयत्नशील राहावे. आम्ही अकस्मात त्याने केलेल्या सर्वांचा खेळखंडाबा करू शकतो. त्याच्यावर एखादे मोठे संकटसुद्धा येऊ शकते. अथवा एकाएकी त्याला मृत्युसुद्धा येऊन त्याचे सर्वकाही हिसकावून घेऊ शकतो. अशा प्रकारची दृश्ये मानवाला निरंतर दिसत असतात, तरीसुद्धा जर तो विचार व विवेकाने काम करीत नसेल तर यात अन्य कोणाचा दोष नसून खुद्द मानवाचा आहे.

याशिवाय आम्ही पाहतो की या जगातील कोणतीही वस्तु कायमस्वरुपी नाही. फुले उमलतात, मग कोमेजून जातात. विभिन्न प्रकारची रोपे उगवतात, वाढतात मग शेवटी पडून अथवा वाळून समाप्त होतात. पृथ्वीवर कित्येक पशु-पक्षी जन्मतात, परंतु शेवटी त्यांचाही अंत होतो. मानवाची गोष्टसुद्धा अशीच आहे की तो काही वेळ व्यतीत करून जगाचा निरोप घेताना दिसतो, ज्या वस्तु आम्ही नष्ट होताना पाहत नाही जसे पर्वत, समुद्र, सूर्य, चंद्र, नक्षत्र वगैरे यांचेसुद्धा वय मर्यादित आहे. यांच्यापैकी कोणातसुद्धा सदैव टिकण्याचे सामर्थ्य नाही. म्हणून हे मान्य करावे लागेल की वर्तमान लोक आपला आशय स्वत:च नाही. त्याला कारण असे की विनाशाला काही लक्ष्याचा मधुर अभिप्राय म्हटले जाऊ शकत नाही.

हा बनण्याचा व नष्ट होण्याचा खेळ जो येथे दिसतो यापासून जे अभीष्ट आहे ते पवित्र कुरआननुसार परलोकात समोर येईल. त्या वेळी आमचा मामला प्रत्यक्षपणे परमसत्ता परमात्म्याशी असेल. या मिलनाचा प्रसंग असा असेल जसा एखाद्या देशाचे राज्य कर्मचारी आपले कार्य पूर्ण करून आपल्या प्रमुख नेत्याशी अथवा सम्राटाशी भेटतात. हा प्रसंग खरोखर उल्हास व आनंदाचा असतो. परंतु हाच शुभ प्रसंग बंडखोर अथवा आपल्या कर्तव्याची जाणीव नसणाऱ्या कर्मचाऱ्यासाठी अत्यंत कठीण व भयंकरसुद्धा असतो. अशा प्रसंगी तर त्यांच्या तोंडावर काळीख फासलेली असते. त्याना अशी कोणतीही जागा सापडत नाही जेथे त्यांनी स्वत:ला लपवावे. असे लोक कोणत्याही पदवी

व बक्षिसाऐवजी शिक्षेचे भागीदार बनतात. म्हणूनच पवित्र कुरआनमध्ये लोकांना सावध करण्यासाठी सांगिले आहे,

**"त्यांनी स्वत: विचार केला नाही काय? अल्लाहने आकाशांना व पृथ्वीला आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे ते सत्यानिशी व निश्चित वेळेसाठी निर्माण केले आहे. परंतु बहुतेक लोक आपल्या प्रभुशी भेटण्याची गोष्ट मान्य करीत नाहीत."** -३०:८

## संवेदनशीलता व सूक्ष्मग्राहितेची (स्वीकारार्हतेची) गरज

जीवनाच्या कित्येक तथ्यापासून व भावनांपासून मनुष्य तोपर्यंत अनभिज्ञच राहतो जोपर्यंत त्यात संवेदनशीलता व सूक्ष्मग्राहितेचे गुण विद्यमान नसतात. जर आम्ही थोडे खोलात जाऊन पाहण्यास समर्थ झालो तर परलोकाची गोष्ट आम्हाला कदापि असंभव वाटणार नाही. आम्ही असंभवनीयतेतच जगत आहोत. जे काही आज आमच्या समक्ष आहे, ते एखाद्या चमत्कारापेक्षा कमी आहे काय? या जगाची आम्हाला अशी काही सवय झाली आहे की आम्हाला हे सामान्य वाटते. वस्तुत: येथील प्रत्येक वस्तु अशी आहे की माणसाने आश्चर्याने तोंडात बोट घालावे.

परलोक असल्याचे मान्य करण्यात केवळ अशासाठी अडचण येते की आम्ही त्याला एक आश्चर्यजनक व चमत्कारिक गोष्ट समजतो आणि सध्याच्या जगाला आम्ही सामान्य समजतो. वास्तविकत: हे खरे आहे की हे जगसुद्धा एखाद्या चमत्कारिक गोष्टीपेक्षा कमी नाही. जर जगाला आम्ही सहज व सरळ रूपाने पाहू शकलो तर आम्हाला कळेल की किती विचित्र व अद्भुत गोष्टीशी आमचा परिचय होत आहे.

ही गोष्ट आश्चर्यजनक नव्हे काय की हे जग आहे आणि त्यात आमचे अस्तित्व आहे? परलोकसुद्धा एक जग आहे. ते असल्याचे मान्य करण्याचा अर्थ वास्तविकतेच्या दृष्टीने दुसरे तिसरे काही नसून वर्तमान वास्तविकता केवळ मान्य करणेच नव्हे तर मान्य करीतच राहणे होय. जेव्हा आम्ही एखादी गोष्ट मान्य करतो तेव्हा आमची ही स्वीकृती त्याच स्थितीत विश्वसनीय होऊ शकते की जेव्हा आम्ही ती मान्य करीत राहू. परलोक असल्याचे मान्य करण्याचा अर्थ तर असाच आहे की आम्ही जी गोष्ट मान्य करतो त्यावर आम्ही टिकून राहावे.

आम्ही कालच्या जगाचा स्वीकार केला होता आणि आजसुद्धा स्वीकार करीत आहोत. काल व आजमध्ये काही तात्त्विक अंतर आले आहे का? विचार करा की आजपासून दीड-दोन शतकांपूर्वीच्या जगात आणि आजच्या जगात काही परिवर्तन घडले

आहे का? आज मानव अंतराळात उड्डाण करीत असल्याचे दिसते. आज तो परी बसल्या बसल्या संपूर्ण जगाशी संपर्क साधू शकतो. आपल्यापासून फार दूरवर राहणाऱ्या माणसाशी तो अशा प्रकारे वार्तालाप करू शकतो जणू तो त्याच्या जवळच बसलेला आहे. तो प्रवासातसुद्धा आपला संवाद सुरू ठेवू शकतो. परंतु असले बदल घडलेले असूनदेखील आम्हाला हे जग असल्याचे मान्य करण्यात कोणतीही अडचण येत नाही, कारण आम्हाला वाटते की या परिवर्तनाने जग व जीवनाच्या काही संभावनांनाच व्यक्त केले आहे.

परलोकसुद्धा एक संभावना आहे. जगात जी अव्यक्त संभावना ठेवली गेली आहे ती व्यक्त होण्यासाठीच आहे. म्हणून परलोक असल्याचे मान्य करणे म्हणजे वर्तमान जगाला योग्य रूपात जाणणे व त्याच्या संभावनांशी परिचित होणे होय.

हे सत्य आहे की परलोक वर्तमान लोकापेक्षा अधिक विशाल व श्रेष्ठ आहे, परंतु याचा अर्थ असा तर नाही की ते असणे शक्य नाही. रहस्यमय व आश्चर्यकारक असण्यात एक कण व हिमालयासारखे विशाल पर्वत दोन्ही समान आहेत. एक फूल तितकेच विस्मयकारक आहे जितके की एखादा वृक्ष. ज्या व्यक्तीला एखाद्या फुलाचे रहस्य कळले त्याने एका वृक्षाला नव्हे तर संपूर्ण बागेला जाणून घेतले.

याशिवाय या भौतिक जगात आमच्यासमोर चेतना व भावनांचे एक विशाल व श्रेष्ठ लोकसुद्धा आहे. विशालता व श्रेष्ठता आमच्यासाठी काही अनोळखी गोष्ट नाही. जग व भावनांच्या या दोन्ही जगात असा काही विरोध नाही की जो मिटविला जाऊ शकत नाही. एकाचे अस्तित्व दुसऱ्याला समाप्त करते.

हे जग भौतिकतेच्या दृष्टीनेच नव्हे तर चेतना व भावनांच्या दृष्टीनेसुद्धा संभावनांचे जग आहे. चेतना व भावनांचे अस्तित्व जगात सर्वांत आश्चर्यजनक आहे. चेतना व भावनांच्या आपल्या काही अपेक्षासुद्धा आहेत, ज्या पूर्ण होणे आवश्यक आहे, कारण त्या चेतनेचेच अभिन्न अंग आहेत ज्यांना चेतनेपासून वेगळे करून पाहिले जाऊ शकत नाही. सर्वांत कठीण गोष्ट चेतनेच्या अविर्भावाची होती, परंतु ही वास्तविकता कठीण नाही, कारण प्रत्यक्षपणे आम्हाला चेतनेची अनुभूती होते. शिवाय चेतनेला जे अपेक्षित आहे त्याला अशक्य कसे म्हणता येईल? एखाद्याच्या अपेक्षित गोष्टी अथवा त्याच्या मागण्या तर खुद्द त्याच्या स्वतःच्या अस्तित्वात येण्यापेक्षा अधिक कठीण नाही, तर अजिबात कठीण नाही. प्रकाश अस्तित्वात आला तर तो पसरणे प्रकाशाचा स्वभाव आहे. प्रकाशाला त्याच्या स्वभावापासून वंचित समजणे खुद्द प्रकाशाचा इन्कार करणे होय.

जर हे सत्य आहे की वर्तमान जग आहे तर या जगाला पूर्णपणे समजून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. यात लपलेल्या संभावनांना जाणून घेतले पाहिजे. एखाद्या वस्तूच्या अस्तित्वाचा पुरावा त्या वस्तूच्या लक्षणावरून आम्हाला मिळतो. लक्षणे वास्तविकत: संभावनाच असतात. हे खरे की काही संभावना तात्कालिक असतात आणि काहींना आमची प्रतीक्षा हवी असते. कळीत फुलाची संभावना दडलेली असते, हे सहज कळते, परंतु त्याच्यासाठी तर प्रतीक्षा करावीच लागते की केव्हा कळी उमलून फूल बनेल व त्याचा सुगंध सर्वत्र दरवळेल. फुलाच्या असितत्वाचा इन्कार करणे म्हणजे कळीच्या अस्तित्वाचा अपूर्ण स्वीकार होय, पूर्ण स्वीकार नव्हे. ज्याप्रमाणे फुलाचे अस्तित्व मानणे कळीचे अस्तित्व मानण्यापलीकडे अन्य काही नाही त्याप्रमाणेच कळीत लपलेल्या तिच्या सहभावना व विकासांचा स्वीकार करणे होय. परलोक असल्याचे मान्य करून आम्ही जगातील त्या प्रत्येक वस्तुला विश्वसनीयता देतो की ज्यांना आम्ही सामान्यपणे मानत आलेलो असतो. परलोकाच्या स्वीकृतीचा अर्थ असा झाला की जगात आम्ही जे काही पाहिले ते अविश्वसनीय नाही तर ते एखाद्या स्थायी सत्याचे परिचायक आहे. परलोक दुसऱ्या शब्दांत हेच आहे की जगात आम्ही जे काही पाहत आहोत ते आधारहीन नाही, त्याला आधार आहे. कोणतीही वस्तु आधारहीन असूही शकत नाही.

असा कोण आहे जो स्थायित्वापर्यंत पोचू इच्छित नाही? असे असूनदेखील जर तो परलोकाचा स्वीकार करीत नसेल तर याचा अर्थ याशिवाय अन्य काही नाही की त्याने परलोकाची वास्तविकता व तिचा अर्थ जाणून घेतला नाही. जर त्याने परलोक जाणले असते तर कधीसुद्धा त्याचा इन्कार करू शकला नसता, कारण परलोक तर प्रत्येक वस्तूच्या स्थायी आधाराचा शोध आहे. कोणत्याही शोधाची उपेक्षा केली जाऊ शकत नाही. परलोक तर आमचा स्वत:चा विकास व विस्तार आहे. आपल्या स्वत:च्या विकासाचा विरोधी कोण बरे असू शकेल? जर कोणी त्याचा विरोधी असेल तर वास्तविकत: त्याला कळलेच नाही की तो कोणत्या गोष्टीचा विरोध करीत आहे.

अध्याय-४

# मनात डोकावून पाहा

## मानसशास्त्रीयदृष्ट्या विचार

मानव केवळ भौतिक शरीराचे नाव नाही तर त्याच्याबरोबर त्याला मनोवृत्तीसुद्धा आहेत ज्या अभौतिक आहेत.

मानवजीवनात केवळ खाण्यापिण्या वगैरेच्या भौतिक गरजांचीच पूर्तता होते, असे नाही तर येथे मनुष्याच्या मनोवृत्ती व अभिरुचीशी संबंधित गरजांचीसुद्धा पूर्तता होते. बाळाची जशी ही आवश्यकता आहे की त्याला पिण्यास दूध व झोपण्यास मऊ अंथरूण व आईची मांडी मिळावी तशी त्याची एक अशीही गरज आहे की त्याला आई-वडिलांचे प्रेम व लोकांची सहानुभूतीसुद्धा मिळावी. आम्ही पाहतो की त्याची प्रत्येक आवश्यकता आश्चर्यजनक पद्धतीने पुरी होत आहे आणि ही गोष्ट त्याच्या शारीरिक व मानसिक विकासात सहाय्यक सिद्ध होत आहे. जर अशी पूर्ण व्यवस्था नसती तर बाळाला संतुलित व्यक्तित्व कधीच प्राप्त होऊ शकले नसते.

या जिवंत उदाहरणावरून सिद्ध होते की जगात मानसशास्त्रीय नियमसुद्धा क्रियाशील आहे. मानसशास्त्रीय नियम एक व्यापक नियम आहे. याचे दर्शन आम्हाला पशु-पक्षांच्या जीवनातसुद्धा होते. इतकेच नव्हे तर जर सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर वनस्पती जगतसुद्धा याने प्रभावित असल्याचे दृष्टीगोचर होईल. मधमाशी व भ्रमराला केवळ मधुर रसच हवा असे नाही तर याचबरोबर त्यांच्या अभिरुचिनुसार फुलापर्यंत पोहचण्यासाठी काही गोड संकेतसुद्धा अपेक्षित आहेत. आम्ही पाहतो की या आवश्यकतेची पूर्तता फुलांना रंग व सुगंध प्रदान करून केली गेली आहे.

मानसशास्त्रीय नियमाची व्यापकता दृष्टीत ठेवून जेव्हा आम्ही जग व जीवनावर विचार करतो तेव्हा परलोकबद्दल आमची आस्था वाढते. आम्ही येथे काही उदाहरणांच्या माध्यमाने आपले म्हणणे स्पष्ट करू. जेव्हा आम्ही जमिनींत बी पेरतो तेव्हा काही दिवसांत ते बीज रोप अथवा वृक्षाच्या रूपात उभे असल्याचे आढळते. विचार करण्याची गोष्ट अशी की आमच्या भावना व कर्मांचा दर्जा रोप-वृक्षाच्या बीजापेक्षा कमी आहे का की रोप-वृक्षाच्या बियांनी तर अंकुरित होऊन एके दिवशी डोलणाऱ्या रोपांचे अथवा झाडांचे रूप धारण करावे आणि आमच्या भावना आणि कर्मांनी मात्र नष्ट होऊन जावे आणि त्यांचा काही वास्तविक परिणाम आमच्यासमोर येऊ न शकावा?

आमच्या मनोवृत्ती कदापि निरर्थक नाहीत. अमरता व साफल्याची मानवी इच्छा अवश्य पूर्ण होईल. पवित्र कुरआन म्हणतो की, असा दिवस अवश्य येईल की जेव्हा आमच्या भावना, अभिरुची, प्रयास वगैरेंचे मूल्यमापन होईल व मूल्यानुसार त्यांना आदर किंवा अनादर मिळेल. जगात तर केवळ ती संधी उपलब्ध करून दिली आहे ज्यात आम्ही शुद्ध व सुंदर भावना आणि कर्म अर्जित करू शकावे, जेणेकरून वेळेवर यांची पूर्ण किंमत मिळावी. शेतकरी त्या वेळी आपल्या बियाणापासून उत्पन्न झालेल्या धान्याची भाकरी खात नाही की जेव्हा तो या बिया शेतात पेरत असतो. यासाठी त्याला थोडी प्रतीक्षा करावी लागते आणि ही प्रतीक्षा त्याच्यासाठी असह्य नव्हे तर स्वाभाविक असते. पवित्र कुरआनने स्पष्ट केले आहे,

**''तर काय त्याला माहीत नाही काय की जेव्हा काढले जाईल - जे काही थडण्यात आहे आणि अर्जित केले जाईल जे काही छातीत (हृदयात) आहे.''** -१००:९-१०

**''ज्या दिवशी लपलेल्या गोष्टी पारखल्या जातील.''** -८६:९

याचा अर्थ असा आहे की आखिरत (परलोकात) फक्त इतकेच नव्हे की तो मनुष्य पुन्हा जिवंत करून उभा केला जाईल. ज्याच्या मृत शरीराला आम्ही मातीत विलीन होताना पाहतो, तर त्याच्या हृदयात लपलेल्या चांगल्या-वाईट भावनांनासुद्धा समोर आणले जाईल. मानवाचे कोणतेही लपलेले रहस्य असे नसेल की ज्याची तपासणी होऊ न शकावी. त्या दिवशी कोणालाही अशा तक्रारीची संधी मिळणार नाही की त्याच्या भावना व हृदय-स्पंदनाला आदर प्राप्त झाला नाही आणि कोणताही दुष्ट आपल्या दुष्टपणा व अप्रिय मनोवृत्ती आणि कुप्रयत्नांच्या शिक्षेपासून आपले रक्षणसुद्धा करू शकणार नाही. पवित्र कुरआनने स्पष्ट शब्दांत सावध केले आहे,

**''जड होत आहे ती (अंतिम निवाड्याच्या दिवशीची घटिका) आकाश व धरतीमध्ये. ती तुम्हावर अकस्मात येईल.''** -७:१८७

**''जो कोणी आखिरतची (परलोकाची) शेती इच्छितो त्याच्या शेतीत आम्ही वाढ करतो, आणि जो जगाची शेती इच्छितो त्याला जगातूनच देतो. परंतु आखिरतमध्ये (परलोकात) त्याचा कोणताही वाटा नाही.''** -४२:२०

जो जगात आखिरतच्या शेतीची तयारी व प्रयत्न करील, त्याच्या समोर आखिरत डोलणाऱ्या शेतीसमान येईल आणि ज्याला आखिरतची कसलीही चिंता नसेल तो आखिरतमध्ये नुकसान व दुःख आणि संतापाशिवाय काहीही प्राप्त करू शकणार नाही.

परलोकाचे एक अत्यंत मार्मिक व मानसशास्त्रीय प्रमाण मनुष्याची बोलण्याची शक्ती आहे. ज्याप्रमाणे आमच्यासाठी ही एक सोपी गोष्ट आहे की आम्ही आपल्या तोंडाने एखादी गोष्ट सांगावी त्याप्रमाणेच ईश्वरासाठी जग व जे काही जगात आहे ते निर्माण करणे अत्यंत सोपे काम आहे. मनुष्य जे काही बोलतो ते तो ऐकूही शकतो. असे घडत नाही की त्याला त्याचा आवाज ऐकू न यावा. मनुष्य जे काही बोलतो ते त्याच्याकडे परतून येते. ते तो स्वत:देखील ऐकू शकतो. हा एक असा स्पष्ट नियम आहे जो सर्वांना परिचित आहे.

यावरून ही गोष्ट अत्यंत स्वभाविक वाटते की सर्व लोक ज्यांना ईश्वराने निर्माण केले आहे त्यांनी ईश्वराकडे परतावेसुद्धा. हे शक्य आहे काय की ईश्वर बोलेल, परंतु ऐकणार नाही? निर्माण तर करील, परंतु पाहणार नाही? हे कधीही शक्य होणार नाही. ईश्वराने जर आमची सृष्टी केली आहे तर आम्हाला त्याच्याजवळ परतावेसुद्धा लागेल. जर त्याने आम्हाला निर्माण केले आहे तर तो अवश्य पाहीलसुद्धा की आम्ही कसे राहिलो?

जगातील प्रत्येक वस्तु अशी बनविली गेली आहे की तिने सत्य चित्रित करू शकावे. जगातील प्रत्येक दृश्य सत्य व वास्तविकतेचा परिचय देताना दिसते. या वैशिष्ट्याशिवाय जगाचा वास्तविकतेशी संपर्कच राहू शकत नाही. आणि वास्तविकतेशी संपर्काविना जगाचे अस्तित्वसुद्धा शिल्लक राहू शकणार नाही. जगाचा वास्तविकता व स्थायी सत्याशी अखंड संपर्क असतो, म्हणूनच पवित्र कुरआनने जगातील सर्वच वस्तुंना सत्याच्या निशाण्या म्हणून लेखले आहे, मग आमची वाक्‌शक्ती ईश्वराची निशाणी अर्थात सत्याचा बोध करून देणारी वस्तु का बरे असणार नाही की जेव्हा ही ईश्वराचीच एक महत्त्वपूर्ण भेट आहे?

ईश्वराने जगाच्या रचनेला आपल्या बोलाने उपस्थित करून (पवित्र कुरआनमध्ये आहे, **''कोणत्याही गोष्टीसाठी आमचे म्हणणे, जेव्हा आम्ही त्याचा इरादा करू, असेच आहे की तिला आज्ञा करतो : हो! तेव्हा ती होते.''** -१६:४०) आणखी विश्वस्त केले की आम्हाला नष्ट होऊन राहावयाचे नाही तर परतून त्याच्याकडेच जावयाचे आहे आणि हे त्याच अवस्थेत शक्य होऊ शकते की जेव्हा जीवन मृत्युमुळे समाप्त होऊ नये, तर मृत्युनंतरसुद्धा जीवनाची संभावना टिकून राहावी. आमची वाक्‌शक्ती परलोकचे अथवा आखिरतचे एक अत्यंत मार्मिक व मानसशास्त्रीय प्रमाण आहे. पवित्र कुरआनने म्हटले आहे,

**''पृथ्वीवर बरेचसे संकेत आहेत विश्वास बाळगणाऱ्यांसाठी, आणि खुद्द तुमच्या स्वत:च्या अस्तित्वात आहेत. तुम्हाला उमगत नाही काय? आकाशांतच आहे तुमची उपजीविकासुद्धा आणि ती गोष्टसुद्धा जिचे वचन तुम्हाला दिले जात**

**आहे. तर शपथ आहे आकाश आणि पृथ्वीच्या स्वामीची, ही गोष्ट सत्य आहे, तशीच खात्रीलायक जशी तुम्ही बोलत आहात.''** -५१:२०-२३

परलोक व जीवन मृत्युच्या नंतर संबंधी पवित्र कुरआनचे आणखी एक सूक्ष्म व मानसशास्त्रीय प्रमाण पाहण्याजोगे आहे,

**''आणि तो प्रसंग देखील नजरेसमोर असू द्या जेव्हा इब्राहीम (अ.) यांनी सांगितले होते की, ''माझ्या पालनकर्त्या! मला दाखव की तू मृतांना कशा प्रकारे जिवंत करतोस.'' फर्माविले, ''काय तुझी यावर श्रद्धा नाही?'' त्याने सांगितले, ''श्रद्धा तर आहेच परंतु मनाचे समाधान इच्छितो.'' फर्माविले, बरे तर चार पक्षी घे आणि त्यांना आपल्याशी माणसाळून टाक. नंतर त्यांचा एकएक तुकडा तू एकाएका पर्वतावर ठेवून दे. नंतर त्यांना हांक दे. ते तुझ्याकडे धावत येतील. चांगले समजून घे की अल्लाह अत्यंत सामर्थ्यवान आणि बुद्धिमान आहे.''**

-२:२६०

याचा अर्थ असा की ज्या पक्ष्यांना तुम्ही माणसाळून पाळीव बनविता ते तुम्ही हाक दिल्यावर धावत येतात, तर ईश्वर व त्याने निर्माण केलेल्या लोकांदरम्यान इतकादेखील संपर्क नसेल की त्याने त्यांना मृत्युनंतर पुन्हा जीवनाकडे परतवू न शकावे? ईश्वर जीवन व चेतनेचा स्रोत आहे. त्याच्याकडे परतणारा स्वाभाविकपणे जीवन प्राप्त करील. प्रकाशाकडे परतणारा अंधारात राहू शकेल का? कदापि नाही.

ईश्वराने एखाद्याला आपल्याकडे बोलविणे व त्याला जीवनदान करणे वास्तविकतेच्या दृष्टीने एकच गोष्ट आहे. जर मानवाला हे सामर्थ्य प्राप्त आहे की तो आपल्या पाळीव पशु-पक्ष्यांना स्वत:कडे बोलवू शकतो, तर ईश्वर स्वत: निर्माण केलेल्या प्राण्यांना का बरे बोलवू शकणार नाही काय? आमच्याशी माणसाळलेले व परिचित असल्यामुळे जर पक्षी आमच्या प्रेरणेने पळत सुटतात तर ईश्वरी इच्छेचे विरोधी तत्त्व आमच्यात कोठून येऊन अडथळा बनू शकतात की जेव्हा आमच्याजवळ स्वत:चे काही नाही, आमच्याजवळ जे काही आहे ती ईश्वराची इच्छाच आहे.

मृत्युनंतरचे जीवन या अत्यंत सूक्ष्म व मानसशास्त्रीय पुराव्याचा विचार केल्याने या तथ्यावरसुद्धा प्रकाश पडतो की ईश्वराशी आमचा संपर्क अत्यंत मधुर भावभूमीवर स्थापित झालेला आहे. मृत्युनंतर जीवनदान ईश्वराकडून एक प्रकारचे बोलावणे व आत्म्यांचा त्याच्या सेवेत शीघ्रतापूर्वक उपस्थित होणे होय. आमच्या आत्म्यासाठी जे आकर्षण परमात्म्यामध्ये आहे ते अन्यत्र कोठेही असू शकत नाही.

वर्तमान जीवनात एका संवेदनशील माणसात एक उत्सुकता असते, एक इच्छा असते. त्याला असे वाटते की सर्वकाही प्रत्यक्ष नाही. काही अप्रत्यक्षसुद्धा आहे. त्या अप्रत्यक्षाबद्दल त्याची जिज्ञासा टिकून राहते. तो विचार करतो की येथे जे काही आहे ते अपूर्ण असल्यासारखे आहे. येथील सुखही पूर्ण नाही व दुःखसुद्धा पूर्ण नाही. सर्व वस्तु त्या अव्यक्तची कथा ऐकवीत आहेत. तो विचार करतो की या अनित्याच्या पाठीमागे काय नित्य आहे? या चंचल व अस्थिर दृश्यांच्या मागे ते अचंचल व स्थिर सत्य काय आहे? त्याला अशी एखादी सदैव टिकून राहणारी स्थिती हवी आहे की जिच्याशी संबद्ध राहून त्याने जीवनाची दिशा ठरवू शकावे.

जर वर्तमान जगच सर्वकाही आहे तर मन व आत्म्याला यापासून पूर्ण संतोष का मिळत नाही? ती कोणती गोष्ट आहे जी त्याच्यापासून अद्याप लपविली गेली आहे? काहीतरी अवश्य लपविले गेले आहे, नाही तर ही व्याकुळता का आहे? पिण्यास पाणी असते तेव्हा तर तहान लागते. जल नसते तर कदाचित त्याची तहानही लागली नसती.

जे लोक जगालाच सर्वकाही समजून बसले आहेत जे काही त्यांच्या डोळ्यांनी दिसते, त्याव्यतिरिक्त अन्य कोणतीही गोष्ट मान्य करीत नाहीत तर याचा अर्थ असा कदापि होत नाही की त्यांच्यात त्या अतिरिक्तची कल्पना अथवा इच्छा नाही, तर वास्तविकत: ते निराशेच्या अंधारात श्वास घेत असतात. त्यांच्यात हे जडत्व निराशेमुळे येते. ज्याप्रमाणे मानव मुळापासून येथे राहत आलेला नाही, प्रत्येकजण कुठून दुसरीकडून येऊन काही दिवसांसाठी येथे वास्तव्य करतो, त्याचप्रमाणे तो कोठे अन्यत्र जाणारा प्राणी आहे. येथे तर तो कारणवश आलेला आहे, स्वभावत: तो एखाद्या अशा लोकाचा निवासी आहे जेथे सत्याचे राज्य आहे, जेथील वातावरणात कोणत्याही प्रकारचे मालिन्य नाही. जेथे कोणत्याही प्रकारची अपूर्णता व विकार नाही. त्या लोकात प्रवेश प्राप्त करण्यासाठी तो प्रवेशपत्र घेण्यास आला आहे. येथे तो अशासाठी आणला गेला आहे की त्याने स्वत:ला त्या लोकासाठी (जगासाठी) पात्र बनवावे. मानवाच्या अंत:करणात वास करणाऱ्या व्याकुळतेच्या संदर्भात पवित्र कुरआनने म्हटले आहे,

"तुम्हा लोकांना जे काही दिले आहे ते केवळ ऐहिक जीवनाची सामुग्री व त्याची शोभा आहे आणि जे काही अल्लाहजवळ आहे ते यापेक्षा उत्तम व शेषतम आहे. काय तुम्ही बुद्धीचा उपयोग करीत नाही? बरे, तो मनुष्य ज्याला आम्ही चांगले वचन दिले असेल व तो त्याला प्राप्त करणारा असेल, कधी त्या माणसासारखा होऊ शकेल काय ज्याला आम्ही केवळ ऐहिक जीवनाची सामुग्री दिली असेल आणि मग तो पुनरुत्थानाच्या दिवशी शिक्षेकरिता हजर केला जाणार असेल?" -२८:६०-६१

मनुष्य जेव्हा कुठे बाहेर गेलेला असतो तेव्हा त्याला घरची आठवण येते. त्याला ज्या सुखसोयी घरी मिळत होत्या त्या अन्यत्र कोठेही मिळत नाहीत. घरात त्याचे स्वतःचे लोक व प्रियजन असतात, सर्वकाही आपले असते. परक्या लोकांच्या दरम्यान व परक्या जागी तो जास्त वेळेपर्यंत थांबू शकत नाही. तो काही दिवसांपर्यंत जरी बाहेर राहतो तरीसुद्धा त्याला ही आशा असते की त्याला लवकरच आपल्या घरी परतावयाचे आहे.

पक्षी संध्याकाळी आपल्या घरट्यात येऊन निवारा प्राप्त करतात. घरापासून दूर काम करणारा कामगार संध्याकाळी परतण्यासाठी बसची वाट पाहत असतो. अगदी तसेच मानवालासुद्धा आपल्या वास्तविक घराकडे परतून जावयाचे आहे. तो सदैव आपल्या घरापासून दूर राहण्यासाठी येथे आलेला नाही. जर एखादा मनुष्य सदैव याच जगात राहू इच्छित असेल तर त्याच्यासारखा बेसावध व हृदयहीन अन्य बरे कोण असू शकेल? माणसाला तर त्याची इच्छा असो वा नसो आपल्या गंतव्याकडे जावेच लागेल. जेथे तो आपल्या ईश्वरासमोर हजर होईल आणि आपल्या पात्रतेनुसार स्थान प्राप्त करील. पवित्र कुरआन या बाबतीत स्पष्टपणे म्हणतो,

**"आणि आकाशांचे व पृथ्वीचे राज्य अल्लाहसाठीच आहे व पुन्हा अल्लाहकडेच जावयाचे आहे."** (२४:४२)

हे जीवनाचे सत्य आहे. हीच जीवनाची इज्जत व जीवनाची प्रतिष्ठा आहे. ज्याला ईश्वराच्या भेटीची धारणा होऊ शकली नाही, त्याचे हृदय भावशून्यच राहते. ईशमिलनच परलोकाचा मूळ आशय आहे. म्हणूनच पवित्र कुरआनमध्ये विभिन्न ठिकाणी परलोकाची अभिव्यंजना ईशमिलनाच्या शब्दांनी केली गेली आहे. उदाहरणार्थ, पवित्र कुरआनच्या या आयतींचे अवलोकन करा,

**"नुकसानीत आहेत ते लोक ज्यांनी अल्लाहशी आपल्या भेटीच्या वार्तेला खोटे ठरविले. जेव्हा आकस्मिक ती घटका येऊन ठेपेल तेव्हा हेच लोक खेद व्यक्त करतील की, "आमच्याकडून याबाबतीत कशी चूक झाली." आणि यांची दशा अशी असेल की त्यांनी आपल्या पाठीवर आपल्या पापाचे ओझे घेतले असेल. पहा किती वाईट ओझे आहे जे हे उचलत आहेत."** -६:३१

**"आणि अशाच प्रकारे हा ग्रंथ आम्ही अवतरला आहे, एक समृद्धशाली ग्रंथ. म्हणून तुम्ही याचे अनुसरण करा व अल्लाहच्या प्रकोपाला भिऊन वागा, जेणेकरून तुमच्यावर दया केली जाईल."** -६:१५५

**"जो कोणी अल्लाहशी भेट होण्याची अपेक्षा बाळगतो (त्याला माहीत**

पवित्र कुरआन म्हणतो की सर्वकाही लवकरच घडेल, परंतु तुम्हाला शीघ्रतेचा अर्थच माहीत नाही. जे काही होणार आहे ते झाले म्हणून समजा. ईश्वराचा वायदा पुरा होईल आणि तुम्ही स्वीकारदेखील कराल की काही विलंब झाला नाही. तो म्हणतो,

**''(आज हे ऐहिक जीवनात मस्त आहेत) आणि ज्या दिवशी अल्लाह यांना (परलोकात) एकत्र करील तेव्हा (हेच ऐहिक जीवन यांना असे वाटू लागेल) जणू हे केवळ एक घटकाभर आपापसात ओळख करून घेण्यासाठी थांबले होते. (त्या प्रसंगी सत्यता पटेल की) खरोखरी भयंकर तोट्यात आले ते लोक ज्यांनी अल्लाहच्या भेटीला खोटे ठरविले आणि मुळीच ते सरळ मार्गावर नव्हते.''** -१०:४५

**''ज्या दिवशी तो तुम्हाला पुकारील तर तुम्ही त्याची स्तुती करीत त्याच्या हाकेला ओ म्हणून निघून याल आणि तुमची कल्पना त्यावेळी अशी असेल की आम्ही तर केवळ थोड्याच वेळेपर्यंत या स्थितीत पडून राहिलो आहोत.''** -१७:५२

**''आणि जेव्हा ती घटका उद्भवेल तेव्हा अपराधी शपथा घेऊन घेऊन सांगतील की आम्ही एका घटकेपेक्षा अधिक थांबलो नाही. अशाच प्रकारे ते लौकिक जीवनातही धोका खात असत.''** -३०:५५

**''मग सर्वश्रेष्ठ अल्लाह त्यांना विचारील, ''सांगा, पृथ्वीतलावर तुम्ही किती वर्षे राहिलात? ते सांगतील, ''एक दिवस अथवा दिवसाचाही काही अंश आम्ही तेथे राहिलो आहोत, गणना करणाऱ्यांना विचारून घ्या.'' फर्माविले जाईल, थोडाच वेळ राहिला आहात ना, त्याचवेळी तुम्ही हे जाणले असते.''** -२३:११२-११४

**''आपापसांत हळूहळू म्हणतील की, ''जगात तुम्ही मुश्किलीने काही दहाच दिवस घालविले असतील.'' आम्हाला चांगलेच माहीत आहे की ते काय बोलत असतील. (आम्हाला हेदेखील माहीत आहे की) त्यावेळी त्यांच्यापैकी जो जास्तीत जास्त जपून अंदाज लावणारा असेल तो म्हणेल की नव्हे, तुमचे जगातील जीवन केवळ एका दिवसाचे होते.''** -२०:१०३-१०४

**''मग हे पैगंबर (स.), संयम राखा ज्याप्रमाणे दृढनिश्चयी प्रेषितांनी संयम राखले आहे आणि यांच्या बाबतीत घाई करू नका, ज्या दिवशी हे लोक त्या गोष्टीस पाहतील ज्याचे भय यांना दाखविले जात आहे तेव्हा या लोकांना असे**

असावा, त्याचे व्यक्तित्व महान असावे आणि तो सदैव लपून राहावा. त्याला तर अवश्य प्रकाशात येणे भाग आहे. जर त्यापेक्षा कमी मूल्याच्या गोष्टींना अभिव्यक्ती प्राप्त होते तर हे कसे मान्य करणे शक्य आहे की एखादा मनुष्य उच्च स्वभावाचा असावा आणि ही गोष्ट सदैव अज्ञातच राहावी व त्याला पहिल्यापासूनच आदर मिळू न शकावा?

अशाच प्रकारे ही गोष्टसुद्धा पटण्याजोगी नाही की मनुष्याने आपल्या वाईट स्वभाव व घृणित व्यक्तित्वाला कायमस्वरूपी लपविण्यास समर्थ होऊ शकावे. एक वेळ अवश्य अशी येईल की जेव्हा हे कळावे की कोणती व्यक्ती कशी आहे? जर एखादा मनुष्य अत्यंत पतित आहे आणि वाईट कृत्यांनी त्याच्या आत्म्याला विकृत करून टाकले आहे तर काय ही गोष्ट कदापि उजेडात येणार नाही?

जर वाईट मनुष्याने आपल्या वाईट कृत्यांची न पुसली जाणारी छाप धारण केली असेल तर आम्ही ही छाप अकारण असल्याचे कसे म्हणू शकतो? जर ही अकारण नसेल तर ही एके दिवशी अवश्य व्यक्त होईल. जर ही व्यक्त होणार नसेल तर वाईट कर्मांची माणसाच्या ह्रदयावर मुळातच छाप पडली नसती आणि जरी पडली असती तरी ती लवकरच पुसली गेली असती. जर ही छाप पुसली जात नसेल तर ती एखादे वेळी स्पष्ट झाल्याशिवाय राहणार नाही. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''प्रत्येक माणसाचा शकून (अपशकून) आम्ही त्याच्या स्वतःच्या गळ्यात लटकविलेला आहे. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही एक लेख त्याच्यासाठी काढू जो त्याला उघड पुस्तकाप्रमाणे आढळेल.''** -१७:१३

मानवाची एक इच्छा अशीसुद्धा आहे की त्याला पूर्णता प्राप्त व्हावी व शीघ्र प्राप्त व्हावी. त्याला जे काही व्हावयाचे आहे ते लवकर व्हावे. प्रतीक्षा त्याला बोचते. विलंब त्याला आवडत नाही. तो विचार करतो की त्याला कोठपर्यंत वाट पाहावी लागेल? कोठपर्यंत तो प्रतीक्षा करील? तो लवकरच गंतव्यापर्यंत पोचू इच्छितो. त्याला वाटते की त्याला ते काही लगेच दिसावे जे पाहण्यास तो व्याकुळ आहे. तो विचार करतो की जी स्वप्ने त्याच्या मनात आहेत ती केव्हा पुरी होतील? त्याच्यासमोर सत्य केव्हा उघड होईल? सत्याच्या विरोधात जे, हे मान्य करीत नाहीत की त्यांनी काही व्हावयाचे उरले आहे आणि त्यांना आपल्या कर्मांचा मोबदला मिळावयाचा आहे, तेसुद्धा म्हणतात की कोठे आहे सत्य? ते का प्रकट होत नाही? आम्हाला आमच्या दुष्कृत्यांची शिक्षा का मिळत नाही? ईश्वराच्या योजनेचा जेव्हा आम्ही स्वीकार करीत नाही तेव्हा तो आम्हाला यातनांनी का झाकून टाकीत नाही?

नाही. लोक जगाच्या बाह्य रूपात अडकून पडतात आणि जगाची वास्तविक अनुभूती व आनंदापासून अनभिज्ञ राहतात. ते वर्तमान जगाच्या वास्तविक स्वरूपालादेखील पाहू शकत नाहीत.

ज्याने वर्तमानाला समजून घेतले त्याच्यासाठी परलोकाचे ज्ञान करून घेणे काही कठीण बाब नाही. ते अशासाठी की वर्तमान लोकाचे सर्व संकेत परलोकाचेच संकेत करतात. हे जग वास्तविकत: आखिरतचाच परिचय करून देते. वास्तविकतेच्या दृष्टीने हे जग आखिरतच्या (परलोकाच्या) परिचयाव्यतिरिक्त अन्य काही नाही. जगाचे आपले कसलेही स्वतंत्र अस्तित्व नाही. ते तर आखिरतची (परलोकाची) केवळ छायाच आहे. ज्यांनी जगालाच सर्वकाही समजले त्यांना मुळातच जग समजू शकले नाही.

अशा स्थितीत ते जगासंबंधी जी नीती अवलंबितील ती चुकीची ठरेल. अशा दशेत त्यांना कदापि जीवनाचा आनंद प्राप्त होऊ शकणार नाही. ही किती खेदाची गोष्ट आहे! जो प्राप्त वस्तुंनासुद्धा मिळवू शकला नाही त्याच्यासाठी कोणतीही गोष्ट मिळण्याची संभावना कुठे उरते? जो जवळची वस्तू पाहू शकला नाही तो एखादी दूरवरची वस्तू कशी प्राप्त करू शकेल? पवित्र कुरआनने याच दु:खद स्थितीचा उल्लेख या शब्दांत केला आहे,

**''लोक ऐहिक जीवनाचा केवळ दर्शनी पैलू जाणतात आणि मरणोत्तर जीवनाविषयी ते स्वत:च गाफिल आहेत. यांनी कधी आपल्या स्वत:शी मनन-चिंतन केले नाही काय? अल्लाहने पृथ्वी व आकाशांना आणि त्या सर्व वस्तू ज्या त्यांच्या दरम्यान आहेत, सत्याधिष्ठित व एका ठराविक मुदतीसाठीच निर्माण केल्या आहेत. परंतु बहुतेक लोक आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करणारे आहेत.''** -३०:७-८

हेसुद्धा एक मानसशास्त्रीय तथ्य आहे की मानव जसे बरी-वाईट कृत्ये करतो आणि ज्या प्रकारचे शील व स्वभाव ग्रहण करतो, तसेच त्याचे व्यक्तित्व निर्माण होते. त्याची कर्मे त्याच्यापासून वेगळी होत नाहीत. ते त्याच्या अंतर्मनावर अंकित होतात. चांगले भोजन करणे व आरोग्याच्या नियमांचे पालन केल्याने मनुष्याचे शरीर स्वस्थ व पुष्ट बनते आणि हानिकारक भोजनाने माणसाचे आरोग्य बिघडते.

याशिवाय असेसुद्धा आहे की माणसाचा रोगही लपून राहत नाही आणि त्याचे आरोग्यवान असणेही लपून राहत नाही. परंतु हे सत्य आहे की त्याच्या पूर्ण अभिव्यक्तीसाठी अनुकूल वातावरण अपेक्षित आहे. हे शक्य नाही की एखादा मनुष्य उच्च प्रवृत्तीचा

**व्हावे की) अल्लाहने निश्चित केलेली वेळ येणारच आहे, आणि अल्लाह सर्वकाही ऐकतो व जाणतो.''** -२९:५

**''वस्तुस्थिती अशी आहे की ज्या लोकांना आमची भेट अपेक्षित नाही आणि जे ऐहिक जीवनावर संतुष्ट व समाधानी बनले आहेत आणि जे लोक आमच्या निशाण्यांपासून गाफील आहेत. हे ते लोक आहेत ज्यांचे गंतव्य अग्नि (नरक) आहे, त्याच्या मोबदल्यात की जे कमवीत राहिले.''** -१०:७

असे ज्ञात झाले की हे नश्वर जीवन असे नाही की जे प्राप्त करून माणसाने संतुष्ट व्हावे. ज्या गोष्टीने माणसाला खरा संतोष मिळू शकतो आणि जी गोष्ट प्राप्त करून त्याला अपरिमित हर्षाचा अनुभव होऊ शकतो ती तर दुसरीच गोष्ट आहे. ती आहे पारलौकिक व शाश्वत जीवन व ईश्वराशी मिलनाचा आनंद. या संबंधाने आणखी काही आयती पाहा,

**''हे गणतीचे काही ठराविक दिवस आहेत जे तुम्ही अल्लाहच्या स्मरणामध्ये घालविले पाहिजेत. परंतु जो त्वरित दोनच दिवसांत परतला तर त्यामध्ये काहीही हरकत नाही आणि जर एखादा अधिक काळ थांबून परतला तर त्यामध्येही काही हरकत नाही. जर त्याने अल्लाहचे भय बाळगले असेल तेव्हा अल्लाहचे भय बाळगा आणि जाणून असा कि तुम्हाला त्याच्याकडे परत नेले जाईल.''** -२:२०३

**''तो अल्लाहच तर आहे ज्याने तुम्हाला ऐकण्याची व पाहण्याची शक्ती दिली आणि विचार करण्यासाठी मन दिले. परंतु तुम्ही लोक कमीच कृतज्ञ होता. आणि तोच आहे ज्याने तुम्हाला पृथ्वीवर फैलावले आणि त्याच्याकडे तुम्ही एकत्रित केले जाल.''** -२३:७८-७९

**''तोच तर आहे ज्याने तुमच्यासाठी पृथ्वीला अधीनस्थ करून ठेवले आहे, तिच्यावर संचार करा आणि खा अल्लाहची उपजीविका, त्याच्याच पुढे तुम्हाला पुन्हा जिवंत होऊन जावयाचे आहे.''** -६७:१५

**''काय तुम्ही हे समजून बसला होता की आम्ही तुम्हाला व्यर्थच निर्माण केले आहे आणि तुम्हाला आमच्याकडे कधी परतावयाचेच नाही?''** -२३:११५

आखिरत अथवा परलोकाचा वर्तमान लोकाशी संपर्क नाही असे नाही. आखिरतच जगाचा भाव आहे, परलोकच या ऐहिक लोकाचा आत्मा आहे. वर्तमान जगाने स्वत:मध्ये ज्या गोष्टी लपविलेल्या आहेत त्या परलोकाच्या भावनेशिवाय अन्य काही नाही. परंतु अशी अडचण उत्पन्न झालेली आहे की या भावनेपर्यंत साधारणपणे लोकांची दृष्टी जात

**वाटेल जणू जगात दिवसाच्या एका घटकेपेक्षा अधिक राहिले नव्हते. म्हणणे पोहचविले गेले, आता काय अवज्ञाकारी लोकांव्यतिरिक्त अन्य कोणी नष्ट होईल?''**

-४६:३५

**''ज्या दिवशी हे लोक तिला पाहतील तर त्यांना असे वाटेल की (जगात आणि मृतावस्थेत) हे केवळ एका दिवसाच्या शेवटच्या अथवा पहिल्या प्रहरापर्यंत थांबले आहेत.''**

-७९:४६

वेळेचा आभास वास्तविकत: या भौतिक जगाचे वैशिष्ट्य होय. मानवाला वेळेचा आभास केवळ त्यावेळेपर्यंत होतो जोपर्यंत तो या जगात दिक्काळ (स्पेस टाइम) च्या सीमेत शारीरिक रूपात जीवन जगत असतो. मृत्युनंतर जेव्हा केवळ आत्माच शिल्लक काहतो तेव्हा वेळेची अनुभूती उरत नाही. ऑगस्टनचा विचार आहे की वेळसुद्धा ब्रह्मांडाबरोबर निर्माण केली आहे. ईश्वराव्यतिरिक्त कोणतीही गोष्ट अनादि नाही. ईश्वर वेळेच्या परिघीपलीकडे आहे. ईश्वरासाठी भूतकाळ अथवा भविष्यकाळ नाहीत तर शाश्वत वर्तमानकाळ आहे. समय आमच्या भावना व विचाराचा एक पैलू आहे.

आत्मिक लोकात वेळेच अंतर कोठून येणार? हेच कारण आहे की मृत्यु व अंतिम निवाड्याच्या दिवसाच्या दरम्यानचे अंतर अत्यंत अल्प व थोडे वाटेल. केवळ असे वाटेल की जणू एखादा आताच झोपलेला असावा आणि लवकरच त्याची झोप मोडली असावी. हेच कारण आहे की जेव्हा गुहावाले की ज्यांचा वृत्तान्त पवित्र कुरआनमध्ये दिला गेला आहे. (पवित्र कुरआन - सूरह अलकहफ) एका दीर्घकालानंतर झोपेतून जागे झाले, तेव्हा त्यांच्या दृष्टीने ही प्रदीर्घ मुदत एका दिवसापेक्षा अधिक नव्हती. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''आणि याच अजब चमत्काराने आम्ही त्यांना उठवून बसविले, जेणेकरून त्यांनी आपापसांत थोडी विचारपूस करावी. त्यांच्यापैकी एकाने विचारले, ''सांगा, किती वेळ या स्थितीत राहिला?' इतरांनी सांगितले, ''कदाचित दिवसभर अथवा त्यापेक्षा काही कमी राहिलो असू.'' मग ते म्हणाले, ''अल्लाहच उत्तम जाणतो की आमचा किती काळ या अवस्थेत गेला.''**

-१८:१९

समय मात्र सापेक्ष (रिलेटिव्ह) आहे. आता तर हे स्वीकार केले गेले आहे की दिशा आणि काळ काही तत्त्वे नाहीत, केवळ नावे आहेत. देश व काळाचे व्यवधान आमच्या मनातच आहे. अशा प्रकारे जवळ व दूर, भूतकाळ व भविष्यकाळ केवळ मानसिक कल्पना आहेत. वास्तविकत: यांचे कसलेही अस्तित्व नाही. जर वास्तविकता अशी आहे तर अंतिम निवाड्याचा क्षण अत्यंत जवळ असणे शक्य आहे. मग ही

माणसाची अल्पज्ञता आहे की तो घाई करीत आहे. ज्या गोष्टीसाठी तो उतावीळ होत आहे ती कदापि लांब नाही. जो काही विलंब आहे तो मृत्युच्या येण्यात आहे.

जागतिक जीवन काही असले ओझे नाही की ज्याला शीघ्रातिशीघ्र उतरून फेकून देण्यासाठी व्याकूळ व्हावे. हे जागतिक जीवन तर येणाऱ्या समयाच्या तयारीसाठी आहे. तयारीसाठी जितका अधिक वेळ मिळेल ते ईश्वराचे वरदान समजून त्याचा स्वीकार केला पाहिजे.

परलोक जवळच आहे लांब नव्हे. परलोकाला मानणारे जर म्हणत आहेत की आम्ही त्याचा विरोध करीत असूनदेखील आमच्यावर शिक्षेचे कोरडे का खेचले जात नाहीत? तर ते पाहतील की ते ज्याच्यासाठी उतावीळ झाले आहेत ते त्यांना लवकरच मिळेल. ते लोक जे आपल्या पवित्र विचार, आस्था व सत्कर्मांमुळे ईश्वरी कृपेचे पात्र बनले आहेत, तेसुद्धा पाहतील की ईश्वराने त्यांना आपल्या स्वर्गापासून फार वेळ दूर ठेवले नाही. तर त्याने त्यांना लवकरच ते सर्वकाही देऊन टाकले जो त्यांचा हक्क होता. मानवाची कोणतीही सद्अभिरुची निरर्थक नाही. जर त्याला वाटत असेल की कार्य अविलंब झाले पाहिजे तर त्याला विश्वास असावयास पाहिजे की असेच होईल.

## परलोकविरोधकांची मनःस्थिती

मनुष्याच्या स्वत:च्या काही मानसिक दुर्बलता आहेत, ज्या सत्य समजून घेण्यात अडथळा उत्पन्न करतात. त्याच्या स्वत:च्या असमर्थतेची त्याला जाणीव असते व या जाणिवेचा त्याच्या मन व मस्तकावर असा पगडा असतो की अचेतन रूपात अनेक बाबतीत तो ईश्वरालादेखील असमर्थ समजू लागतो. त्याने ईश्वराला एखाद्या बाबतीत जरी असमर्थ मानले नाही तरीसुद्धा तो समजू लागतो की ईश्वर असे करणार नाही. परलोकाच्या बाबतीतसुद्धा माणसाची प्रवृत्ती कार्यरत असते. कोणतेही महान कार्य पूर्ण होण्यासाठी केवळ सामर्थ्यच नव्हे तर सचेत व जागरुक असणेसुद्धा गरजेचे आहे. म्हणूनच एखादे महान कार्य संपन्न होण्याची सूचना मिळाल्यावर अनेक लोक विचार करतात की असली सावधगिरी व जागरुकता दुर्लभ आहे जी त्या कार्यासाठी अपेक्षित आहे. ते त्या सूचनेकडे लक्ष देत नाहीत, ती मान्य करण्यास इन्कार करतात तर त्याची चेष्टासुद्धा उडविण्यास मागेपुढे पाहत नाहीत.

येथे वास्तविकत: त्यांची स्वत:ची एक विशेष प्रकारची संकुचित मनोवृत्ती कार्यरत असते. ईश्वराच्या सजगतेची व जागरुकतेची कल्पना नसल्यामुळे ते चुकीच्या दिशेने विचार करू लागतात. खरे पाहता जर त्यांनी उघड्या डोळ्यांनी या जगाचे निरीक्षण केले

तर येथील प्रत्येक वस्तु ईश्वराच्या सजगतेचे व जागरुकतेचे जीवंत प्रमाण आहे. असेच ते लोक आहेत जे परलोकासंबंधी सूचना ऐकून (पवित्र कुरआनच्या शब्दांत) म्हणू लागतात,

**''आम्हाला पूर्वस्थितीत नेले जाईल काय? त्या वेळी की जेव्हा आम्ही पोकळ हाडे बनू?''**
-७९:१०-११

**''कोण या हाडात प्राण घालील की जेव्हा ही विरघळून गेलेली असतील?''**
-३६:७८

अर्थात त्यांना असा विश्वासच होत नाही की मृत्युनंतर की जेव्हा मानवशरीर कुजून-विरघळून अथवा चितेत भस्म होऊन जाते तेव्हा केवळ इतकेच नव्हे की ईश्वर त्यांना दुसऱ्यांदा जीवंत करून उभे करू शकतो तर तो त्यांना अवश्य पुन्हा जीवंत करून उभेसुद्धा करील. या अविश्वास व शंकेच्या पाठीमागे मनुष्याची हीच दुर्बलता कार्य करीत आहे की जिच्यामुळे तो आपल्या मनोवृत्तीद्वारे ईश्वरी संकल्प व ईश्वरी योजनांचे मूल्यांकन करण्याचासुद्धा प्रयत्न करतो.

तो विचार करतो की कुजलेल्या-विरघळलेल्या हाडांकडे कोण लक्ष देईल? कुणाला त्यात प्राण घालण्याची शुद्धी राहील? तो मानवदुर्बलतेचे प्रतिबिंब ईश्वरात पाहण्याची भयंकर घोडचूक करतो. किती चांगले झाले असते जर त्याला समजले असते की ईश्वराशी कोणत्याही प्रकारची दुर्बलता जोडली जाऊ शकत नाही. तो अत्यंत सामर्थ्यवान व सजग आहे. जे काही योग्य आहे ईश्वर ते करून राहील आणि जे अयोग्य आहे त्याची त्याच्याकडून कदापि आशा केली जाऊ शकत नाही. मानवाला मेल्यानंतर पुन्हा जीवंत करण्याचे त्याच्यात सामर्थ्य आहे. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''तर मनुष्याने पाहावे की तो कोणत्या पदार्थाने बनला आहे. एका उसळणाऱ्या पाण्यापासून बनला जे निघते पाठीचा कणा व फासळ्यामधून. निश्चितच तो (अल्लाह) त्याला परत आणण्याचे सामर्थ्य बाळगतो.''**
-८६:५-८

अर्थात मनुष्य का विचार करीत नाही की एखाद्या जीवंत माणसाला जो येथून गेला आहे त्याला परत बोलवून आणणे कठीण आहे की पाण्याच्या तुच्छ थेंबापासून जीवंत मानव बनवून उभा करणे कठीण आहे? मनुष्य जो आमच्या दरम्यान राहिलेला असावा. आपल्या कार्यकुशलतेने विविध प्रकारचे कार्य करून ज्याने आपल्या जीवनाचा परिचय दिला असावा, त्याला परत आणणे अर्थात त्याच्या जीवनाचे पुन्हा प्रदर्शन तितकेसे

कठीण कार्य नाही जितके कठीण खुद्द जीवनाची निर्मिती करणे होय. हे जीवन निर्माणकार्य नेहमीच होत असताना आम्ही पाहतो. आम्ही जगात हे पाहतच असतो की कशा प्रकारे ईश्वर आपल्या शक्ती व सामर्थ्याने तुच्छ जल कणापासून (वीर्यापासून) जीवंत प्रतिभावान माणसे निर्माण करीत असतो. जर तो हे कठीण कार्य करू शकतो तर तो त्याच्यापेक्षा सोपे काम का करू शकणार नाही?

जे याला अशक्य समजतात ते खरे पाहता जीवन व जगाबद्दल विचारच करीत नाहीत अथवा मग ते एखाद्या पक्षपाती व रुढीवादी परंपरेचे अनुयायी मात्र आहेत आणि आपल्या बुद्धीचा प्रयोग करीत नाहीत. ते पाहण्याच्या पद्धतीने आकाशही पाहत नाहीत आणि पृथ्वीही नाही व स्वत: आपल्या जीवनाबद्दल विचार करीत नाहीत. मग वास्तविकता आणि सत्य त्यांच्यावर कसे प्रकट व्हावे? पवित्र कुरआन त्यांना आवाहन करतो की त्यांनी विचार करावा जेणेकरून त्यांच्यासाठी सत्याचे उद्‌घाटन व्हावे,

**''पहिल्या वेळेच्या निर्मितीला आम्ही असमर्थ होतो काय? परंतु एका नवीन निर्मितीसंबंधी हे लोक शंकाग्रस्त झालेले आहेत.''** -५०:१५

**''काय तो तुच्छ वीर्याचा थेंब नव्हता जो (गर्भाशयात) टपकविण्यात आला. मग तो एक गोळा बनला. मग अल्लाहने त्याचे शरीर बनविले व त्याचे अवयव व्यवस्थित केले मग त्यापासून पुरुष आणि स्त्रीचे दोन प्रकार बनविले. काय तो यासाठी समर्थ नाही की तो मृतांना जीवित करील?''** -७५:३७-४०

विचार करण्यासारखी गोष्ट आहे की जर मानवाला प्रथमत: निर्माण करणे अल्लाहसाठी कठीण कार्य नाही तर हे कसे गृहित धरले जावे की मानवाला दुसऱ्यांदा निर्माण करणे त्याच्यासाठी कठीण होईल?

याशिवाय हेसुद्धा स्मरणात राहावे की मेल्यानंतर मातीत जी वस्तु मिसळते ते मानवाचे भौतिक शरीर होय. त्याचा आत्मा अथवा चेतान-शक्ती नव्हे. मग त्याला शरीर धारण करवून मूर्तरूपात पुन्हा परत आणणे कसे अशक्य होऊ शकते? ज्या तऱ्हेने आम्ही गरजेनुसार आपले कपडे बदलतो, परंतु त्यामुळे आम्ही काही वेगळे बनत नाही. एखाद्या महान उद्देशाच्या पूर्ततेसाठी आमचे प्राण या शरीररूपी वस्त्राचा त्याग करून एखाद्या सुंदर व अत्यंत योग्य शरीराची अपेक्षा केली की ज्याने अनंत काळापर्यंत साथ देऊ शकावे तर यात आश्चर्याची गोष्ट काय आहे? पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''काय जेव्हा आम्ही मरू आणि माती बनून जाऊ (तेव्हा दुसऱ्यांदा उठविले जाऊ)? हे पुनरागमन तर बुद्धी पलीकडचे आहे. (वास्तविकत:) जमीन**

**यांच्या शरीरांतून जे काही खाते ते आम्हाला ज्ञात आहे, आणि आमच्याजवळ एक ग्रंथ आहे ज्यात सर्वकाही सुरक्षित आहे.''** -५०:३-४

अर्थात आमच्यापासून तर काहीही लपलेले नाही. आम्हाला हेसुद्धा माहीत आहे की मातीत काय मिसळते आणि काय मिसळत नाही? म्हणून आमच्या समोर ही शंका उपस्थित करणे की जेव्हा आम्ही मातीत मिसळले जाऊ तेव्हा आम्ही पुन्हा कसे जीवन प्राप्त करू शकू, व्यर्थ आहे. आम्ही कोणत्याही गोष्टीपासून बेखबर नाही. आम्ही उत्तम प्रकारे जाणतो की जमीन तर तुमच्या आत्म्याला हातसुद्धा लावीत नाही. आत्मा तर आमच्याच ताब्यात असतो. मग तुम्हाला पारलौकिक जीवनासंबंधी शंका का आहे? जर तुम्ही मातीत मिसळला तर ईश्वर तुम्हाला दुसऱ्यांदा जीवंत करून उभा करू शकतो. तुम्हाला (अर्थात तुमच्या शरीराला) त्याने पहिल्यांदा मातीपासून निर्माण करून उभे केले नाही काय?

# आणखी एक जग

## शास्त्रीय दृष्टिकोन

पूर्वी ज्या गोष्टी गहन विचार व चिंतनाने ज्ञात होत असत त्यापैकी आज कितीतरी गोष्टी आधुनिक विज्ञानाने गणिताच्या आधारे सिद्ध केल्या आहेत. शास्त्रीय पद्धतीने वास्तविकतेचा शोध लावणारे आता या निष्कर्षाप्रत पोचत आहेत की आमचे हे जगच वास्तविक जग नाही तर याच्या समानांतर आणखी एका जगाचे अस्तित्व आहे. ते जग आमच्या जगापेक्षा कितीतरी अधिक सुदृढ व वास्तविक आहे, परंतु ते जग आमच्या जगाच्या विरूद्ध (अॅन्टी वर्ल्ड) आहे. म्हणून हे दुसरे जग आम्हाला आमच्या या डोळ्यांनी दिसत नाही. जगात एक व्यापक नियम आढळतो की येथे प्रत्येक वस्तु आपल्या जोडीसह बनविली गेली आहे आणि आपल्या जोडप्यासह ती आपली उपयुक्तता सिद्ध करते. मग हे कसे शक्य आहे की हा व्यापक नियम जगालासुद्धा लागू न व्हावा? पवित्र कुरआनने म्हटले आहे,

**''आणि आम्ही प्रत्येक वस्तू जोडी-जोडीने बनविली जेणेकरून तुम्ही लक्ष द्यावे.''** -५१:४९

इ. सन १९३२ मध्ये सर्वप्रथम 'अॅण्टी इलेक्ट्रॉन'चा शोध लागला. याचा शोध के अॅण्डरसनने ब्रह्मांड किरणांत (कॉस्मिक रे) केला व याला 'पॉजिट्रॉन' असे नावं दिले. हा प्रथम 'अॅण्टी पार्टिकल' होता जो मानवाला ज्ञात झाला. आजपर्यंत अणूच्या प्रत्येक कणाचा (पार्टिकल) एक 'अॅण्टी पार्टिकल' असतो. प्रोटॉनचा एक अॅण्टी प्रोटॉन व न्यूट्रॉनचा एक अॅण्टी न्यूट्रॉन असतो. हीच स्थिती दुसऱ्यांचीसुद्धा आहे. केवळ तीन अपवाद अद्याप ज्ञात झाले आहेत, ते 'प्रोटॉन' व दोन प्रकारचे 'मेसॉन' आहेत. परंतु यांचा दर्जा स्वत: आपल्याच अॅण्टी पार्टिकलचा आहे.

अॅण्टी पार्टिकल असल्याचे मान्य केल्यानंतर स्वाभाविकपणे शास्त्रीय चिंतन अॅण्टी न्यूक्लिअस व अॅण्टी अॅटमकडे वळले. असा अनुमान लावला गेला की एक अॅण्टी हायड्रोजन अॅटममध्ये ऋण विद्युत भार असलेला एक अॅण्टी प्रोटॉन असेल आणि त्याच्या सभोवती धन विद्युत भार असलेला इलेक्ट्रॉन (पॉझिट्रॉन) भ्रमण करीत असेल. थोड्याच अवधीत शास्त्रज्ञांना हे सिद्ध करण्यात यश प्राप्त झाले.

यानंतर आमच्यासमोर ॲण्टी मॅटर (पदार्थ) आणि ॲण्टी वर्ल्ड (जग) ची गोष्ट येते. वास्तविकता अशी आहे की आमच्या जगात सर्व ॲण्टी पार्टिकल अस्थिर दशेत आहेत. ते ॲण्टी वर्ल्डमध्ये स्थिर अवस्थेत असतील. यांची अस्थिरता या ॲण्टी वर्ल्डच्या अस्तित्वाची सूचक आहे. सर्वप्रथम इ. सन १९३३ मध्ये डीराकने सांगितले की अशा प्रकारच्या एखाद्या ॲण्टी वर्ल्ड (प्रति जग) चा प्रकाश शक्य आहे की फोटॉनच्या रूपात आमच्यापर्यंत पोचत असावा. परंतु आम्ही आपल्या पॉजिटिव्ह जगातील वस्तूंना प्रकाशापासून वेगळे करून ते पाहण्यास असमर्थ आहोत. शास्त्रीय दृष्टिकोनाने न्यूट्रीनो ॲण्टी वर्ल्डला समजण्यात सहाय्यक बनले पाहिजेत. परंतु हे न्यूट्रीनो व ॲण्टी न्यूट्रीनो अत्यंत पलायन-प्रकृतीचे कण आहेत. ते पकडीत येणे फार कठीण आहे.

कित्येक शास्त्रज्ञांचे मत आहे की ॲण्टी वर्ल्ड आमच्यापासून वेगळे व आमच्या जगाच्या समानांतर त्याचे वास्तविक अस्तित्व आहे. जर ब्रह्मांड पार्टिकल व ॲण्टी पार्टिकलच्या दृष्टीनेच नव्हे, तर मॅटर (पदार्थ) व ॲण्टी मॅटरच्या दृष्टीनेसुद्धा सापेक्ष (रिलेटिव्ह) आहे; तर एक जग असेदेखील असणे आवश्यक आहे जे ॲण्टी मॅटरचे असावे. डीराकच्या मतानुसार, ॲण्टी वर्ल्डमध्ये केवळ पदार्थ निगेटिव्ह आहे, परंतु बीजगणिताच्या पद्धतींच्या ऋणात्मक मात्रासमान आम्ही निगेटिव्ह वेळ व निगेटिव्ह स्थान (स्पेस) च्या शक्यतेचासुद्धा विचार करू शकतो आणि सर्वांत अधिक विश्वसनीय तेच जग असू शकते.

डॉक्टर नान यांचे मत आहे की ॲण्टी वर्ल्डचे वर्णन भौतिकशास्त्राच्या ज्ञात धारणा व नियमाद्वारे केले जाऊ शकत नाही. त्यांना पूर्ण विश्वास आहे की ते जग आजसुद्धा अस्तित्वात आहे, परंतु आमच्यापासून मुक्त व आमच्या जगाच्या समानांतर त्यांचे अस्तित्व आहे. डॉ. नानच्या मताप्रमाणे ॲण्टी वर्ल्डमध्ये ऋणात्मक ऊर्जा असलेले आकार समय-विपरित जग आहे. कदाचित दोन्ही जग एकमेकांशी संबंधित आहेत.

वर शास्त्रज्ञांच्या ज्या मतांचा उल्लेख केला गेला आहे त्यावरून हे स्पष्टपणे ज्ञात होते की या जगाव्यतिरिक्त एखादे अन्य जग असण्याची शक्यता काही अशास्त्रीय गोष्ट नाही. तर शास्त्रीय दृष्टीनेच एखाद्या अशा परिपूर्ण व सुदृढ जगाचे अस्तित्व अनिवार्य आहे. म्हणून परलोकाची धारणा काही अशी कल्पना नव्हे की जिला असंभव म्हणता येईल. मानवाचे शोध व चिंतन एका अशा जगाची पुष्टी करतात जे वर्तमान जगापेक्षा अधिक वास्तविक व स्थायी असेल. वर्तमान जगाला सखोलपणे पाहणाऱ्या शास्त्रज्ञांना व विचारवंतांना ही गोष्ट स्वीकार करावी लागेल की या भौतिक जगापाठीमागे आणखी एक

जग आहे. त्या परोक्ष जगाचा स्वीकार केल्याशिवाय जीवन व वर्तमान जगाला समजणे शक्य नाही.

सुप्रसिद्ध जीवशास्त्रज्ञ जे. एस. हाडेन यांनी लिहिले आहे, ''ही गोष्ट मान्य करण्यातसुद्धा कोणतीही अडचण नाही की या भौतिक ब्रह्मांडाच्या पाठीमागे आणखी एक जग आहे.'' (द फिलॉसॉफिक बेसिस ऑफ बायॉलॉजी, पृ.३८)

मॅक्स प्लँकनेसुद्धा आपले पुस्तक 'ब्रह्मांड आधुनिक भौतिकशास्त्राच्या प्रकाशात'मध्ये लिहिले आहे, ''या अनुभूतीच्या जगाशिवाय एक वास्तविक जगसुद्धा आहे जे मानवाच्या ज्ञान व कल्पनांना वशीभूत नाही.''

अशाच प्रकारचे विचार ए. एस. एडिंग्टननेसुद्धा आपले पुस्तक 'विज्ञान व परोक्ष जग'मध्ये व्यक्त केले आहेत. (सायन्स ॲण्ड द अनसीन वर्ल्ड, पृ.३२)

सारांश, एखाद्या वास्तविक व पूर्ण परोक्ष जगाकडे वर्तमान लोक व जीवनासाठी एखादा आधार उरत नाही. त्या वास्तविक व परोक्ष जगाचा स्वीकार केल्यानंतर परलोकाचा स्वीकार करण्यात कोणतीही अडचण उरत नाही.

डीन इंजेने लिहिले आहे, ''दिक्‌काळ (टाइम स्पेस) चे जग अवास्तविक जग नाही तर हे वास्तविक जगांचे आंशिक प्रदर्शन आहे आणि त्याचे अपूर्ण प्रत्यक्षीकरण.''
(गॉड ॲण्ड द ॲस्ट्रॉनॉमर, पृ.१३)

जर एखाद्या वास्तविकतेचे आंशिक प्रदर्शन आहे तर त्याचे पूर्ण अथवा अपेक्षाकृत पूर्ण प्रदर्शनसुद्धा शक्य आहे. परलोक वास्तविकतेच्या पूर्ण प्रदर्शन व प्रत्यक्षीकरणाचेच दुसरे नाव आहे.

## संभावनात्मकतेचा शास्त्रीय नियम

अजूनपर्यंत शास्त्रज्ञांचे म्हणणे होते की जग भौतिक पदार्थाने निर्मिले आहे आणि पदार्थाचा स्वभाव आम्हाला माहीत आहे. कोणत्याही बाबतीत आम्ही निश्चितपणे अभिमत निश्चित करण्याच्या स्थितीत आहोत, परंतु आता ही स्थिती नाही. आता विज्ञान निश्चिततेची (सर्टनटी) गोष्ट न करता संभावनात्मकतेची (प्रॉबॅबिलिटी) गोष्ट करू लागला आहे. त्याने निश्चयात्मकतेचा आग्रह सोडून दिला. तो आता असे म्हणत नाही की असेच घडेल. जर तो काही म्हणू शकतो तर हेच की 'त्याच्या'पेक्षा 'याची' संभावना अधिक आहे.

शास्त्रीय दृष्टिकोनात या परिवर्तनाचे कारण आहे. प्रथमत: पदार्थ विश्वसनीय मानले जात असे. पदार्थात एका प्रकारची निश्चिती होती, परंतु अणुऊर्जाचे जे अंतिम कण

प्राप्त झाले आहेत, ते अनिश्चित आहेत. त्यांच्या व्यवहारासंबंधी सुरुवातीलाच काही म्हटले जाऊ शकत नाही. पूर्वी विज्ञान भले म्हणत राहिला असेल की प्रत्येक वस्तु निश्चित आहे, परंतु आज त्याला हे कळले आहे की निश्चिती असणे फार वरवरची गोष्ट होती. आत फार स्त्रोत अनिश्चितता विद्यमान आहे.

आपण एखादा अणू घ्या. कोणताही अणू भरीव नाही. प्रत्येक अणू छिद्रमय आहे. अणूच्या कणांच्या दरम्यानसुद्धा अंतर आहे. या अंतरांना जोडणारा अणूसुद्धा भरीव नाही. ते वास्तविकत: विद्युतकण आहेत. त्यांना कण म्हणणेसुद्धा योग्य नाही. कणाबरोबर तर पदार्थाची कल्पना जुडलेली आहे. कण एकसारखा राहतो, परंतु ते निरंतर बदलत असतात. त्यांचा स्वभाव लाटेप्रमाणे आहे. विज्ञानाने त्याला 'करांटा' असे नाव दिले आहे. करांटाचा अर्थ कण व लाट एकत्रित आहे. कधी तो लाटेप्रमाणे व्यवहार करतो आणि कधी-कधी कणाप्रमाणे आणि काही भरंवसा वाटत नाही की तो कसा व्यवहार करील. जर जगाच्या मौलिक कणाचा व्यवहारच अनिश्चयात्मक आहे तर विज्ञान कोणत्या आधारे निश्चितीचा दावा करू शकतो. हेच कारण आहे की निश्चिततेला सोडून विज्ञानाने संभावनात्मकतेचा नियम मान्य केला आहे.

आता विज्ञानाचा आग्रह असा नाही की एखाद्या वस्तुला मान्य करण्यासाठी संभावनेपेक्षा अधिक एखादी वस्तु अपेक्षित आहे, नाहीतर ती अशास्त्रीय सिद्ध होईल. संभावनात्मकतेचा शास्त्रीय नियम (लॉ ऑफ प्रोबॅबिलिटी) पाहता कोण असे म्हणू शकतो की परलोकाच्या धारणेचा काही वैज्ञानिक आधार नाही.

गमतीची गोष्ट तर अशी आहे की जगाच्या या अनिश्चियात्मकतेच्या नियमाअधीनच मानवाला वर्तमान जग व जीवनाच्या उपलब्धी प्राप्त झाल्या आहेत. मग याच नियमाच्या अंतर्गत भविष्यासाठी कोणतीही आशा का केली जाऊ शकत नाही?

अनिश्चयात्मकतेच्या नियमामागे एक गूढ रहस्य आहे. ते समजून घेणे आवश्यक आहे. खोलात शिरल्यास हे मान्य करावे लागेल की अनिश्चयात्मकता चेतनेचा अंश आहे की जेव्हा निश्चयात्मकता पदार्थाचा गुण आहे. अनिश्चितता वास्तविकत: चेतनेचे लक्षण होय. जगात अनिश्चिततेच्या प्रवृत्तीचे साधारणपणे आम्ही अंकन करू शकत नाही. याला कारण आहे. सोप्या रितीने हे आम्ही अशा प्रकारे समजू शकतो. समजा, आम्हाला हे निश्चित करावयाचे आहे की एखाद्या शहरात दररोज मरणाऱ्यांची संख्या काय आहे? अशा प्रसंगी आम्ही वर्षभराचा हिशेब लावून आम्हाला हे कळू शकेल की त्या शहरात दररोज किती लोकांचा मृत्यु होतो. आमचा हा हिशेब बऱ्याच अंशी बरोबर असेल. जर आम्ही एखादा देश अथवा संपूर्ण जगाचा दररोजचा मृत्यु-दर माहीत करून घ्यावयाचे ठरविले

तर निश्चितता अधिक वाढेल. आमचे गणित अधिक बरोबर सिद्ध होईल. परंतु जर एखाद्या व्यक्तीविशेषबद्दल आम्ही निश्चित करावयाचे ठरविले की ती केव्हा मरेल तर निश्चयात्मकता फारच ढासळेल आणि अनिश्चितता फारच वाढेल. त्याला कारण असे आहे की गर्दी वाढल्याने वस्तुमध्ये भौतिकतेच्या गुणांचा आभास होऊ लागतो आणि एखाद्या वस्तुमध्ये जितकी अधिक वैयक्तिकता अथवा आपुलकी वाढेल तितकीच जास्त त्यात सचेतना असल्याचे लक्षण दिसू लागते. पदार्थाचा एक तुकडा तर कोट्यवधी अणूंची गर्दी असते, म्हणून त्याच्या स्वभावाविषयी आम्ही निश्चय करू शकतो. त्याला कारण असे की येथे निश्चिततेची संभावना अधिक असते; परंतु यापुढे जाऊन जर इलेक्ट्रॉनचा विचार केला तर तेथे तशी गर्दी नसते जशी दगडात आढळते. इलेक्ट्रॉनमध्ये वैयक्तिकता अधिक असते. म्हणून त्याच्या स्वभाव व व्यवहाराबद्दल जर आम्ही काही बोलावयाचे ठरविले तर आमच्या समोर अडचण येईल. तो तर आपल्या व्यवहाराबद्दल प्रतिक्षण स्वत: निश्चय करीत असल्याचे दिसते. अगोदरच त्याच्या बाबतीत काही सांगणे अत्यंत कठीण आहे.

अनिश्चितता चेतनेचा गुण आहे. हा चेतनेचा स्वभाव आहे की तिने स्वतंत्रपणे व्यवहार करावा. अनिश्चिततेच्या दशेत प्रतिक्षण एखादी चेतना व्यवहार्यत: निर्णय करीत असल्याचे दिसते. जरी गर्दीत आम्हाला या चेतनेचा आभास होत नाही तरी ही चेतना विश्वव्यापी आहे ही आमच्या दृष्टीची दुर्बलता होय. जेथे चेतना काम करीत आहे तेथे आमच्यासाठी आशा आहे. आंधळ्या-बहिऱ्या शक्तीपासून तर कसलीही आशा करणे शक्य नाही. परंतु चेतन सत्तेपासून तर आशा बाळगती जाऊ शकते. ती आशा पूर्णसुद्धा करील. त्याला कारण असे की आशा खुद्द तिने दिलेला निधी होय. म्हणून ती निरर्थक आहे असे म्हणणे शक्य नाही. मनुष्याच्या सर्व आशांचा सारांश परलोकाची कामना आहे. ही आशा अवश्य पुरी होईल.

# रूपांतरण अथवा महाप्रलय

## प्रलय

वर्तमान जगाच्या बाबतीत पवित्र कुरआन म्हणतो की हे शाश्वत नाही. वर्तमान जगाची रचना कायमस्वरूपी राहण्यासाठी केलेली नाही. याचे ठराविक वय आहे आणि या वयातच त्याची उपयुक्तता आहे. त्यानंतर जीवन एका अशा विकसित लोकाची (जगाची) अपेक्षा करतो की ज्यात वर्तमान लोकाच्या उणिवा भरून निघणे शक्य व्हावे. वर्तमान लोकाच्या उणिवा कोणत्या आहेत? आणि त्यांची पूर्तता कशी होईल? याविषयी आम्ही पुढे विचार करू.

वर्तमान जगाचे अध्ययन दर्शविते की येथे कोणत्याही वस्तुला स्थायित्व प्राप्त नाही. प्रत्येक वस्तुचे एक मर्यादित वय आहे. आपले वय पूर्ण करून प्रत्येक वस्तु नष्ट होते. सामूहिक रूपाने ही गोष्ट संपूर्ण ब्रह्मांडाचीसुद्धा आहे. या ब्रह्मांडाच्या बाबतीत असा विचार करणे की हे नेहमीपासून आहे व अशाच प्रकारे हे तारे नेहमी टिकून आहेत त्या सर्वच्या सर्व वस्तू सीमित आहेत त्या कोणत्या तरी दिवशी समाप्त होणे स्वाभाविक आहे. सूर्य जो प्रत्येक क्षणी आपली मोठी शक्ती खर्च करीत आहे त्याची शक्तीसुद्धा एके दिवशी क्षीण होईल. हीच स्थिती दुसऱ्या ग्रहांची व उपग्रहांचीसुद्धा आहे. म्हणून सृष्टीची वर्तमान व्यवस्था कायम टिकून राहू शकत नाही.

भौतिकवादाची यावर भिस्त होती की पदार्थ नष्ट होत नाही केवळ त्याचे रूपच बदलणे शक्य आहे. त्याच्या परिणामात काही अंतर येत नाही. परंतु विज्ञानाने आज ही धारणा असत्य सिद्धकरून दाखविली आहे. आता ही गोष्ट स्पष्ट झालेली आहे की ऊर्जा पदार्थात परिवर्तीत होते आणि पदार्थ पुन्हा ऊर्जेत परिवर्तीत होतो. म्हणून पदार्थ अथवा अणूला नित्य आणि अनश्वर समजणे आणि त्यावर आपल्या कल्पनेचा महाल उभा करणे म्हणजे भ्रमाशिवाय कोणतीही वास्तविकता नाही. याशिवाय उष्णतेसंबंधीच्या दुसऱ्या नियमाने (सेकंड लॉ ऑफ थर्मोडायनॅमिक्स) जसे की आम्ही सांगितले आहे सिद्ध करून दाखविले आहे की वर्तमान भौतिक जग सदैवपासून नाही व सदैव टिकूनही राहणार नाही. याचा एक आरंभ आहे आणि अनिवार्यपणे जगाची वर्तमान व्यवस्था एके दिवशी छिन्नभिन्न झाल्याशिवाय राहणार नाही. अशा प्रकारे विज्ञान अंतिम प्रलयाचा (कयामतचा)

इन्कार करीत नाही तर त्याची पुष्टी करतो. आता प्रलयाच्या संबंधाने पवित्र कुरआनमध्ये दिलेली सूचना आणि विज्ञानात कोणताही विरोध उरला नाही. पवित्र कुरआन म्हणतो की वर्तमान जगाची एक सीमित व निश्चित अवधी आहे. याला अनश्वर समजणे चूक आहे,

**"आम्ही आकाशांना व धरतीला आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे केवळ सत्यानिशी (सोद्देश) व एका निश्चित अवधीसाठी निर्माण केले आहे."**

-४६:३

**"त्याने सूर्य व चंद्राला कामाला लावले, प्रत्येक वस्तु एका निश्चित वेळेपर्यंत चालणार आहे."** -१३:२

**ती निश्चित वेळ आल्यावर एक प्रलयकारी दृश्य उपस्थित होईल. "ज्या दिवशी आकाश थरथरू लागेल आणि पर्वत चालू-फिरू लागतील."**

-५२:९-१०

**"जेव्हा पृथ्वी हलविली जाईल आणि पर्वतांचा चुरा-चुरा केला जाईल. मग ते धूळ बनून उडत राहतील."** -५६:४-६

**"जेव्हा तारे नष्ट होतील आणि जेव्हा आकाश फाटून जाईल व जेव्हा पर्वतांचा चुरा-चुरा केला जाईल."** -७७:८-१०

**"जेव्हा की सूर्याला गुंडाळले जाईल आमि जेव्हा तारे मंद पडतील व जेव्हा पर्वत चालविले जातील."** -८१:१-३

**"आणि पृथ्वी व पर्वत उचलून एकाच वेळी चुरा-चुरा केले जातील."**

-६९:१४

थोडक्यात असे की विश्वाची हल्लीची व्यवस्था शिल्लक उरणार नाही. सूर्याचा हा प्रकाश उरणार नाही आणि हे अचल पर्वत आपल्याला जागेवर स्थिर राहू शकणार नाहीत. एक अत्यंत विनाशकारी दृश्य असेल. सूर्य, चंद्र आणि नक्षत्र सर्वच्या सर्व छिन्नभिन्न होतील.

## प्रलयानंतर

प्रलयाचा अर्थ असा कदापि नाही की सृष्टीचा मुळापासून अंत होईल आणि ही गोष्टसुद्धा नाही की हे सर्वकाही निरुद्देश असेल, तर या प्रलयाच्या उदरातून एक नवीन जग आणि एक नव्या जीवनाचा उदय होईल, असे की पवित्र कुरआनने स्पष्ट शब्दांत याची सूचना दिलेली आहे,

''प्रचंड घटना! काय आहे ती प्रचंड घटना? तुम्हाला काय ठाऊक की ती प्रचंड घटना काय आहे? तो दिवस जेव्हा लोक विखुरलेल्या पतंग्यांसमान आणि पर्वत रंगीबेरंगी पिंजलेल्या लोकरीप्रमाणे असतील. मग ज्याचे पारडे जड असेल तो मनपसंत ऐश्वर्यात असेल, आणि ज्याचे पारडे हलके असेल त्याचे विश्रामधाम खोल खाई असेल, आणि तुम्हाला काय ठाऊक की ती वस्तू काय आहे? भडकणारा अग्नी.'' -१०१:१-११

''ज्या दिवशी नरसिंगात फुंक मारली जाईल, तुम्ही झुंडी झुंडीने निघून याल. आणि आकाश उघडले जाईल येथपावेतो की ते दारेच दारे बनून जाईल, आणि पर्वत चालविले जातील, येथपावेतो की ते मृगजळ बनतील.''

-७८:१८-२०

''यांच्या जागी यांच्यापेक्षा उत्तम लोक आणू आणि कोणीही आमच्यावर मात करणारा नाही. म्हणून यांना आपल्या वाह्यात गोष्टी आणि आपल्या खेळांत मग्न राहू द्या, येथपावेतो की हे आपल्या त्या दिवसाला पोहोचतील ज्याचे याना वचन दिले जात आहे. जेव्हा हे आपल्या थडग्यातून निघून अशाप्रकारे पळत सुटले असतील जणू आपल्या मूर्तींच्या स्थानाकडे पळत असावेत, यांच्या नजरा झुकलेल्या असतील, फटफजिती यांच्यावर पसरली असेल, तो दिवस आहे ज्याचे यांना वचन दिले जात आहे.'' -७०:४३-४४

''मग एक नरसिंघ फुंकले जाईल आणि अकस्मात हे आपल्या पालनकर्त्यांच्या पुढे हजर होण्याकरिता आपापल्या कबरीतून बाहेर पडतील. घाबरून म्हणतील, ''हे आम्हाला आमच्या शयनगृहातून कोणी उठविले?'' - ''ही तीच गोष्ट आहे जिचे परमदयाळू ईश्वराने वचन दिले होते आणि प्रेषितांचे प्रतिपादन सत्य होते.'' एकच प्रचंड मोठा आवाज होईल आणि सर्वच्या सर्व आमच्यासमोर हजर केले जातील.'' -३६:५१-५३

''सावध करा यांना त्या दिवसापासून जेव्हा पृथ्वी व आकाशाचे मूळ रूप बदलले जाईल, आणि सर्वच्या सर्व एकमेव महान शक्तिमान अल्लाहसमोर उघडे पडून हजर होतील.'' -१४:४८

# मृत्यु व पारलौकिक जीवनादरम्यानचे अंतराळ

मृत्यु आणि परलोकादरम्यानच्या अतराळात आत्मा कोणत्या स्थितीत असेल? हा प्रश्नसुद्धा आहे की ज्यावर थोडा विचार केल्याने विषयांतर होणार नाही. शरीराचा त्याग केल्यानंतरसुद्धा आत्मा जिवंत राहतो. शरीर सोडल्यानंतर तो मरत नाही. पवित्र कुरआनकडून याच गोष्टीची पुष्टी होते. बुद्धीसुद्धा हेच म्हणाली की मृत्युनंतर आत्मा मरत नाही. जर आम्ही शास्त्रीय पद्धतीने विचार केला तर आम्हाला या गोष्टीचे समर्थन करावे लागेल की शरीराचा त्याग करणे म्हणजे आत्म्याचा मृत्यु नव्हे. हा मृत्यु तर केवळ शरीरावर घडून येतो. आणि मृत्युमुळे शरीराचे भौतिक तत्त्व नष्ट होत नसतात. ते केवळ प्राणहीन बनतात.

जरी मानव-आत्म्याला आम्ही पूर्णपणे समजू शकलो नाही आणि तो आमच्यासाठी एक रहस्यच आहे तरी चेतना-शक्तीशी सर्व परिचित आहेत. ही चेतना आत्म्याचे निकटतम रूप आहे. मेल्यानंतर ही चेतना मरत नाही. ही चेतना शिल्लक राहते. मनुष्याचे व्यक्तित्व शिल्लक राहते. ते अशासाठी की व्यक्तित्वाचे साररूप चेतनाच आहे. चेतनाविना एखाद्या व्यक्तित्वाची कल्पना केली जाऊ शकत नाही. म्हणून तिच्या विनाशाचा प्रश्न उद्‌भवत नाही. जर मानवाचे व्यक्तित्व व चेतना मृत्युनंतरसुद्धा उरते तर तिला एखाद्या शरीरात पुन्हा जोडणे अशक्य आहे असे कसे म्हणता येईल?

या जगात सर्वत्र हा नियम दिसतो की येथे एखादी वस्तु पूर्णपणे नष्ट होत नाही. केवळ तिचे रूप बदलते. असे शक्य आहे की पदार्थ अणूत व अणू ऊर्जेत परिवर्तीत होईल, परंतु ते पूर्णपणे अस्तित्वहीन बनत नाही. मग चेतनेच्या संदर्भात हा नियम कसा भंग होईल? काय आमची चेतना जगात आढळणारी एक वास्तविकता नाही? अखेर हे कसे मान्य केले जावे की आमच्या भावना आणि आमच्या चेतना मृत्युनंतर बाकी राहू शकणार नाहीत? असे या कारणास्तव मान्य केले जावे काय की मृत्युनंतर मृतकाची चेतना अथवा व्यक्तित्वाचा अनुभव आम्हाला येत नसतो? परंतु तिचे आभासित न होणे या गोष्टीचे प्रमाण नव्हे की तिचे मुळापासूनच अस्तित्व नसते. खरी गोष्ट तर अशी आहे की एखाद्याचा आत्मा अथवा चेतनेचा तर त्याच्या जीवनकाळातसुद्धा आम्हाला प्रत्यक्ष अनुभव येत नाही. आम्हाला त्याचा अनुभव तर बाह्य लक्षणावरूनच येतो. चेतना काही अशी गोष्ट नाही की जिचे परीक्षण परीक्षानळीत केले जाऊ शकावे.

चेतना अथवा मानव-व्यक्तित्व एक तथ्य आहे काही काल्पनिक गोष्ट नव्हे. मानवजातीच्या सभ्यता व संस्कृतीत याच चेतनेचे दर्शन घडलेले आहे. आधुनिक जगात

जे वैज्ञानिक चमत्कार, विमान, रॉकेट, ट्रेन, रेडिओ, टेलीव्हिजन वगैरेच्या रूपात दिसतात यात मानव-चेतनेच्या वाट्याचा इन्कार करण्याचे धाडस कोणी करू शकेल काय? चेतना एक वास्तविकता आहे आणि अत्यंत सुदृढ वास्तविकता. हे एक असले तथ्य आहे ज्याचा शास्त्रज्ञांनीसुद्धा स्वीकार केला आहे.

सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ मॅक्स प्लनेकने म्हटले आहे, "मी चेतनेला आधार मानतो. पदार्थ चेतनाजन्य आहे. आम्ही चेतनेच्या मागे जाऊ शकत नाही."

(फिलॉसॉफिकल आस्पेक्ट ऑफ मॉडर्न सायन्स, जोअड)

स्क्रॉडिजरलासुद्धा म्हणणे भाग पडले, "चेतनेला कधीही भौतिकवादाच्या परिभाषेत समजावून देणे शक्य नाही. कारण चेतनेची वास्तविकता मौलिक व आधारभूत आहे."

(कोटेड बाय मार्शल अर्बन इन ह्यूमन ॲण्ड डेइटी, पृ.३६६)

एकोणिसाव्या शतकात भौतिकवादी शास्त्रज्ञ असा दावा करीत होते की चेतना वास्तविकत: पदार्थाचे उत्पादन होय, परंतु आता विसाव्या शतकात शास्त्रज्ञ म्हणत आहेत की चेतना पदार्थाचे उत्पादन नव्हे तर पदार्थ स्वत: चेतनेचे उत्पादन होय.

जेम्स जीन्स याने म्हटले आहे, "चेतनेची वास्तविकता मौलिक आहे आणि भौतिक जगाचा आविर्भाव त्याच्यापासूनच झाला आहे."

अल्डस हक्सलेने आपल्या 'मीन्स ॲण्ड एण्डस्' या पुस्तकात प्रोफेसर ब्रॉड यांच्या विचारांना व्यक्त करताना लिहिले आहे- "ही गोष्ट मान्य करावी लागेल की मानव-आत्म्याचा मनुष्याच्या देहापासून वेगळे आपले स्वतंत्र अस्तित्व आहे आणि तो शारीरिक जीवनाच्या दशा व नियमांच्या अधीन नाही."

पाश्चात्य मानसशास्त्रज्ञ एफ. डब्ल्यू. बेलिसने निष्कर्षरूपात म्हटले आहे- "मनुष्य मनासमवेत शरीर नाही. तो शरीराद्वारे कार्य करणारे मन आहे. शरीर तर स्वत: मानसिक कर्मांचे परिणाम आहे. मनाद्वारे गठित झालेले आहे आणि मनाद्वारे परिवर्तीत होते."

(Man is not a body consisting a mind. The body itself is the result of the activity of mind is moulded by mind changed by mind.)

या उद्धरणावरून अनुमान केले जाऊ शकते की चेतना पदार्थापेक्षा गौण अथवा अमौलिक नाही की आम्हाला असा भ्रम व्हावा की एखाद्याच्या मृत्युनंतर त्याच्या शरीराचे भौतिक तत्त्व तर शिल्लक राहतात, परंतु त्याच्या चेतनेचे कसलेही अस्तित्व उरत नाही, जेव्हा चेतना भौतिक वस्तुपेक्षा कितीतरी अधिक सुदृढ व भौतिक आहे. मग हे कसे शक्य होऊ शकते की मृत्युनंतर भौतिक शरीराचे भाग तर शिल्लक राहावेत आणि चेतनेचे

कसलेही अस्तित्व बाकी राहू नये?

चेतनेच्या मौलिकतेची कल्पना आपण यावरून करू शकता की वर्तमान विचारक व वैज्ञानिक तर भौतिक जगाची व्याख्यासुद्धा चेतनेने करू लागले आहेत. पॉनिकेर व डेस्क्रेटस् वगैरेंच्या मतानुसार एखाद्या वस्तूच्या अस्तित्वाचा अर्थ केवळ एखाद्याच्या विचारात आढळणे मात्र आहे. सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ आर्थर एडिंग्टनच्या मते चित्र आमच्या अनुभवाची सर्वप्रथम व सर्वांत अधिक प्रत्यक्ष वस्तु आहे. याशिवाय जे काही आहे तो केवळ निष्कर्ष व कल्पना आहे. (पाहा - श्दीह ॅत्गी)

जेम्स जीन्सच्या विचाराने ब्रह्मांड एका महान सृष्टीकर्त्याच्या चित्ताची रचनाच नव्हे तर वास्तविकता हे चित्ताच्या केवळ त्या कल्पना व विचारांचे नाव आहे. वेळेप्रमाणेच स्थानाला (स्पेस) देखील समजले जाऊ लागले आहे. काही विचारकांचे कथन आहे की स्थान केवळ अंतस्थ (माइंड) मध्येच असते, त्याचे काही बाह्य अस्तित्व नाही. काही विचारक स्थानाची व्याख्या अशा प्रकारे करतात की स्पेस अनुभूतीसंबंधी तत्त्व आहे. याशिवाय अनुभूती होत नाही. अनुभूतीपासून भिन्न अथवा वेगळे स्वत:चे कोणतेही स्वतंत्र अस्तित्व नसते.

थोडक्यात असे की चेतना जगाची जगाची एखादी उपेक्षित वस्तु कदापि नाही तर चेतनाच जगाचा आधारस्तंभ आहे. म्हणून शास्त्रीय दृष्टिकोनाने ही गोष्ट समजण्याजोगी नाही की जगातील इतर वस्तूंचे अस्तित्व तर नष्ट होऊ नये व चेतनेने आपले अस्तित्व ठरवावे.

मृत्युनंतर आत्मा राहतो किंवा नाही या संबंधाने लोकांचे काही अनुभवसुद्धा आहेत. ज्याने या गोष्टीची कल्पना येते की मृत्युनंतरसुद्धा आत्मा जिवंत राहतो. अशा प्रकारे आता मृत्युनंतर अथवा शरीराविना आत्म्याचे अस्तित्व आढळणे अशास्त्रीय गोष्ट उरली नाही. या संबंधाने आत्मिक संशोधनाचे विवरण अत्यंत अद्भुत व आश्चर्यजनक आहे.

(या संबंधात पुढील पुस्तकांचा अभ्यास करणे योग्य होईल- (1) Psychiatry today - by Dr. D.D.S. Chark, (2) Fifty years of psychical Research - by Harry Price, (3) Varieties of Religious Experience - by William James, (4) Exploring the Psychic World - by Butler, (5) Survival of Man - by Oliver Lodge, (6) We do not die - by S. Desmond, (7) The Dead have never Died - by Randell, (8) Science and the Unseen World - by Sir Arthur Edington, (9) On the age of the Etheric - by Arther Findlay,

(10) A New Approach to Psychical Research - by Antony Flew, (11) The Death is not the End - by Abdy Coffins C.I.E., (12) The Ringing Radiance - by Sir Colin Garbett K.C.I.E. C.S.I. C.M.G.)

पवित्र कुरआनकडूनसुद्धा याच गोष्टीची पुष्टी होते की आत्मा मृत्युनंतरसुद्धा जिवंत राहतो. मनुष्य आपल्या व्यक्तित्वासमवेत बाकी राहतो. उदाहरणार्थ, पवित्र कुरआनच्या काही उद्धरणांचे अवलोकन करा,

**''जे लोक आपणच स्वतःवर अत्याचार करीत राहिले होते त्यांचे आत्मे जेव्हा दूतांनी कब्जात घेतले तेव्हा त्याना विचारले की तुम्ही या कसल्या दशेत गुरफटला होता? त्यांनी उत्तर दिले की, आम्ही पृथ्वीवर निर्बल व विवश होतो. दूतांनी सांगितले की अल्लाहची पृथ्वी विशाल नव्हती काय की तुम्ही देशत्याग करून दुसरीकडे जावे? अशा लोकांचे ठिकाण नरक आहे. आणि ते फारच वाईट ठिकाण आहे.''** -४:९७

**''सरतेशेवटी त्या लोकांनी ज्या वाईटातल्या वाईट चाली त्या श्रद्धावंतांविरूद्ध लढविल्या, अल्लाहने त्या सर्वांपासून त्याला वाचविले, आणि फिरऔनचे सोबती स्वतः अत्यंत वाईट प्रकोपाच्या चक्रात सापडले.''** -४०:४५-४६

या आयतीवरून स्पष्ट होते की मृत्युनंतरसुद्धा आत्मा राहतो व मनुष्याची चेतनाशक्ती काम करीत राहते. जर असे नसते तर फिरऔन व त्याचे लोक मारले गेल्यानंतर त्यांना नरकाग्नी दाखविण्याचा अर्थ काय असू शकतो? पवित्र कुरआनात आहे,

**''(हे लोक आपल्या कृत्यापासून परावृत्त होणार नाहीत) इथपावेतो की जेव्हा यांच्यापैकी एखाद्याला मरण येईल तेव्हा सांगू लागेल की, ''हे माझ्या पालनकर्त्या, मला त्याच जगात परत पाठव, जे मी सोडून आलो आहे, आशा आहे की मी आता सत्कर्म करीन.'' मुळीच नाही, ही तर केवळ एक गोष्ट आहे जी तो बरळत आहे. आता या सर्व (मरणाऱ्यांच्या) मागे एक आड (बरज़ख) आहे. मरणोत्तर जीवनाच्या दिवसापर्यंत.''** -२३:९९-१००

**''हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, त्या लोकांना मित्र बनवू नका ज्यांच्यावर अल्लाहचा क्रोध झाला आहे, जे परलोकाबद्दल त्याचप्रकारे निराश आहेत ज्याप्रकारे कबरीत पडलेले अश्रद्धावंत निराश आहेत.''** -६०:१३

या आयतीवरून कळले की मृत्युनंतर माणसाचा अजिबात अंत होत नाही.

मृत्युनंतर माणसाचा आत्मा शरीराविना जिवंत राहतो. वार्तालाप करतो व ऐकतोसुद्धा. तो चेतना, इच्छा-आकांक्षांनी युक्त असतो. आनंद व दुःख दोघांची अनुभूती त्याला होत असते. जगवासी व आपल्या जातीच्या लोकांशी त्याचा हार्दिक संबंधसुद्धा टिकून राहतो. जर अशी गोष्ट नसती तर त्याला त्या ईश्वराच्या आज्ञाकारी व पुण्यात्मा व्यक्तीला स्वर्गाची शुभवार्ताही दिली जाऊ शकत नाही आणि त्याला अशी इच्छा करणेसुद्धा शक्य नव्हते की त्याच्या जातीबंधुना परमगती व त्याच्या सुखमय परिणामाची सूचना मिळावी. पवित्र कुरआनमध्ये म्हटले गेले आहे,

**"आणि जे लोक ईश्वराच्या मार्गात मारले गेले त्यांना मृत समजू नका तर ते आपल्या प्रभुजवळ जिवंत आहेत, रोजी प्राप्त करीत आहेत."** -३:१६९

यावरून ज्ञात झाले की मृत्युनंतर केवळ इतकेच नव्हे की आत्मा जिवंत राहतो तर त्याला त्याच्या प्रभुकडून रोजी व मनपसंत आहारसुद्धा मिळू शकतो. त्याला अट अशी आहे की त्याने ऐहिक जीवनात आपली पात्रता सिद्ध करावी. प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या कथनानुसारसुद्धा हे कळते की मृत्यु व परलोकाच्या मधील अंतराळात पुण्यात्माला सर्व प्रकारचे सुख प्राप्त होते. पुण्यशील लोकांसाठी खान-पान, मनोरंजन, सुख-संवाद वगैरे सर्वांची पूर्ण संधी प्राप्त होते. उपरोक्त आयतीवरूनसुद्धा कळले की पुण्यशील लोकांना त्यांच्या प्रभुकडून रोजी मिळत असते.

यावर असा प्रश्न केला जातो की आत्म्याला रोजी आणि खाण्या-पिण्या वगैरेच्या सुखाचा काय अर्थ होतो? परंतु अशा प्रश्नांच्या पाठीमागे कोणताही गहन विचार आढळत नाही. अशा प्रकारच्या सुख अथवा दुःखाचे उदाहरण खुद्द आमच्या सद्य जीवनातच आढळते. काय आम्ही स्वप्नात केवळ बाह्य जगापासून वेगळे होऊनसुद्धा आनंद घेत नाही? हे सत्य नाही काय की स्वप्नात आम्हाला बोलण्या-चालण्या, चालण्या-फिरण्या व खाण्या-पिण्या वगैरेचा आनंद प्राप्त होत नाही? जर आमचे हे स्वप्न भंग झाला नाही तर काय स्वप्नातील गोष्टी आम्हाला खऱ्या वाटणार नाहीत? काय अनुभूतीपेक्षा अधिक एखादी गोष्ट आमच्यासाठी जवळची व खरी असू शकते?

जागृत अवस्थेतसुद्धा जी गोष्ट प्रत्यक्षपणे आमच्यापर्यंत पोहचली आहे ती अनुभूती तर आहे. चेतना व अनुभूतीच्या दृष्टीने पाहिले तर जागृत आणि स्वप्नावस्थेत सुख व आनंदात सहजातीयताच (फॅमिलिॲरिटी) आढळते. या सहजातीयतेची पुष्टी आजच्या कित्येक विचारक व शास्त्रज्ञांच्या धारणांनीसुद्धा होते. आम्ही वर डिकार्ट, जेम्स जीन्स वगैरेंचे विचार प्रस्तुत केले आहेत ज्यांच्या मतानुसार बाह्य जग व वस्तूंच्या अस्तित्वाचा

अर्थ केवळ एखाद्याच्या विचारात आढळण्यापेक्षा काही भिन्न नाही.

कुणीतरी अगदी सत्य कथन केले आहे की मृत्युनंतर आणि कियामत (प्रलय) च्या दिवशी किंवा परलोकात प्रवेश प्राप्त करण्यापूर्वी अपराधी व्यक्तीच्या आत्म्याची स्थिती त्या भयंकर स्वप्नासारखी असते जे स्वप्न फाशीची शिक्षा मिळालेली व्यक्ती त्या रात्री पाहते की जी गेल्यावर सकाळी तिला फाशी दिली जाणार असते. याउलट पुण्यशील माणसाच्या आत्म्याची स्थिती अशी असते की जसा एखादा मनुष्य आपले सत्कार्य व सुंदर कार्यानंतर आमंत्रित केला जाऊन सरकारी मुख्यालयावर पोहचलेला असावा व तो संमेलनाच्या तारखेपूर्वी एखादा दिवस अथवा काही तास अगोदर आशा व इच्छापूर्तीचे मोहक स्वप्न पाहत असावा. अशा व्यक्तीच्या आनंदाला पारावार नसतो.

अध्याय-७

# थोडे दूरवर पाहा काय दिसते?

## परलोकातील जग व पवित्र कुरआन

पवित्र कुरआनच्या अध्ययनाने कळते की परलोकाचा जगाशी गहन संबंध आहे. परलोक या जगाचे विकसित रूप आहे. जी उणीव आम्हाला येथे आढळते तिची पूर्तता तेथे केली जाईल. ज्या गोष्टी येथे लपलेल्या आहेत, त्या तेथे लपलेल्या राहणार नाहीत. तेथे माणसाला त्याच्या स्वत:च्या त्या पात्रतेनुसार जीवन प्राप्त होईल ज्याची पुष्टी त्याने वर्तमान जीवनात आपले विचार, भावना, कर्म वगैरेने केली असेल. प्रत्येक माणसाला त्याच्या कर्मांचे पूर्ण फळ तेथे मिळेल. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''मग ज्या क्षणी शिंग फुंकले जाईल त्यांच्यात मग कोणतेही नाते उरणार नाही आणि ते एकमेकाला विचारणारदेखील नाहीत. त्यावेळेस ज्यांचे पारडे जड असेल तेच यश संपादन करतील आणि ज्यांचे पारडे हलके असेल तेच लोक असतील ज्यांनी आपल्या स्वत:ला तोट्यात घातले, ते नरकात सदैव राहतील.''** -२३:१०१-१०३

पवित्र कुरआनमध्ये कियामत (प्रलय) वगैरेच्या वर्णनात सूर फुंकण्याचा उल्लेख वारंवार आला आहे. 'सूर'चा शाब्दिक अर्थ नरसिंगा (तुतारी) असा आहे. नरसिंगा फुंकण्याचा उल्लेख बायबलमध्येसुद्धा आढळतो. 'सूर' (तुतारी) फुंकण्याचा वास्तविक आशय राजसी प्रतापाचे प्रदर्शन, असामान्य धोका व भीतीचा उद्‌घोष होय. कियामत व आखिरतचा दिवस अत्यंत भय व शंकेचा असेल. हा अंतिम निर्णयाचा दिवस असेल. ईश्वराचा प्रताप पूर्णपणे त्या दिवशी प्रकट होईल. त्या दिवशी शरण त्याच लोकांना मिळू शकेल आणि तेच लोक भय व दु:खापासून निश्चिंत होऊ शकतील ज्यांच्यावर त्यांचा प्रभु प्रसन्न होईल. जगात मनुष्य एकटाच येतो. त्या दिवशीसुद्धा तो आपला जबाबादर स्वत: असेल. पवित्र कुरआनमध्ये म्हटले गेले आहे,

**''दाणे आणि बीज काढणारा अल्लाह आहे. तोच सजीवाला निर्जीवातून काढतो आणि तोच निर्जीवाला सजीवातून बाहेर काढणारा आहे. ही सर्व कामे करणारा तर अल्लाहच आहे, मग तुम्ही कोठे भरकटले जात आहात?''** -६:९५

**''पुनरुत्थानाच्या दिवशी न तुमचे नातेसंबंध काही उपयोगी पडतील न तुमची संतान. त्या दिवशी अल्लाह तुमच्या दरम्यान ताटातूट निर्माण करील,**

**आणि तोचतुमची कृत्ये पाहणारा आहे.''** -६०:३

**''त्या दिवशी माणूस आपला भाऊ आणि आपली आई आणि आपले वडील आणि आपली पत्नी व आपल्या संततीपासून दूर पळेल. त्यांच्यापैकी प्रत्येक माणसावर त्या दिवशी अशी वेळ येऊन ठेपेल की त्याला आपल्याखेरीज कुणाचेही भान राहणार नाही.''** -८०:३४-३७

**''निस्संदेह कान व डोळे आणि हृदय - या सर्वांच्या संबंधी व्यक्तीला विचारण्यात येईल.''** -१७:३६

**''आणि प्रत्येकाने जी काही कमाई केलेली असेल त्याप्रमाणे पूर्तता केली जाईल आणि त्यांच्यावर कसलाही जुलूम केला जाणार नाही.''** -३:२५

**''ज्या दिवशी प्रत्येक मनुष्य आपण केलेल्या सत्कर्मांना आपल्या समोर पाहील आणि जे पाप केले असेल तेसुध्दा हजर असल्याचे पाहील.''** -३:३०

**''त्यावेळी प्रत्येकजण आपल्या कर्माची फळे चाखील, सर्वजण आपल्या खऱ्या स्वामीकडे परतविले जातील आणि ते सर्व असत्य जे त्यांनी रचले होते हरवतील.''** -१०:३०

या आयतीवरून स्पष्ट झाले की तो दिवस हिशेब तपासणीचा दिवस असेल. मनुष्याचे वर्तमान जीवन वास्तविकत: त्याच दिवसाच्या तयारीसाठी आहे व अशासाठी नव्हे की माणसाने आपली जबाबदारी विसरून जे काही त्याच्या मनात येईल ते करीत सुटावे. पवित्र कुरआनावरून हेदेखील कळते की माणसाला त्या दिवशी जी शिक्षा अथवा बक्षीस दिले जाईल ते त्याच्या चांगल्या-वाईट कर्मांनुसार असेल.

**''आणि जो माझे 'जिक्र' (उपदेशपाठ) पासून तोंड फिरवील त्याच्यासाठी त्याचे जीवन अडचणीचे होईल. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्याला अंध उठवू. तो म्हणेल, ''हे पालनकर्त्या, जगात तर मी डोळस होतो, येथे मला आंधळा म्हणून का उठविले?'' सर्वश्रेष्ठ अल्लाह फर्मावील, होय, अशाच प्रकारे तर आमच्या वचनांना, जेव्हा त्या तुझ्यापाशी आल्या होत्या तू विसरला होतास, त्याचप्रकारे आज तू विसरला जात आहेस.''** -२०:१२४-१२६

अर्थात जो जगात आपल्या समजुतदारपणाचा प्रयोग करणार नाही तो तेथे डोळ्यानेसुद्धा आंधळा होईल. जो येथे अल्लाहच्या आयती व आदेशांना विसरून जाईल अल्लाहचा दयाळूपणासुद्धा तेथे त्याला विसरून जाईल. त्याच्यावर अजिबातच दया केली जाणार नाही. पवित्र कुरआनमध्ये एका अन्य ठिकाणी आहे,

**"आणि जो येथे आंधळ्यासारखा राहील परलोकामध्येसुद्धा तो आंधळाच राहील."** -१७:७२

हदीसमध्ये आहे,

**"जो मानवावर दया करील, ईश्वर त्याच्यावर दया करील."** -तिर्मिजी

आणखी एका हदीसमध्ये आहे,

**"जो कोणी एखाद्या मुसलमानाच्या जगातील कष्टापैकी एखादे कष्ट दूर करील तर अल्लाह अंतिम निवाड्याच्या दिवशी त्याचे कष्ट दूर करील आणि जो कोणी एखाद्या गरीबाला संकटात अडवील तर अल्लाह जग व परलोकात त्याला संकटात घालील."** -तिर्मिजी

पवित्र कुरआनमध्ये आहे की जे लोक अल्लाहला विसरून बसले आहेत आणि मोतादांना भोजन देण्यासाठी प्रोत्साहित करीत नाहीत त्यांना जखमा धुतलेले पाणी खावयास मिळेल.

**"(आज्ञा होईल) धरा याला आणि याच्या मानेत जोखड घाला, मग याला नरकामध्ये झोकून द्या, मग याला सत्तर हात लांब साखळीत जखडा. हा श्रेष्ठ व उच्चतर अल्लाहवर श्रद्धाही ठेवीत नव्हता व गरिबांना जेवण देण्यास लोकांना उद्युक्तही करीत नव्हता. म्हणून आज येथे याचा ना कोणी दुःखाचा वाटेकरी मित्र आहे आणि ना जखमांच्या पू शिवाय त्याच्यासाठी कोणते जेवण, ज्यास अपराध्याशिवाय कोणीही खात नाही."** -६९:३०-३७

ज्या लोकांना ईश्वराने येथे सर्वकाही देऊन ठेवले आहे, महाल व प्रासाद त्यांचे आहेत, बागासुद्धा आहेत. सन्मान व प्रतिष्ठासुद्धा त्यांना प्राप्त आहे. जर ते ईश्वराचा उपकार मानित नाहीत, जगात त्यांना जे काही मिळाले आहे त्यांचा हक्क अदा करीत नाहीत आणि अल्लाहच्या आयतींचा इन्कार करतात ते आपल्या करतुतींप्रमाणे शिक्षेचे भागीदार होतील. पवित्र कुरआन म्हणतो,

**"गरम हवा व उकळत्या पाण्यात काळ्या धुराच्या छायेत, जी थंडही नाही व सुखदायीसुद्धा नाही. निश्चितच ते यापूर्वी सुख भोगत होते."**

-५६:४२-४५

हदीसमध्ये आहे की प्रेषित मुहम्मद (स.) यांनी काही असे लोक पाहिले ज्यांचे अर्धे शरीर सुंदर व अर्धे कुरूप होते. हे ते लोक होते ज्यांची काही कार्ये चांगली व काही वाईट होती.

यावरून स्पष्ट झाले की सत्कर्म सुंदरता व दुष्कर्म कुरुपतेच्या रंगात स्पष्ट झाले. प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

**''जो मनुष्य अकारण भिक्षा मागतो तो जेव्हा उठेल तेव्हा त्याच्या तोंडावर मांस नसेल.''** -तिर्मिजी

अशा प्रकारे जगात निर्लज्जपणा व अप्रतिष्ठा असे रूप धारण करील की तोंडावर मांससुद्धा असणार नाही. चेहरा अत्यंत कुरूप आणि छबीहीन होईल. त्यांनी असेसुद्धा म्हटले आहे,

**''दोन पत्नींचा पती जो एका पत्नीचा हक्क अदा करतो व दुसरीकडे दुर्लक्ष करतो, अंतिम निवाड्याच्या दिवशी अशा प्रकारे येईल की त्याची एक बाजू (गळीत अथवा लुळी झाल्यामुळे) वाकलेली असेल.''** -तिर्मिजी

पत्नी आपल्या पतीचा अंग असते. तिचा हक्क अदा न करणे म्हणजे आपल्याच अंगाला लुळे बनविणे होय.

परलोक आमची व या जगाची एक गरज आहे. जर परलोक नसेल तर ऐहिक जीवनाचा कोणताही वास्तविक अर्थ उरत नाही. जगातील सर्व वस्तु आम्हाला सहाय्यक ठरल्या आहेत. त्यांचा आम्ही उपयोग करतो. येथे आढळणाऱ्या शक्तींना आम्ही प्रयोगात आणतो आणि त्या आमच्या ताब्यात राहून आम्हाला उपयोगी सिद्ध होतात व आम्ही आपल्या सर्वच कर्मांचे आपले चरित्र निर्माण करतो. आमचे कर्म व आमच्या भावना आम्ही चांगले अथवा वाईट असल्याचे प्रमाण देतात. विचार करण्याची गोष्ट अशी आहे की जगातील सर्व वस्तुंचे प्रयोजन तर अशा प्रकारे पूर्ण होत आहे की त्या आम्हाला उपयोगी पडतात. त्या आपल्या सेवा आम्हाला अर्पित करतात. मग आमचेसुद्धा काही प्रयोजन असणे आवश्यक आहे. आमच्या जीवनाचासुद्धा काही उद्देश असेल तर आमचे प्रयत्न आपल्या वास्तविक उद्देश व प्रयोजनांच्या पूर्ततेसाठी आहेत, मग तर आम्ही सफल आहोत. जर आमचे प्रयत्न आमच्या आपल्या जीवनाच्या उद्देशाच्या विरूद्ध आहेत तर आमचे अपयश निश्चितच आहे.

पवित्र कुरआन म्हणतो की वास्तविकता अशी आहे की मानवाचे जसे प्रयत्न असतील, तशी त्यांची चरित्रनिर्मिती होईल, त्याचा परिणाम तर निश्चितपणे होईल, हे शक्य नाही की पाण्यापासून तर गारवा मिळावा, फुलापासून सुवास व सौंदर्य मिळावे, अन्न आणि फळांनी आहार बनावे, सूर्यापासून उष्णता-प्रकाश प्राप्त व्हावा आणि मानवाच्या चांगल्या-वाईट कृत्यांचे काहीही होऊ नये? असे कदापि शक्य नाही. मानवाचे

कर्म, त्याचा चांगुलपणा व दुष्टतासुद्धा निश्चितपणे आपला प्रभाव दाखवील. त्यांचा चांगलुपणा व वाईटपणा ईश्वर पाहत आहे तो हे परिणामहीन सोडू शकत नाही. मानवाच्या चांगल्या-वाईट कर्मांचे पूर्णपणे मूल्यमापन होणार आहे. प्रत्येक माणसाचे शील-स्वभाव व चरित्र पाहिले जाईल आणि या परीक्षा-अवधीनंतर त्यांचे आपले कर्म व चरित्रानुसार त्यांच्यासंबंधी निर्माण होणार आहे. मानवावर पूर्णपणे लक्ष ठेवले जात आहे की तो काय करतो? पवित्र कुरआनमध्ये यासंबंधी सांगितले आहे,

**''प्रत्येक माणसाच्या पुढे आणि मागे त्याने नियुक्त केलेले निरीक्षक लागून आहेत जे अल्लाहच्या आज्ञेने त्याच्यावर देखरेख करीत आहेत. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह कोणत्याही जनसमूहाच्या स्थितीत परिवर्तन करीत नाही जोपर्यंत तो स्वतः आपल्या गुणांना बदलत नाही आणि जेव्हा अल्लाहने एखाद्या जनसमूहावर अरिष्ट आणण्याचा निर्णय घेतला तेव्हा ते कोणाच्याही टाळल्याने टळू शकत नाही, आणि अल्लाहच्या विरोधात अशा जनसमूहाचा कोणी संरक्षक व मदतगारही असू शकत नाही.''** -१३:११

परलोकात माणसाने सर्व केले-सवरलेले समोर येईल. त्या दिवशी लोकांच्या स्वत:च्या जिव्हा व हातपाय त्यांनी केलेल्या कर्मांचे साक्षीदार बनतील. माणसांचे कान, डोळे आणि त्वचासुद्धा त्यांच्या कर्माची ग्वाही देतील. अधर्मी स्वत: आपल्या अपराधांचा स्वीकार करतील. प्रत्येक व्यक्ती साक्षीदार व आपल्या कर्म-पत्रासह ईश्वरी न्यायालयात हजर केली जाईल. अयोग्य रूपाने येथे कोणीही तिला सहाय्य करू शकणार नाही. तिला म्हटले जाईल,

**''दाणे आणि बीज काढणारा अल्लाह आहे. तोच सजीवाला निर्जीवातून काढतो आणि तोच निर्जीवाला सजीवातून बाहेर काढणारा आहे. ही सर्व कामे करणारा तर अल्लाहच आहे, मग तुम्ही कोठे भरकटले जात आहात?''** -६:९५

प्रत्येक माणसासमोर त्याचा लेखीटाकी हिशेब प्रस्तुत केला जाईल. तो स्वतः आपला हिशेब दाखवील.

**''प्रत्येक माणसाचा शकून आम्ही त्याच्या स्वतःच्या गळ्यात लटकविलेला आहे. आणि पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही एक लेख त्याच्यासाठी काढू जो त्याला उघड पुस्तकाप्रमाणे आढळेल. वाच, आपल्या कृत्यांची नोंद, आज स्वतःचा हिशेब करण्यासाठी तू स्वतःच पुरेसा आहेस.''** -१७:१३-१४

येथे लाच देऊन काम काढून घेतले जाणे शक्य नाही.

**"ज्या दिवशी संपत्ती उपयोगी पडणार नाही की संतती."** -२६:८८

कोणाचा वंश अथवा कुळाचा प्रभाव उपयोगी पडू शकणार नाही.

**"पुनरुत्थानाच्या दिवशी न तुमचे नातेसंबंध काही उपयोगी पडतील न तुमची संतान. त्या दिवशी अल्लाह तुमच्या दरम्यान ताटातूट निर्माण करील, आणि तोचतुमची कृत्ये पाहणारा आहे."** -६०:३

प्रत्येक व्यक्तीचे कर्म पूर्णपणे तोलले जातील आणि कणाकणाचा हिशेब घेतला जाईल.

**"पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही ठीकठीक वजन करणारे तराजू ठेवू. मग कोणत्याही व्यक्तीवर यत्किंचितदेखील अत्याचार होणार नाही. ज्याने मोहरीच्या दाण्याबरोबरदेखील काही केले सवरले असेल ते आम्ही समोर आणू आणि हिशेब लावण्यास आम्ही पुरेसे आहोत."** -२१:४७

माणसाला त्याच्या कर्मांनुसार मोबदला मिळेल.

**"त्यावेळी तुम्ही प्रत्येक समूहाला गुडघे टेकून पडलेले पाहाल. प्रत्येक समूहाला हाक दिली जाईल की त्याने यावे व आपली कृति-नोंद पाहावी. त्यांना सांगितले जाईल, "आज तुम्हा लोकांना त्या कृत्यांचा बदला दिला जाईल जे तुम्ही करीत राहिला होता."** -४५:२८

प्रत्येकाचे दर्जे त्याच्या कर्मांनुसार निर्धारित केले जातील. कर्मच ती निर्णायक गोष्ट असेल जिच्यामुळे मनुष्य उच्चते उच्च पद प्राप्त करू शकेल.

**"आणि प्रत्येकाचे दर्जे जे काही त्यांनी केले असेल त्याप्रमाणेच असतील."** -६:१३३

ईश्वरी न्यायालयात प्रत्येकाच्या बाबतीत जो निर्णय होईल तो न्यायानुकूल असेल. चुकीचे प्रभाव टाकून काम करून घेणे तेथे शक्य होऊ शकणार नाही. मनुष्य ज्या गोष्टीवर विश्वास करू शकतो ते त्याचे चांगले कर्मच आहेत. चांगल्या कर्मांद्वारेच ईश्वराची दया प्राप्त होऊ शकेल. तेथील परिस्थिती आपल्या अनुकूल असावी याचा एक उपाय आहे की माणसाने स्वत: आपल्याला तेथील परिस्थितीनुसार पात्र बनवावे.

## नरक

परलोकात वाईट लोकांचे स्थान नरक असेल. नरकात मानसिक शिक्षेशिवाय शारीरिक शिक्षासुद्धा दिली जाईल. पवित्र कुरआनमधून काही उदाहरणे येथे दिली जात

आहेत.

**''अग्नीमुळे त्यांचे चेहरे पोळतील आणि ते त्यात कुरूप होऊन जातील.''** -२३:१०४

**''निस्संदेह ते (नरक) ज्वाला फेकणारे आहे की मांस ओढून घेणारे आहे.''** -७०:१५-१६

**''आणि तुम्हाला काय कल्पना की 'सकर' (नरक) काय आहे! ती दयाही करणार नाही आणि सोडणारही नाही. शरीराला पोळून टाकणारी आहे.''** -७४:२७-२९

येथे गारवा व विश्रांतीचे नावसुद्धा नसेल.

**''ते येथे गारव्याचाही आस्वाद घेणार नाही की पेयाचाही नाही.''** -७५:२४

**''आणि त्यांना उकळते पाणी पाजले जाईल, ते त्यांच्या आतड्यांना कापील.''** -४७:१५

**''हे दोन पक्ष आहेत ज्यांच्या दरम्यान आपल्या पालनकर्त्यासंबंधी वितंडवाद आहे, यांच्यापैकी ते लोक ज्यांनी सत्य नाकारले, त्यांच्यासाठी अग्नीचा पोषाख तयार केला गेला आहे. त्यांच्या डोक्यावर उकळते पाणी टाकले जाईल ज्यामुळे त्यांची केवळ त्वचाच नव्हे तर पोटाच्या आतील भागदेखील वितळेल आणि त्यांचा समाचार घेण्यासाठी लोखंडी घण असतील. जेव्हा जेव्हा ते घाबरून नरकामधून बाहेर पडण्याचा प्रयत्न करतील परत त्यातच ढकलून दिले जातील की चाखा आता जळण्याच्या शिक्षेची चव.''** -२२:१९-२२

**''जक्कूमचे वृक्ष गुन्हेगारांचे खाद्य असेल, तेलाच्या उकळीप्रमाणे, पोटांत ते अशाप्रकारे उकळेल जसे उकळते पाणी उसळत असते''** -४४:४३-४५

**''तेथे तो मरणारही नाही आणि जिवंतही राहणार नाही.''** -८७:१३

पवित्र कुरआनच्या या आयतींवरून स्पष्ट होते की परलोकात ज्या लोकांचे स्थान नरक असेल त्यांना सर्व प्रकारच्या शारीरिक यातना दिल्या जातील आणि ते त्यातून मुक्त होऊन जाऊ शकत नाहीत.

## मानसिक यातना

यातना दिल्याने अपराध्यांच्या मन:स्थितीचे चित्रण पवित्र कुरआनने या शब्दांत

केले आहे,

**"एखादे वेळी असे होऊ नये की एखाद्याने नंतर म्हणावे, खेद आहे माझ्या त्या आगळिकीवर जी मी अल्लाहच्या हुजूरात करीत राहिलो, किंबहुना मी तर उलट टिंगल करणाऱ्यांत सामील होतो."** -३९:५६

**"मग जेव्हा हे अश्रद्ध अग्नीपुढे आणून उभे केले जातील तेव्हा यांना सांगितले जाईल, तुम्ही आपल्या वाट्याची सगळी ऐश्वर्ये जगातील आपल्या जीवनातच संपवून टाकली आहेत आणि त्यांचा आनंद उपभोगिला, आणि तो गर्व तुम्ही पृथ्वीतलावर कोणत्याही अधिकाराविना करीत राहिला आणि ज्या अवज्ञा तुम्ही केल्या त्यापायी आज तुम्हाला अपमानास्पद यातना दिली जाईल."** -४६:२०

**"(अल्लाह) म्हणेल धिक्कारलेल्याप्रमाणे पडून राहा याच (नरक) मध्ये व माझ्याशी बोलू नकोस."** -२३:१०८

**"जेव्हा ते यातना पाहतील, तेव्हा मनोमनी पश्चात्ताप करतील."** -१०:५४

**"उरले ते लोक जे अल्लाहशी केलेला करार व आपल्या शपथा अल्पशा किमतीवर विकून टाकतात तर त्यांच्यासाठी पारलौकिक जीवनात कोणताही वाटा नाही. अल्लाह कयामतच्या दिवशी त्यांच्याशी बोलणारही नाही, त्यांच्याकडे पाहणारही नाही आणि त्यांना पवित्रही करणार नाही किंबहुना त्यांच्यासाठी तर अत्यंत यातनादायक शिक्षा आहे."** -३:७७

पवित्र कुरआनच्या या आयती म्हणतात की नरकात जाणारे प्रत्येक प्रकारच्या मानसिक पिडेत ग्रस्त असतील आणि त्यांच्यासमोर कोणताही उपाय असणार नाही की त्यांचा स्वत:चा उद्धार करू शकावे. म्हणून जर आज आम्हाला ही सुवर्णसंधी प्राप्त आहे की आम्ही आपल्या अपमान व यातनांपासून स्वत:ला वाचवू शकावे. तर यात कोणत्याही प्रकारचा बेसावधपणा आमच्याकडून होता कामा नये.

## जन्नत (स्वर्ग)

पारलौकिक जीवनात स्वर्ग (जन्नत) त्यांचे ठिकाण आहे ज्यांनी जगात आपले कर्तव्य पूर्ण केले असेल व जे ईश्वराचे आज्ञाधारक बनून राहिले असतील. स्वर्ग परम धाम व सुखाचे स्थान आहे. ते फार मोठे भाग्यशाली आहेत जे स्वर्गामध्ये दाखल होऊ शकतील. येथे थोडक्यात स्वर्गाचा परिचय करून देण्याचा प्रयत्न केला गेला आहे.

जन्नत शाश्वत उद्यान आहे जेथे सर्व प्रकारचे सुख व आनंद आहे. जेथे जीवन अनंत व आनंदपूर्ण आहे. स्वर्गाच्या आनंदाचा कधीही अंत होणार नही. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"उरले ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली व सत्कृत्ये केली तर त्यांना आम्ही अशा उद्यानात दाखल करू ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील आणि ते तेथे सदासर्वदा राहतील. हे अल्लाहचे सत्यवचन आहे, आणि अल्लाहपेक्षा आपल्या वचनात अन्य कोण सच्चा असू शकतो?"** -४:१२२

**"ही एक आठवण होती. (आता ऐका की) भय बाळगणाऱ्यांसाठी निश्चितच उत्तम ठिकाण आहे, सदैव राहणाऱ्या स्वर्गात ज्यांची द्वारे त्यांच्यासाठी खुली असतील. त्यात ते लोड लावून बसले असतील, खूप खूप मेवे व पेये मागवीत असतील, आणि त्यांच्याजवळ लाजऱ्या समवयस्क पत्नीं असतील. या त्या गोष्टी होत ज्या हिशेबाच्या दिवशी प्रदान करण्याचे तुम्हाला वचन दिले जात आहे. ही आमची सामग्री आहे जी कधीही संपणार नाही."** -३८:४९-५४

**"होय, परंतु ज्यांनी श्रद्धा बाळगली व अनुकूल कर्म केले त्यांच्यासाठी असा मोबदला आहे, ज्याचा क्रम कधीही तुटणार नाही."** -९५:६

स्वर्ग शाश्वत आहे. वैकुंठ (स्वर्ग) त्यालाच तर म्हणतात जो कधीही कुंठित होत नाही. स्वर्गामध्ये ज्या वस्तु अल्लाहकडून मिळतील त्यासुद्धा कधी समाप्त होणार नाहीत. स्वर्गामध्ये मृत्युही असणार नाही.

**"ईशभीरू लोक शांतीच्या स्थळी असतील. उद्यानात व झऱ्यादरम्यान, तलम रेशीम व जरतारी वस्त्रे परिधान करून समोरासमोर बसले असतील, असे असेल त्यांचे वैभव. आणि आम्ही गोऱ्यापान मृगनयनी स्त्रियाशी त्यांच्या जोड्या बनवू. तेथे ते समाधानपूर्वक हरतऱ्हेच्या चविष्ट वस्तू मागतील. तेथे मृत्यूची चव ते कधीही घेणार नाहीत. बस्स, जगात जो मृत्यू आला तोच आला. आणि तो त्यांना भडकत्या अग्नीच्या (नरक) यातनांपासून वाचवील."** -४४:५१-५६

जन्नतचे लोक जन्नतमधून निघू इच्छिणार नाहीत आणि ते तेथून काढलेही जाणार नाहीत.

"तेथे त्यांना कोणत्याही त्रासाला तोंड द्यावे लागणार नाही आणि ते तेथून कधीही काढलेही जाणार नाहीत." -१५:४८

"तथापि ते लोक ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी सत्कृत्ये केली त्यांच्या

पाहुणचारासाठी फिरदौसच्या (श्रेष्ठ स्वर्गाच्या) बागा असतील, ज्यांत ते सदैव राहतील आणि कधीही इतरत्र जाण्याची त्यांची इच्छा होणार नाही.'' -१८:१०७-१०८

जन्नत काय असेल? एक विशाल राज्य असेल जे स्वर्गवाल्यांना मिळेल आणि राज्यसुद्धा असे की ज्याचा कधी अंत होणार नाही. जे कधी नष्ट होणार नाही. पवित्र कुरआनमधील एक आयत पाहा,

**''म्हणून महान अल्लाह त्यांना त्या दिवसाच्या संकटापासून वाचवील आणि त्यांना टवटवीतपणा व उल्हास प्रदान करील आणि त्यांच्या संयमाबद्दल त्यांना स्वर्ग व रेशमी पोशाख प्रदान करील. तेथे ते उच्च आसनावर तक्के लावून बसले असतील. त्यांना ना उन्हाची उष्णता त्रास देणार ना हिवाळ्याचा गारवा. स्वर्गाची छाया त्यांच्यावर झुकून सावली करीत असेल आणि त्याची फळे सदैव त्यांच्या आवाक्यात असतील (ती हवे तशी तोडून घ्यावीत) त्यांच्यापुढे चांदीची भांडी आणि काचेचे पेले फिरविले जात असतील. पेलेही ते जे चांदीचे असतील आणि ते (स्वर्गाच्या व्यवस्थापकांनी) योजनाबद्ध भरले असतील. त्यांना तेथे अशा पेयाची पेये पाजली जातील ज्यात सुंटीचे मिश्रण असेल. हा स्वर्गाचा एक झरा असेल ज्याला 'सलसबील' म्हटले जाते. त्याच्या सेवेसाठी अशी मुले धावत फिरत असतील जी सदैव मुलेच राहतील. तुम्ही त्यांना पाहिले तर असे वाटेल की मोती आहेत जे विखुरले गेले आहेत. तेथे जिकडे कुणीकडे तुम्ही दृष्टी टाकाल तिकडे देणग्याच देणग्या आणि एका मोठ्या राज्याचा सरंजाम तुम्हाला दिसेल.''**

-७६:११-२०

जन्नतच्या या उपलब्धींचा अर्थ असा नव्हे की तेथे केवळ बाह्य सुखच प्राप्त होईल आणि आत्मिक सुखाची व्यवस्था तेथे नसेल. गोष्ट अशी नाही. आम्ही जगातसुद्धा पाहतो की येथे जर शारीरिक सुखाची सामग्री आहे तर या बरोबरच अन्तर्ज्ञानीसाठी येथे आत्मिक व आध्यात्मिक सुख व समाधानसुद्धा आहे. इतकेच नव्हे तर सत्य असे आहे की जे जाणतात त्यांना तर प्रत्येक वस्तूवरून परमात्माची खबर मिळते. त्यांच्यासाठी तर प्रत्येक वस्तू एक माध्यम आहे. जिच्याद्वारे त्यांना ईश्वरी अनुकंपा व दिव्य ज्योती आणि सौंदर्याचा बोध होतो. पाहणारे डोळे असतील तर रूपात अरूपाचेच दर्शन घडते. स्वरांच्या माध्यमाने त्या अस्वर व सौंदर्याची खबर मिळू लागते जे स्वरामध्ये लपलेले असते. ईश्वराने बनविलेली कोणतीही वस्तु अशुभ असू शकत नाही. प्रत्येक वस्तु ईश्वराची निशाणी आहे ती ईश्वराचाच परिचय देते. त्यासाठी केवळ दृष्टीच अपेक्षित आहे. सर्व वस्तु वास्तविकत: पृष्ठभूमीचे काम करतात. अपेक्षित आभासासाठी एक प्रकारचा 'कॉन्ट्रास्ट'

व विरोध आवश्यक आहे. ते 'कान्स्ट्रास्ट'मध्ये उपलब्ध होते. पांढऱ्या खडूचे लिखाण काळ्या फळ्याच्या पृष्ठभागावर स्पष्ट होते. अगदी अशाच प्रकारे रूपात कुरुपाची, स्वरात नि:स्वराची आणि ध्वनीमध्ये नि:ध्वनीची अभिव्यक्ती होते. फुलात काय सुंदर असते? काय ते रसायन आणि भौतिक तत्त्व सुंदर असतात की ज्यांच्यामुळे फुलाची निर्मिती होते? नव्हे, तर ते रूप व भाव सुंदर असते ज्याचा आभास आम्हाला फुलाच्या माध्यमाने मिळू लागतो.

जर वस्तुस्थिती अशी आहे तर मग कोणतीही वस्तु उपेक्षित का असावी? उपेक्षेसाठी योग्य तर आमची ती संकुचित दृष्टीच असू शकते की जिने सत्य पाहण्यात अडथळा बनावे. स्वर्ग तर आत्मिक सुखांचे भांडार आहे. तेथे जो पदार्थ, ज्या वस्तु आम्हाला प्राप्त होतील त्यांची येथील वस्तूंशी तुलना होऊ शकत नाही. तेथे ते सर्वकाही प्राप्त होऊ शकेल ज्याची एखादा इच्छा करू शकेल. ते अत्यंत अल्पबुद्धीचे लोक आहेत जे स्वर्गामधील वस्तूंचा उपहास करतात, वास्तविकत: ते आपल्या शरीराची उपेक्षा करू शकत नाहीत. मित्राशिवाय जिवंत राहू शकत नाहीत. तरीसुद्धा ते स्वर्गामधील वस्तूंचा, स्वर्गलोकाचा उपहास करतात. किती निर्लज्जपणाची ही गोष्ट आहे की ज्या वस्तु ईश्वराचे वरदान आहेत, ज्या मानवाच्या स्वत:च्या गरजा आहेत. ते त्यांचाच निरादर करू लागले? कदाचित त्यांना माहीत नाही की धर्म मूलत: निषेध नव्हे तर तो उपलब्धी आहे. मोठा अधर्म माजविला आहे त्या लोकांनी की ज्यांनी ईश्वराने रचलेल्या वस्तूंची उपेक्षा करणे योग्य समजले आणि त्यांची निंदा करण्यातच आपली संपूर्ण शक्ती वाया घालविली.

स्वर्गामध्ये प्रत्येक अपेक्षित वस्तू हजर असेल. तेथे प्रत्येक खुशी मिळेल. प्रत्येक इच्छेची पूर्तता होईल. पवित्र कुरआन यासंबंधी स्पष्ट म्हणतो,

**''मग जशी काही डोळ्यांची शीतलता त्यांच्या कर्मांच्या मोबदल्यात त्यांच्यासाठी लपवून ठेवली गेली आहे त्याची खबर कोणत्याही प्राण्याला नाही.''** -३२:१७)

प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

**''अल्लाह म्हणतो की मी आपल्या पुण्यशील दासासाठी ते काही गोळा करून ठेवले आहे जे कोणत्याही डोळ्याने पाहिले नाही आणि कोणत्याही कानाने ऐकले नाही आणि ना कोणत्याही माणसाच्या मनात त्याचा विचार आलेला आहे.''** (बुखारी)

**''आणि तेथे ती प्रत्येक वस्तु असेल जिची इच्छा आत्मा करतील आणि**

**डोळे जिचा स्वाद घेतील आणि तुम्ही त्यात सदैव राहाल."** -४३:७१

**"तेथे तुमच्यासाठी ते काही आहे ज्याची इच्छा तुमची मने करतील आणि तेथे तुमच्यासाठी ते काही आहे ज्याची तुम्ही मागणी कराल."** -४१:३१

**"त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्यापाशी ते सर्वकाही आहे जे ते इच्छितील."** -३९:३४

**"फर्माविले जाईल, "ही आहे वस्तू जिचे तुम्हाला वचन दिले जात असे, त्या प्रत्येक माणसासाठी जो रुजू होणारा आणि खूप खबरदारी घेणारा होता. जो न पाहता 'रहमान' (परमदयाळू अल्लाह) ला भीत असेल आणि जो ईश्वरासक्त हृदयाने आला असेल. सांगितले जाईल, "दाखल व्हा स्वर्गामध्ये सुखरूपपणे." त्या दिवशी शाश्वत जीवनाचा दिवस असेल."** -५०:३२-३४

जन्नतच्या उपलब्धी आणि जन्नतमध्ये जाणाऱ्यांच्या कर्मांमध्ये सादृश्यता व अनुरूपता असेल. जशी त्यांची कार्ये असतील त्याच्या अनुरूप त्यांना मोबदला मिळेल. हदीसमध्ये आहे,

**"अंतिम निवाड्याच्या दिवशी अल्लाह म्हणेल : हे माझ्या दासांनो! अशी तुमची कर्मे आहेत जी तुम्हाला परत मिळत आहेत, तर ज्याला सुफळ मिळेल त्याने अल्लाहला धन्यवाद द्यावे आणि ज्याला वाईट फळ मिळेल त्याने स्वतःचा धिक्कार करावा."** -मुस्लिम, तिर्मिजी, इब्ने माजह

जे लोक जगात ईश्वराला भीत असत आणि निश्चिंत व अनुत्तरदायी बनून जीवन जगत नसत, त्या दिवशी त्यांची भीती दूर होईल, मग त्यांना कोणतीही चिंता त्रस्त करणार नाही. पवित्र कुरआनच्या शब्दांत, तेथे त्यांच्या तोंडातून असे शब्द निघतील,

**"पूर्वी जेव्हा आम्ही आमच्या कुटुंबात होतो आम्हाल भय असे, अल्लाहने आमच्यावर उपकार केले आणि आम्हाला पोळण्याच्या यातनेपासून वाचविले."** -५२:२६-२७

जगात ईश्वराच्या आज्ञाधारक लोकांची अधर्मी टिंगल उडवीत असत. त्या दिवशी मामला उलट असेल,

**"जे अपराधी आहेत ते श्रद्धावंतांचा उपहास करीत असत.... तर आजच्या दिवशी ईमानधारक अधर्मियांवर हसत आहेत, उंच आसनावरून पाहत आहेत."** -८३:२९,३४-३५

हदीसमध्ये आले आहे की जन्नतमध्ये उच्चस्वराने सांगितले जाईल,

**''येथे असले आरोग्य आहे की आजारी पडणार नाही, असले जीवन आहे की मृत्यु येणार नाही, असले तारुण्य आहे की म्हातारे होणार नाही आणि असली विश्रांती आहे की पुन्हा त्रास होणार नाही. लोकांचे चेहरे आपापल्या कर्मानुसार चमकतील एखाद्या नक्षत्राप्रमाणे, एखाद्या पौर्णिमेच्या चंद्रासमान.''**

(मुस्लिम)

## जन्नतची विभिन्न उपलब्धी

पवित्र कुरआनच्या अध्ययनावरून कळते की स्वर्गामध्ये सर्व अपेक्षित वस्तु आढळतील. स्वर्ग सुख शांतीचे घर आहे. ईश्वराच्या दयाळूपणाचे घर आहे. तेथे आपापसात कोणत्याही प्रकारचे वैरभाव, द्वेष असणार नाहीत. स्वर्गनिवासियांशी अल्लाह कधी नाखूश होणार नाही. जसे की पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''श्रद्धावंत पुरुष आणि स्त्रियांना सदैव राहण्यासाठी अशा स्वर्गामध्ये दाखल करावे ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील आणि त्यांच्या वाईट गोष्टी त्यांच्यापासून दूर केल्या जातील. अल्लाह जवळ हे मोठे यश आहे.''** -४८:५

जन्नतमध्ये प्रवेश प्राप्त करणाऱ्या आत्म्यांना हा शुभ समाचार मिळेल,

**''हे शांत आत्म्या, परत चल आपल्या रब प्रभुकडे, दोघे राजी.''**

-८९:२७-२८

जन्नतच्या (वैकुंठाच्या) लोकांचे वैशिष्ट्य असे असेल,

**''अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न व ते त्याच्यावर प्रसन्न. हेच मोठे यश आहे.''**

-५:११९

जन्नतमध्ये पावित्र्य व विशुद्धताच पाहावयास मिळेल. तेथे कोणत्याही प्रकारची घाण असणार नाही. स्वर्गाचे लोक स्वत: पवित्र असतील, त्यांच्या पत्नीं स्वच्छ व पावित्र्यधारी असतील. सर्व शारीरिक व आत्मिक मलीनता त्यांच्यापासून दूर असेल.

स्वर्गनिवासीयांना ईश्वराचे सामिप्य प्राप्त होईल. ही जीवनाची सर्वांत मोठी उपलब्धी आहे. याच्यापेक्षा उच्च एखाद्या पदाची अथवा स्थानाची कल्पनासुद्धा केली जाऊ शकत नाही. या विशेषतेचा उल्लेख पवित्र कुरआनमध्ये विभिन्न स्थानावर आढळतो. एक ठिकाण असे,

**''निश्चितच अल्लाहचे भय बाळगणारे उद्यान व कालव्यांच्या दरम्यान प्रतिष्ठित ठिकाणी प्रभुत्वशाली सम्राटाच्या जवळ असतील.''** -५४:५४-५५

जन्नतच्या लोकांना पूर्णपणे आत्मिक आनंद प्राप्त होतो. त्याच्यावर दिव्य वर्षाव होत असेल. प्रत्येक आनंदात, प्रत्येक सुख-सामुग्रीत, प्रत्येक सौंदर्यात, प्रत्येक मधुर ध्वनीत आणि प्रत्येक रूपात व प्रत्येक दृश्यात त्यांना ब्रह्मविहार प्राप्त होईल. त्यांना सर्वत्र ईश्वराचीच दया, त्याचीच महानता व छबि आभासित होईल. अनेकतांमध्ये एकतेचे रहस्य पूर्णपणे उद्घाटित होईल. त्यांना आभास होत असेल की सर्वांचा स्त्रोत एक ईश्वरच आहे. जे काही चांगले आहे ते तेथूनच येते. सौंदर्य तेथनच येते, तो सौंदर्य-स्वरूप आहे, आनंदाचा प्रवाह वास्तविकत: तेथूनच आहे, तो आनंद-रूप आहे, चेतन-शक्ती त्याच्याकडूनच प्राप्त होते, तो परम् चेतन आहे. दयाळूपणाची सर्व उपकरणे त्या एकट्यानेच एकत्रित केली आहेत. तो दयाळू आहे. तो स्वत: जर सर्वथा आनंद नसेल तर आनंदाचा अविर्भाव कसा होऊ शकेल? त्याच्यात सौंदर्य व पावनता नसेल तर आम्हाला सुंदरता व पावनतेचे दर्शन कसे घडले असते? म्हणून स्वभावत: जन्नतवासियांच्या हृदयातून ईश्वराच्या प्रशंसेचा स्त्रोत फुटेल जो अंतर-बाह्य आणि संपूर्ण वातवरण एकरस असल्याचा परिचायक असेल. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''तेथे त्यांची उद्घोषणा अशी असेल की, 'पवित्र आहेस तू हे अल्लाह!' त्यांची प्रार्थना अशी असेल, 'शांती व सुरक्षितता असो' आणि त्यांच्या प्रत्येक गोष्टीचा शेवट असा असेल, 'सर्व स्तुती सर्व जगांच्या पालनकर्त्या अल्लाहसाठीच आहे.''** -१०:११

**''तेथे ते कोणतीही वाह्यात गोष्ट ऐकणार नाहीत. जे काही ऐकतील योग्यच ऐकतील आणि त्यांची उपजीविका त्यांना सतत सकाळ-संध्याकाळ मिळत राहील.''** -१९:६२

हदीसमध्ये आहे,

**''ते सकाळी व संध्याकाळी अल्लाहची 'तसबीह' (महिमागान) करतील.''** (मुस्लिम)

आणखी एका हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

**''जन्नतवाल्यांना अल्लाहच्या तसबीहचा इलहम (प्रकाशना) होत राहील.''**

याचा अर्थ असा की तसबीह केवळ त्यांच्या मुखाची गोष्ट न राहता ती त्यांच्या हृदयात उद्घाटित होईल आणि मुखाने ध्वनित होऊ लागेल. पवित्र कुरआनच्या या शब्दांवर विचार करा जे स्वर्गनिवासीयांबद्दल आले आहेत,

**''आणि चांगल्या गोष्टीकडे त्यांचे मार्गदर्शन केले गेले आणि त्या प्रशंसेच्या**

**अधिकाराचा (ईश्वराचा) मार्ग त्यांना दाखविला गेला."** -२२:२४

वास्तविकत: आपली गोष्ट तर कोठे काही नाही आणि आपला कोणता मार्गही नाही. जी गोष्ट आहे ती प्रभुची आहे, जो मार्ग आहे तो त्याचाच आहे. त्याच्या गोष्टीशिवाय अन्य गोष्ट व त्याच्या मार्गाशिवाय अन्य मार्ग वास्तविकत: बिघाड आहे, भ्रष्टता आहे, दुर्भाग्य आहे. त्याची गोष्टच आपली गोष्ट आहे. याशिवाय सर्व अनर्थ आहे. सर्व खोटे व मिथ्या आहे. खोटे किंवा मिथ्या फार वेळपर्यंत चालू शकत नाही. खोट्याला आधार खोटे बोलणारा आहे, धोका देणारा आहे. आमचे न स्वतंत्र अस्तित्व आहे आणि न स्वतंत्ररीत्या आमची एखादी वस्तु आमची आहे. ही आपली वस्तु असल्याची भावना जोपर्यंत दूर होत नाही तोपर्यंत सत्य आवाक्यात येणे शक्य नाही. जे आमच्यापाशी आहे ते आपले नव्हे, ती ठेव आहे. दुसऱ्याचे दिलेले आहे. म्हणून आमचे परम् कर्तव्य आहे की आम्ही त्याला जाणून घ्यावे की ज्याची वस्तु आम्ही आहोत, ज्याची ठेव आहोत, ज्याने आमची रचना केली आहे आणि विशेष प्रकारचे गुण, स्वभाव, अभिरुची वगैरेने आम्हाला सुशोभित केले आहे, त्यांना आम्ही आपल्या समजण्याची चूक करता कामा नये. या ईश्वराच्या वस्तु असून आपल्या आहेत. हीच आमची वास्तविकता आहे. ईश्वराला आपल्या जीवनापासून वेगळे केले जाऊ शकत नाही. जीवनाची सार्थकता त्याच्यामुळेच आहे. जर आम्ही काही आहोत तर ईश्वराच्या संबंधानेच आहोत. त्याच्यापासून वेगळे आम्ही काहीसुद्धा नाही. परंतु हे 'काहीसुद्धा' नसणे काही नुकसानीची गोष्ट नव्हे, हीच आमची सार्थकता आहे. यातच आमची महानता आहे.

जन्नत प्रकाशमय लोक (जग) आहे. अंधार व विकृतींना तेथे प्रवेश नाही. कोणतीही वस्तु तेथे शंकास्पद नाही. तेथे कसलीही निराशा व दु:ख अथवा क्लेश नाही, कोणत्याही प्रकारचे तेथे अंधत्व नाही. लोकांच्या व्यक्तित्वापासून वातावरणापर्यंत सर्व प्रकाशमय असेल. सर्वांचे चेहरे प्रकाशमान असतील, चमकत असतील. एखादा चेहरा ताऱ्याप्रमाणे चमकेल आणि एखाद्याच्या चेहऱ्याचा तेज पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे असेल. हा त्यांच्या व्यक्तित्वाचा प्रकाश असेल. हा त्यांच्या विश्वास, आस्था व चारित्र्याचा प्रकाश असेल, जो त्यांनी जगाच्या जीवनात प्राप्त केला असेल. पवित्र कुरआन म्हणतो,

**"त्यादिवशी जेव्हा की तुम्ही श्रद्धावंत पुरुषांना आणि स्त्रियांना पहाल की त्यांचे तेज त्यांच्या पुढेपुढे आणि उजव्या बाजूने धावत असेल. (त्यांना सांगितले जाईल की) "आज खुशखबर आहे तुमच्यासाठी. "स्वर्ग असतील ज्यांच्या खालून कालवे वाहत असतील ज्यात ते सदैव राहतील. हेच आहे मोठे यश."**

-५७:१२

स्वर्गामध्ये आत्मिक विकासाचा क्रम थांबणार नाही. हा क्रम तर अखंडपणे चालत राहील. स्वर्गामध्ये आध्यात्मिक उन्नतीचा दरवाजा बंद होणार नाही. जीवनाचा स्वभाव विकासोन्मुख आहे. यात कोणत्याही प्रकारचा अडथळा निर्माण होणार नाही. स्वर्गनिवासीयांच्या चोहोंबाजूला प्रकाश असेल. त्यांचा प्रकाश त्यांच्यापुढे धावत असेल तरीसुद्धा त्यांची प्रार्थना अशीच असेल,

**''आमच्या प्रभु! आमच्यासाठी आमचा प्रकाश पूर्ण कर; आणि आम्हाला क्षमा कर. निस्संदेह तुझ्यात प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य आहे.''** -६६:८

जन्नतचे एक महान सौख्य असे असेल की तेथील समाज अत्यंत पवित्र असेल. पवित्र भावनाच तेथे सर्वत्र आढळतील. कोणतीही अयोग्य, व्यर्थ व अश्लील गोष्ट तेथे ऐकावयास आणि पाहावयास मिळणार नाही. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''तेथे ते कोणतीही वाह्यात गोष्ट ऐकणार नाहीत. जे काही ऐकतील योग्यच ऐकतील आणि त्यांची उपजीविका त्यांना सतत सकाळ-संध्याकाळ मिळत राहील.''** -१९:६२

जन्नतची स्वांत महान उपलब्धी अशी असेल की तेथे आम्हाला ईश्वराचे दर्शन होऊ शकेल. दर्शनाला तहानलेले डोळे तृप्त होतील. ईश्वराच्या दर्शनाव्यतिरिक्त त्याच्यापेक्षा अधिक सुखकर कोणतीही गोष्ट असणार नाही की ज्याची मानवाने इच्छा करावी. हे तेथेच साध्य होईल. तेथे मानव आपल्या प्रभुचे दर्शन घेऊ शकेल. आणि अशा प्रकारे हे कार्य पूर्ण होईल. या दर्शनात असा आनंद असेल की लोक अन्य सर्व गोष्टी विसरून जातील. हदीसवरून ही गोष्टसुद्धा ज्ञात होते की तेथे लोकांना आपल्या पालनकर्त्याशी वार्तालाप करण्याचे श्रेय प्राप्त होईल.

## जग परलोकाच्या तुलनेत नगण्य आहे

जगाचे परलोकाच्या तुलनेत कोणतेही स्थान नाही. परलोक शाश्वत आहे व जग नश्वर आहे. पारलौकिक जीवन इहलोकाच्या तुलनेत उत्तम आहे. तेथील उपलब्धी येथील लाभापेक्षा कित्येक पटीने सुखकर आहेत. तेथील हानी येथील हानीपेक्षा अधिक शोचनीय व दुःखद आहे. म्हणून माणसाने जगातील आनंदाच्या पाठीमागे लागून आपले परलोक नष्ट करू नये. त्या व्यक्तीपेक्षा महामूर्ख अन्य कोणी नाही जिने जगासाठी परलोकाचे विस्मरण केले. पवित्र कुरआन या बाबतीत अत्यंत स्पष्टपणे म्हणतो,

**''आणि हे ऐहिक जीवन तर केवळ एक मनोरंजन व खेळ आहे आणि परलोकातील घरच वास्तविकतः जीवनमय आहे, किती चांगले झाले असते जर**

**या लोकांना कळले असते.''** -२९:६४

**''सांगा, जगातील संपत्ती थोडी आहे आणि परलोक अशा व्यक्तीसाठी अधिक चांगले आहे जी अल्लाहचे भय बाळगते आणि तुमच्यावर थोडासुद्धा अन्याय केला जाणार नाही.''** -४:७७

**''काय तुम्ही आखिरत सोडून सांसारिक जीवनावर खूश झाला? तर सांसारिक जीवनाची सुख-सामुग्री आखिरतपेक्षा फार थोडी आहे.''** -९:३८

म्हणून शहाणपणा यातच आहे की माणसाने थोड्या सुख-सामुग्रीच्या पाठमागे धावून ती गोष्ट हरवून टाकू नये की जी अधिक शाश्वत व उत्कृष्टतम आहे.

**''सरतेशेवटी प्रत्येकाला मृत्यू आहे आणि तुम्ही सर्वजण आपापले पुरेपूर मोबदले कयामतच्या दिवशी प्राप्त करणार आहात. यशस्वी खऱ्या अर्थी तोच आहे जो तेथे नरकाग्नीपासून वाचेल व स्वर्गामध्ये दाखल केला जाईल. उरले हे जग, तर ही केवळ एक भुरळ पाडणारी बाब आहे.''** -३:१८५

जगालाच सर्वकाही समजणारे त्या गोष्टीवर भरोसा ठेवतात जी फसवणुकीची गोष्ट आहे. स्वत:ला भ्रमात ठेवणे म्हणजे स्वत:वर अन्याय करणे होय. जो मनुष्य स्वत:ला भ्रमात ठेवतो आपल्या दुष्परिणामांना स्वत: जबाबदार आहे.

**''तर ज्याने दुराचार केला होता आणि जगातील जीवनाला प्राधान्य दिले होते, नरकच त्याचे ठिकाण असेल. आणि ज्याने आपल्या पालनकर्त्यासमोर उभे राहण्याचे भय बाळगले होते आणि मनाला वाईट इच्छेपासून दूर ठेवले होते, जन्नत त्याचे ठिकाण असेल.''** -७९:३७-४१

**''यांना सांगा, ऐहिक जीवनाचे भांडवल फार थोडे आहे आणि परलोक ईशपरायण माणसाकरिता अधिक उत्तम आहे आणि तुम्हावर जुलूम तिळमात्रदेखील केला जाणार नाही.''** -४:७७

तरीसुद्धा कित्येक लोक कळत न कळत याच अल्प संपत्ती, जगातील सुखांच्या पाठीमागे स्वत:ला विनाशाकडे नेत आहेत. कदाचित त्यांना या गोष्टीची कल्पना नाही की ते ज्या नीतीचा अवलंब करीत आहेत ती त्यांच्यासाठी घातक सिद्ध होईल. किती चांगले होईल जर त्यांनी त्या वेळेपूर्वी वस्तुस्थितीला समजून घेतले की जेव्हा मनुष्य आपल्यासाठी काहीही करू शकण्याच्या स्थितीत नसेल.

**''त्याचारी लोक त्याच सुख-सामुग्रीच्या पाठीमागे लागून राहिले जी त्यांना दिली गेली होती आणि ते अपराधीच राहिले.''** -११:११६

पवित्र कुरआन स्पष्ट शब्दांत सूचित करतो की असफलता आणि नुकसानीत पडणारे कोण आहेत. कोणताही मनुष्य नुकसानीत पडू इच्छित नाही, परंतु साधारणपणे त्याची नीती नुकसानीचीच असते. ही जीवनाची विडंबनाच आहे. जीवन प्राप्त करूनसुद्धा मानव जीवनापासून वंचित राहतो. तो जीवनाला त्याच्या वास्तविक स्वरूपात पाहू शकत नाही. जीवनाच्या रहस्यापासून तो लांब-लांब राहूनच निघून जातो. आणि जीवनातील सत्याकडून त्याचे डोळे बंदच राहतात. आंधळेपणाशिवाय त्याच्याजवळ काहीही असत नाही. परंतु त्याची त्याला जाणीव नसते.

पवित्र कुरआनमध्ये म्हटले आहे,

**"तुम्ही त्याच्याशिवाय ज्याची ज्याची भक्ती करू इच्छित असाल करीत रहा. सांगा, खरे दिवाळखोर तर तेच होत ज्यांनी पुनरुत्थानाच्या दिवशी स्वतःला व आपल्या कुटुंबियांना नुकसानीत टाकले. चांगले ऐकून घ्या, हीच उघड दिवाळखोरी होय."** -३९:१५

मानवाला जीवनात जे काही प्राप्त आहे मग ते संपत्ती, संतती व त्या पत्नीं असोत किंवा जगातील अन्य सामुग्री, वास्तविकत: या गोष्टीच केवळ मानवाची संपत्ती नव्हे. या तर केवळ माणसाच्या गरजा आहेत. मानवाचा हिस्सा केवळ इतकाच नव्हे. ज्याने अशी कल्पना केली की मानवाचे भाग्य केवळ याच सांसारिक वस्तूच आहेत, तर त्याने मानवाची महिमा घटविण्याचे दुस्साहस केले. परलोकामध्ये जीवन पूर्ण असेल. तेथे मानवापासून काहीही हिसकावून घेतले जाणार नाही. तर आणखी प्रदान केले जाईल व जे काही त्याला तेथे मिळेल ते उत्कृष्टतम असेल. त्यात कोणत्याही प्रकारचा विकार असणार नाही, त्रुटी नसेल, उणीव नसेल.

**"त्यांना सांगा! यापेक्षा अधिक चांगली वस्तू काय आहे, ते सांगू? जे लोक अल्लाहच्या कोपाचे भय बाळगून वागतील, त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याजवळ उद्याने आहेत ज्यांच्याखालून कालवे वाहत असतील, तेथे त्यांना चिरकालीन जीवन प्राप्त होईल. पवित्र पत्नीं त्यांच्या सोबती असतील आणि त्या अल्लाहच्या प्रसन्नतेने मान्यवर होतील. अल्लाह आपल्या दासांच्या वागणुकीवर देखरेख ठेवतो."** -३:१५

# अविवेकाच्या दुर्घटना

## परलोकासंबंधी विभिन्न मत-मतांतर

परलोकासंबंधी नाना प्रकारच्या धारणा व विचार आढळतात. काही लोकांचे मत असे आहे की जीवन जे काही आहे ते हेच सांसारिक जीवन होय. याच्यापुढे कोणतेही जीवन नाही ज्याची आम्ही प्रतीक्षा करावी. त्यांच्या मतानुसार, मृत्यु नेहमीसाठी आमची जीवन-लीला समाप्त करतो. यानंतर कोणती चेतनाही नाही, जीवनही नाही आणि कोणतेही कर्मफळ नाही व परिणामही नाही. पवित्र कुरआनने अशाच लोकांसंबंधी म्हटले आहे,

**''हे लोक म्हणतात, आमच्या पहिल्या मृत्यूशिवाय अन्य काहीच नाही, त्यानंतर दुसऱ्यांदा आम्ही उठविले जाणार नाही जर तुम्ही खरे असाल तर उठवून आणा आमच्या वाडवडीलांना.''** -४४:३४-३६

**''हे लोक म्हणतात की, ''जीवन केवळ हेच आमचे जगातील जीवन होय, येथेच आमचे मरणे व जगणे आहे, आणि कालचक्राव्यतिरिक्त कोणतीही गोष्ट नाही जी आम्हाला नष्ट करील. वास्तविक याबाबतीत यांचेजवळ कोणतेच ज्ञान नाही. हे केवळ कल्पनेच्या आधारे या गोष्टी करतात.''** -४५:२४

अशा लोकांच्या कथनाचे तात्पर्य असे आहे की मरणे-जगणे हे काळाचे परिवर्तन आहे. परलोकाचा एखादा दिवस येणारही नाही आणि आम्हाला कुणी पुन्हा जिवंत करून उठविणारही नाही. हा कालचक्र चालत आला आहे आणि चालत राहील. यात एखाद्या गहन रहस्याचा शोध करणे, व्यर्थ मानसिक निर्बळतेव्यतिरिक्त अन्य काही नाही.

जे लोक अशा प्रकारच्या गोष्टी सांगतात ते आपल्या गहन चिंतन आणि शोधाच्या आधारावर सांगत नाहीत. मृत्युनंतरसुद्धा एखादे जीवन आहे या धारणेबद्दल त्यांचा आक्षेप केवळ इतकाच आहे की त्यांच्या डोळ्यांनी एखाद्याला मृत्युनंतर जिवंत झालेला पाहिलेले नाही. परंतु एखादी वस्तु न पाहिल्यामुळे या निष्कर्षाप्रत पोचणे की ती वस्तु मुळापासूनच नाही एक अशास्त्रीय धारणा आहे. एखाद्या वस्तुला न पाहणे या गोष्टीचा पुरेसा पुरावा कदापि नाही की त्या वस्तुचे मुळापासून अस्तित्वच नाही. काय अमेरिकेचा शोध लावण्यापूर्वी अमेरिका महाद्वीप मुळीच नव्हता?

अशा प्रकारच्या गोष्टी करणाऱ्यांनी जर आपल्या कथनावर विचार केला तर त्यांना स्वत: प्रस्तुत केलेल्या पुराव्यातील दोष दिसतील. परंतु त्यांच्या इन्कारामागे एखाद्या पुराव्यापेक्षा अधिक मानसशास्त्रीय कारण असते. पवित्र कुरआनने हा पैलू आमच्या समक्ष ठेवला आहे.

**"ज्या लोकांनी अल्लाहच्या आयतींचा व त्याच्याशी भेट होण्याचा इन्कार केला, ते माझ्या दयाळूपणापासून निराश झाले आहेत."** -२९:२३

एका दुसऱ्या ठिकाणी सांगितले गेले आहे,

**"हे लोकहो ज्यांनी श्रध्दा ठेवली आहे, त्या लोकांना मित्र बनवू नका ज्यांच्यावर अल्लाहचा क्रोध झाला आहे, जे परलोकाबद्दल त्याचप्रकारे निराश आहेत ज्याप्रकारे कबरीत पडलेले अश्रध्दावंत निराश आहेत."** -६०:१३

या आयतीवरून ज्ञात झाले की निराशा इन्काराचे मूळ मानसशास्त्रीय कारण होय. ही निराशा संकुचित हृदय व संकुचित बुद्धीची प्रतीक होय. परलोक न मानणारे ही वास्तविकता स्वीकार करीत नाहीत की परलोकसारखी महान घटना कधी काळी घडणे शक्य आहे. याचे कारण एखादे सशक्त प्रमाण नव्हे तर केवळ त्यांचा नैराश्यपूर्ण स्वभाव आहे आणि या नैराश्याचे कारण केवळ त्यांचे दुस्साहस व त्यांच्या बुद्धीचा खालचा दर्जा होय. जर त्यांनी आपल्या चोहीकडे पसरलेल्या जगाला व त्यातील क्रियाकलापाला उघड्या डोळ्यांनी पाहिले असते, तर त्यांना कळू शकले असते की ब्रह्मांडात निराशेची नव्हे तर आशेची चिन्हे आढळतात. जगातील प्रत्येक दृश्य सूर्योदयापासून सूर्यास्ताच्या अपूर्व भव्यतेपर्यंत आणि महान अंतरिक्षापासून वाळूच्या पर्वताच्या उतरणीवर उगवलेल्या गवताच्या हिरवळीपर्यंत सर्वजण एखाद्या दिव्य आशेला प्रकट करतात. निसर्गाचे सौंदर्य प्रेरणादायक आहे. निराश करणे निसर्गाचा स्वभाव नव्हे. तर मग मनुष्याला निराशेचे शिक्षण कोठून प्राप्त होते? नि:शंकपणे ही निराशा परमात्माची नव्हे तर सैतानचीच देणगी असू शकते. परलोक अशक्य समजणे निश्चितच निराशेने जन्म दिलेला विकार आहे. आणि या निराशेचे कारण केवळ भ्रम व या महान जगाला विशाल दृष्टीने न पाहण्याशिवाय अन्य काही नाही.

कधी कधी मानव इतका निराश होतो की त्याला सर्वकाही अशक्य वाटू लागते. आशेची सर्व किरणे त्याच्यासाठी विलुप्त होऊन जातात. या भ्रमातून मुक्त होण्याचा एकमेव उपाय आहे की त्याने जगाला अभ्यासू दृष्टीने पाहून एखाद्या दिवशी एका अशा प्रवाशाप्रमाणे पाहावे जो या जगात पहिल्यांदा आला असावा आणि यापूर्वी त्याने कोणतेही जग पाहिले नसावे. विचार करा, अशा प्रवाशाला हे जग जादूचे जग वाटणार नाही काय?

तो मोठ्याने उद्‌गारणार नाही काय की आता काहीही अशक्य नाही? आता काहीही असंभव नाही!

काही वर्षांपूर्वीचीच गोष्ट आहे की दिल्लीत एक विश्वप्रदर्शन भरले होते. या प्रदर्शनात अमेरिकेकडून 'एरोकार' प्रस्तुत केली गेली होती. ही आश्चर्यकारक मोटारगाडी जमीन सोडून हवेत पळू शकत होती. एका संन्याशीने जेव्हा ही कार पाहिली तेव्हा तो आश्चर्यचकित झाला. अकस्मात त्याच्या तोंडून पुढील उद्‌गार निघाले, "आज मी चिंतेत पडतो की ज्या गोष्टीचा मी शोध करीत होतो ती हीच तर नाही ना? आणि मी ती निर्जन व वैराण जागी शोधत आहे?"

हा संन्याशी हवेत धावणाऱ्या मोटारगाडीला पाहून केवळ अशासाठी चकित झाला की यापूर्वी त्याने असली मोटारगाडी पाहिली नव्हती आणि त्याच्या मनात अचेतन रूपात अशी धारणा होती की असले अद्‌भुत दृश्य तो कदापि पाहू शकणार नाही. त्याने संभव असलेली गोष्टच संभव होताना पाहिले, परंतु ही संभव गोष्ट त्याच्या विचाराने असंभव होती. याच गोष्टीने त्याला एक प्रकारे आश्चर्यचकित केले होते. ज्याची कल्पना त्याच्या तोंडून निघालेल्या शब्दावरून येते. शास्त्रज्ञांचे कित्येक शोध असे आहेत की ज्यांची चर्चा जर आजपासून काही शतकांपूर्वी एखाद्याने केली असती तर लोकांनी ते अशक्यच समजले असते, पण आज त्यांचे कोणासही थोडेसुद्धा आश्चर्य वाटत नाही. यावरून असे कळते की एखादी गोष्ट डोळ्याने न पाहणे याचे प्रमाण नव्हे की ती गोष्ट अनिवार्यपणे अशक्यसुद्धा आहे. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"वस्तुस्थिती अशी आहे की ज्या लोकांना आमची भेट अपेक्षित नाही आणि जे ऐहिक जीवनावर संतुष्ट व समाधानी बनले आहेत आणि जे लोक आमच्या निशाण्यांपासून गाफील आहेत."** -१०:७

अशी आहे इन्कार करणाऱ्यांची वास्तविक स्थिती. ते अल्लाहच्या निशाण्यावर विचार करीत नाहीत म्हणूनच घोर निराशेने त्यांना जखडले आहे. वर्तमान जीवनाच्या पुढील कामना ते गमावून बसले आहेत. जे काही त्यांना जगात प्राप्त आहे त्यावरच ते खूश झाले. ते आपली प्रतिष्ठा विसरून गेले आणि अल्लाहच्या प्रथम उपहारालाच अखेरचा उपहार समजून बसले. विचित्र आहे त्यांची ही दयनीय दशा.

उरली ही गोष्ट की हे जग असेच चालत आलेले आहे व असेच चालत राहील, केवळ विचारहीनतेचा परिचय देणारी आहे. एखाद्या भव्य भवनाला पाहून जर आम्ही असे म्हणू लागलो की हे सदैव टिकून राहील कारण आम्ही हे पडत असताना पाहिले नाही

तर हे हास्यास्पद आहे. एखादा इंजिनीयर त्या भवनाचे परीक्षण करून सहजपणे त्याच्या आयुष्याचा अंदाज लावू शकेल. याशिवाय एखादे भूकंप, वज्रपात वगैरे दैवी संकट त्या भवनाला क्षणभरात धराशायी करू शकते. भवनाला केवळ जमिनीवर उभे पाहणे आणि अन्य संभावनांकडे लक्ष न देणे आपल्या विचारशक्तीचे हनन करणे होय. आता तर उष्णतेसंबंधी गतीच्या द्वितीय नियमाने (सेकंड लॉ ऑफ थर्मोडायनॅमिक्स) हे सद्धि केले की हे भौतिक ब्रह्मांड अनादी कालापासूनही नाही व सार्वकालिकही नाही. म्हणून अनिवार्यपणे याचा एखादा आरंभसुद्धा आहे आणि अंतसुद्धा. याच कारणास्तव आरंभ व अंताच्या दरम्यान असलेल्या या लीलाक्रमाला याच्या प्रारंभ व अंतापासून वेगळे करून यावर विचार केल्याशिवाय आम्ही कदापि अचूक निर्णयाला पोहचू शकत नाही.

हा विचार निराधार आहे की हे जग अनंत कालापासून सदैव आहे व असेच चालत राहील. या विचाराचादेखील कोणताही आधार नाही की या जगाच्या पाठीमागे कोणतीही योजना नाही. हे भौतिक जग आहे भौतिकताच याचा आधार आहे. परलोक वगैरे काही नाही व मेल्यानंतर कोणतेही अन्य जीवन नाही. ईश्वर वगैरे कोणी नाही की ज्याच्यासमोर हजर होऊन आम्हाला बरे-वाईट कर्मांचा हिशेब द्यावा लागेल.

हा केवळ एक दावा आहे ज्याच्या पुष्टीसाठी कोणताही पुरावा अथवा प्रमाण नाही आणि आता तर ही गोष्ट स्पष्ट झालेली आहे की हे जग अनादी काळापासूनही नाही आणि सदैव राहणारही नाही. भौतिक पदार्थाचा जोरसुद्धा आता उरला नाही. पदार्थ (मॅटर) आता अस्तित्वाची अंतिम कडी उरली नाही. आजचा शोध दर्शवितो की ज्याला आम्ही पदार्थ म्हणतो त्याचा आधार अभौतिक आहे. मानव साधारणपणे अभौतिक वस्तु पकडू शकत नाही म्हणूनच भौतिकशास्त्रात भौतिक जगाच्या बाबतीत सर्व बोलचाल संकेतानेच केली जाते. जे. एस. हाल्डेनने लिहिले आहे,

"जीवन आणि मानवव्यक्तित्वाचे अस्तित्व या तथ्याचे प्रमाण आहे की आमच्या जगाची केवळ भौतिक व्याख्या शक्य नाही आणि ही व्याख्या अशक्यच असते. मग काळाच्या दृष्टीने कितीही पाठीमागे आणि देश व अंतराळाच्या दृष्टीने कितीही उंच गेलो तरी जीवनाला पाठीमागे नेल्याने त्याची भौतिक व्याख्या कदापि मिळू शकणार नाही आणि मानवव्यक्तित्वाला पाठीमागे नेल्यानेसुद्धा आम्ही एखाद्या अशा बिंदूपर्यंत पोहचू शकणार नाही जेथे आम्ही सांगू शकावे की मानवव्यक्तित्व अशा प्रकारे पदार्थापासून निर्माण झाले." (द फिलॉसॉफिकल बेसिस ऑफ बायॉलॉजी, पृ.-१२२)

अलबर्ट आइनस्टाईनच्या शोधाप्रमाणे ब्रह्मांड जो आम्हाला वस्तूंचा समूह दिसतो तो एक अशी भरीव वस्तु नाही की जो वायुमंडळात पडलेला आहे. ब्रह्मांड हा वस्तु नसून

क्रिया अथवा घटनांचे भवन आहे.

भौतिकतेची स्थिती आज अशी आहे की पदार्थाला सर्वकाही समजून बसणाऱ्यासाठी यात चांगला धडा आहे. आता असे म्हणणे शहाणपणाची गोष्ट ठरणार नाही की जे काही आहे ते निर्जीव पदार्थच आहे. उरला हा विचार की परलोक व ईश्वराची कल्पना अंधविश्वास आहे तर अशा प्रकारचे विचार बाळगणारे जीवन व जगाचे सूक्ष्म निरीक्षण करीत नसतात आणि विचार-चिंतनाचा प्रयोग करीत नसतात. ईश्वर आणि परलोकाचा स्वीकार केल्याशिवाय या जीवन व जगाचे कोडे सोडविले जाणे शक्य नाही.

काही लोकांचे म्हणणे असे आहे की ब्रह्मांडाची वर्तमान व्यवस्था नश्वर व नवोत्पन्न आहे. एक वेळ अशी येईल जेव्हा ही लीला समाप्त होऊ शकते. जो मनुष्य मेला तो पुन्हा जन्म घेऊ शकत नाही. हे तर सत्य आहे की जगाची वर्तमान व्यवस्था नश्वर आहे. ही व्यवस्था सदैव टिकून राहणार नाही, परंतु हा विचार निर्मूल आहे की जो मेला तो पुन्हा जन्म घेऊ शकत नाही. कदाचित ते असे अशासाठी म्हणतात की त्यांनी एखाद्या मृताला पुन्हा जिवंत होताना पाहिले नाही. परंतु हे काही प्रमाण नाही की जी घटना आम्ही पाहिली नाही ती संभवसुद्धा असू शकत नाही. आम्ही कित्येक लोकांना जगात जन्म घेताना पाहतो. ते अस्तित्वात नव्हते आणि त्यांनी जन्म घेतला. मग जेव्हा ते अस्तित्वात नसतील तेव्हा ते जन्म घेऊ शकत नाही? हे असंभव तर म्हटले जाऊ शकत नाही. असंभव आम्ही अशासाठी समजतो की साधारणपणे आम्हाला त्या गोष्टी मान्य करण्याची सवय झाली आहे ज्या गोष्टी पाहण्याचा आम्हाला सराव होतो. ज्या गोष्टी आम्ही पाहिल्या नाहीत त्या मान्य करणे आमच्या दृष्टीने मान्यतेच्या श्रेणीत येत नाहीत. आम्ही त्या असंभव म्हणतो. हा आमचा बेसावधपणा आहे. आम्ही विचार करतो की हा तर चमत्कार आहे. बरे हे कसे शक्य आहे, खरे पाहता जगातील सर्वच वस्तु चमत्कार आहेत. जर या वस्तु आम्हाला आकस्मात दाखविल्या गेल्या असत्या तर आम्ही आश्चर्यचकित झालो असतो. आम्ही समजलो असतो की हाच चमत्कार झाला. चमत्कार पाहिल्यानंतर चमत्काराची संभावना मान्य करावी लागते, परंतु विस्मयाच्या दृष्टीने आम्ही जग पाहिलेच नाही.

मरणोत्तर जीवन शक्य आहे. मरणोत्तर जीवन खुद्द जीवनापेक्षा अधिक आश्चर्यजनक नाही. जर ईश्वर आहे तर त्याला प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्यसुद्धा आहे. मरणोत्तर जीवन आवश्यक आहे. आवश्यक गोष्टीची पूर्तता अवश्य होईल. परलोक निश्चितपणे समोर येईल. ती काही वेगळी गोष्ट नाही, जीवनाचेच पुढील चरण आहे. ते वर्तमान जगाचेच विकसित रूप आहे.

काही लोक परलोक मानतात आणि स्वर्ग व नरकाचादेखील स्वीकार करतात.

परंतु याचबरोबर ते असेही मानतात की ईश्वराने आपल्या एकुलत्या एक पुत्राला सलीब (क्रूस) वर मृत्यु देऊन मानवाच्या पापाचे प्रायश्चित्त केले. आपल्या दुष्कर्माच्या वाईट फळापासून वाचविण्यासाठी केवळ इतके पुरेसे आहे की मानवाने ईश्वराच्या पुत्रावर विश्वास ठेवावा. शिवाय याबरोबर ते असेही मानतात की मानव जन्मजात पापी आहे, जन्मापासूनच गुन्हेगार आहे. हे पापाचे ओझे याच उपायाने दूर होऊ शकते की मनुष्याने ईश्वराचा पुत्र ईसा मसिहा अ. (येशू ख्रिस्त) यांच्यावर श्रद्धा बाळगावी.

हा विचार अत्यंत हास्यास्पद आहे. मानवाला जन्मत: पापी म्हणणे हे खुद्द एक मोठे पाप आहे. पाप केल्यानंतर मनुष्य पापी होऊ शकतो, परंतु पाप न करता मनुष्य पापी बनतो हे कसे न्यायसंगत होऊ शकते? जरी प्रेषित आदम (अ.) यांच्याकडून काही चूकभूल झाली तरी हे कसे शक्य बनते की त्यांच्या संततीपैकी सर्वांनी पापी म्हणूनच जन्म घ्यावा? याशिवाय या पापातून मुक्ती प्राप्त करण्याची जो विधी दाखविला जात आहे की माणसाने ईसा मसिहावर श्रद्धा बाळगावी, त्यासंबंधी प्रश्न असा उद्‌भवतो की ईश्वराचा एखादा पुत्र असा असू शकतो? तो जर निरपेक्ष व परमसत्ता आहे. त्याचा कोणी पुत्र अथवा वंशज असावा याचा प्रश्नच येत नाही. मग पापातून मुक्ती प्राप्त करण्यासाठी एखाद्या सुळावर देण्याची काय गरज होती की जेव्हा ईश्वर तर सुळावर देऊन मृत्यु न देता पापाबद्दल क्षमा करू शकत होता?

याशिवाय पाप आणि अपराधाचा मनुष्याच्या मनोविकार व अपराधवृत्तीशी जवळचा संबंध आहे. एखाद्या अन्य व्यक्तीने प्रायश्चित्त केल्याने गुन्हेगारामध्ये अशा प्रकारे सुधारणा घडून येईल? जोपर्यंत एखाद्या गुन्हेगाराला आपण केलेल्या अपकृत्याबद्दल पश्चात्ताप होत नाही आणि तो पापाची नुकसानभरपाई करण्याचा प्रयत्न करीत नाही व आपल्या प्रभुला प्रसन्न करण्याचा स्वत: प्रयत्न करीत नाही तोपर्यंत पापाच्या प्रभावापासून मुक्ती कशी मिळू शकेल?

आणखी एक गोष्ट विचारणीय आहे. जर पापातून मुक्ती प्राप्त करण्यासाठी एकमात्र उपाय हा आहे की माणसाने ईसा मसिह (अ.) (येशू ख्रिस्त) यांच्यावर श्रद्धा बाळगावी. तर शेवटी त्या गोष्टींचा उद्धार कसा व मुक्ती कशी मिळू शकते की त्यांचा काळ ईसा मसिह (अ.) यांच्या आगमनापूर्वी गेलेला आहे. ज्यांचा काळ ईसा मसिह (अ.) यांच्या पूर्वीचा आहे.

अशाच प्रकारे काही लोक या भ्रमात पडलेले आहेत की परलोकात ते महान पुरुष त्यांना उपयोगी पडतील जे ईश्वराचे प्रिय झाले आहेत अथवा त्यांना ईश्वराजवळ असे अधिकार प्राप्त आहेत की ते वाटेल त्याला नरकाच्या यातनांतून वाचवू शकतील. त्यांची

शिफारस ईश्वर टाळू शकणार नाही. ज्या लोकांची त्या महान पुरुषांवर श्रद्धा असेल त्यांची कामे बिघडणार नाहीत. त्यांनी जगात काहीही करावे ज्या महात्माशी ते संबद्ध आहेत ते त्यांची बिघडलेली कामे सरळ करतील. अशा प्रकारचे विचार बाळगणारे परलोकाचा स्वीकार करून त्याच्या वास्तविकतेचा इन्कार करतात. जर अशा प्रकारे केवळ शिफारसीने काम झाले असते तर मग माणसाला जगात पाठविण्याचे कसलेही अवचित्य नव्हते. याच्यासाठी मग याची काय गरज होती की मानवाला जगण्याच्या बिकट कर्म - क्षेत्रातून नेले जावे. पवित्र कुरआनने सांगितले आहे की शिफारसींच्या आधारे जीवंत राहणे मानवाची घोडचूक आहे. अयोग्य शिफारसीने येथील काहीही सिद्ध होणार नाही. तो म्हणतो,

**"दाणे आणि बीज काढणारा अल्लाह आहे. तोच सजीवाला निर्जीवातून काढतो आणि तोच निर्जीवाला सजीवातून बाहेर काढणारा आहे. ही सर्व कामे करणारा तर अल्लाहच आहे, मग तुम्ही कोठे भरकटले जात आहात?"** -६:९५

**"त्या दिवसाचे भय बाळगा जेव्हा कुणीही कुणाच्या यत्किंचितही उपयोगी पडणार नाही. कुणाकडून शिफारसही स्वीकारली जाणार नाही. व कुणालाही मोबदला घेऊन सोडले जाणार नाही. आणि गुन्हेगारांना कुठूनही मदत मिळू शकणार नाही."** -२:४८

मुस्लिमांना सावध करताना पवित्र कुरआनने म्हटले आहे,

**"हे श्रद्धावंतांनो, जी काही धन-दौलत आम्ही तुम्हाला बहाल केली आहे त्यातून खर्च करा यापूर्वी की तो दिवस येईल ज्यामध्ये खरेदी-विक्री होणार नाही, मित्रताही उपयोगी पडणार नाही आणि शिफारस देखील चालणार नाही. आणि खरे अत्याचारी तेच आहेत जे द्रोहाचा मार्ग अवलंबितात."** -२:२५४

एका अन्य ठिकाणी अनेकेश्वरवादींच्या बाबतीत म्हटले आहे,

**"आणि ते त्याच्या (अल्लाह) शिवाय ज्यांचा धावा करीत आहेत त्यांना शिफारस करण्याचा अधिकार नाही."** -४३:८६

एका अन्य ठिकाणी सावध केले आहे,

**"कोण आहे ज्याने त्याच्या (अल्लाहच्या) समोर त्याच्या आज्ञेशिवाय शिफारस करू शकावे?"** -२:२५५

## पुनर्जन्माची धारणा

एक धारणा पुनर्जन्म अथवा आवागमनाचीसुद्धा आढळते. या धारणेच्या दृष्टीने मानव आपल्या बऱ्या-वाईट कर्मांची फळे चाखण्यासाठी वारंवार याच जगात जन्म घेतो. कर्मानुसार कधी तो मानव योनीत जन्म घेतो आणि कधी कधी पशु-पक्षी, कीटक, वनस्पती वगैरेच्या रूपात जगात येतो. अपराध आणि पापांच्या प्रभावाने जेव्हा आत्मा विकृत होतो आणि त्यात अत्यंत वाईट क्षमतांचा अविर्भाव होतो तेव्हा तो पशु अथवा वनस्पती वगैरेंच्या श्रेणीत जातो आणि जर कर्म चांगले आहेत तर त्यात चांगल्या क्षमता येतील आणि याच्या परिणामस्वरूप तो उच्च श्रेणीत जाईल. थोडक्यात असे की आत्म्याला पुन्हा पुन्हा याच मृत्युलोकात आपल्या पूर्व कर्मांचे फळ भोगण्यासाठी येणे भाग पडते.

ही धारणा एकेकाळी फार लोकप्रिय होती. ग्रीसमध्येसुद्धा काही लोक असे मानत असत व रोममध्येसुद्धा याची चर्चा होती. इजिप्तच्या प्राचीन इतिहासातसुद्धा याचा उल्लेख आढळतो. बाह्य प्रभावामुळे ज्यू लोकांतसुद्धा एकेकाळी या धारणेने प्रवेश केलेला होता. आता ही धारणा जगातील काही रानटी अथवा असंस्कृत जातीत आढळते किंवा भारतात ब्राह्मण, बौद्ध, जैन वगैरे लोकांत ती आढळते. बाकीच्या सुसंस्कृत जातींनी ही धारणा रद्द केली आहे. ज्ञान-विज्ञानाच्या उन्नतीमुळे जीवनासंबंधी जी माहिती मिळाली आहे त्याने त्या सर्व विचार व धारणांचे खंडन होते ज्यावर पुनर्जन्माची धारणा अवलंबून आहे.

पुनर्जन्म अथवा आवागमनाची धारणा वेदात आढळत नाही. ही धारणा अवैदिक आहे. आर्य लोकांचा परलोकावर विश्वास होता. त्यांची धारणा अशी होती की मृत्युनंतर मानवाला एक दुसरे जीवन प्राप्त होते जे वाईट लोकांसाठी कष्टदायी व यातनापूर्ण असते आणि चांगल्या लोकांसाठी अत्यंत सुखदायी असते. मंत्र व पितर - लोकाला ब्राह्मणकाळात मान्यता होती. आवागमन अथवा पुनर्जन्माच्या धारणेला कोणतेही स्थान नव्हते. सूत्रकाळात पितर-लोकाच्या धारणेबरोबरच आम्हाला कधी कधी पुनर्जन्माच्या दोन्ही धारणा समान रूपाने आढळतात. वस्तुत: या दोन्ही परस्पर विरोधी धारणा आहेत.

पुनर्जन्माच्या धारणेचा स्वीकार केल्यास केवळ इतकेच नव्हे की ही धारणा परलोकाच्या धारणेविरूद्ध आहे तर यामुळे खुद्द धर्माला हानी पोहचेल. धर्म शिक्षित व्यक्तींच्या नजरेत अवैज्ञानिक व अबौद्धिक ठरेल. धर्म लोकांच्या नजरेतून उतरेल. तो केवळ अंधविश्वास बनून राहील. त्या कोणतेही आकर्षण उरणार नाही. तो कोणतीही शक्ती बनून जीवनात उतरू शकणार नाही. जीवनावर त्याचा कसलाही रचनात्मक प्रभाव

पडू शकणार नाही, तर व्यावहारिक जीवनाशी त्याचा कसलाही संबंध नसेल आणि जर त्याचा काही प्रभाव पडलासुद्धा, तरी तो काही चांगला प्रभाव असणार नाही.

साधारण मानवाला वर्तमान लोकाचा काही असा मोह असतो की तो या जगापेक्षा वेगळा सुख-दु:खाची कल्पना करू शकत नाही. तो कर्म व त्याच्या फळाची याच जगात प्राप्ती करण्याची इच्छा बाळगतो. तो या मृत्युलोकाशी आपला संबंध टिकवू इच्छितो. त्याला कळत नाही की ईश्वराची दया केवळ मृत्युलोकापुरतीच मर्यादित आहे असे समजणे कोणत्याही प्रकारे योग्य नाही. जीवनाच्या संभावना या जगापेक्षा अधिक आहेत. या जगात तर जीवनाचा अंकुर फुटतो व त्याचे विकसित रूप यात सामावणे शक्य नाही. येथे मानवाची जिज्ञासा टिकून राहते. मानव-हृदयात तर त्या लोकाची इच्छा करतो की जे आमच्या जिज्ञासा व इच्छांचे उत्तर असावे. जेथे त्याला आपली प्रत्येक इच्छा पूर्ण होताना दिसत असावी. जेथे कोणत्याही प्रकारचा अडथळा बाकी राहू नये. जे केवळ आमच्या शारीरिक अपेक्षांच्याच अनुकूल असावे असे नव्हे तर आमच्या उच्चतम व मधुरतम कल्पनांच्या अनुकूलसुद्धा असावे. जे आमच्या कल्पना व कामनांचे लोक असावे. मानव मनाच्या अभिलाषेने कित्येक कथांची रचना केली आहे ज्या अत्यंत आकर्षक व हृदयग्राही असूनसुद्धा अस्वाभाविक घोषित केल्या जातात. त्या प्रिय असूनदेखील अस्वाभाविक असण्याचे कारण हेच आहे की त्या कथांचा समावेश आमच्या कल्पना-जगतात तर होतो, परंतु वर्तमान जगाच्या वास्तविक धरातलावर त्या काल्पिनिक ठरतात आणि मानव-हृदयावर निराशेच्या रेषा सोडून जातात.

पुनर्जन्माच्या कल्पनेला जेव्हा आम्ही तर्काच्या कसोटीवर पारखतो तेव्हा यातील खोट समोर येते व ही धारणा यायोग्य राहत नाही की याला मान्यता दिली जाऊ शकावी. याची अनेक कारणे आहेत.

(१) प्रश्न असा आहे की सर्वप्रथम श्रेष्ठ मानवाची रचना झाली की सर्वप्रथम वनस्पती आणि पशुंची रचना झाली? मानव बनण्यासाठी आवश्यक आहे की त्याच्या अगोदर वनस्पती नसतील, पशु नसतील तर मानवाने अखेर काय खावे? त्याला सेवनासाठी दूध-दही वगैरे कोठून मिळू शकतील? आणि जर आम्ही सर्वप्रथम वनस्पती व पशुची सृष्टी झाली असे मान्य केले तर प्रश्न असा उभा राहतो की अखेर यांची सृष्टी कोणत्या वाईट कर्मामुळे झाली? यांच्या अगोदर आम्हाला मानवांच्यासृष्टीचा स्वीकार करावा लागेल की ज्यांना आपल्या वाईट कर्मासाठी निम्न कोटीच्या श्रेणीत यावे लागले. अशा प्रकारे आम्ही सृष्टीचा आरंभ मानवाने झाला असेही म्हणू शकत नाही आणि असेही निश्चित करू शकत नाही की सृष्टीचा आरंभ वनस्पती आणि पशुने झाला.

जर आवागमनाच्या चक्राला अनादिकालिक आणि शाश्वत मानले तर हेसुद्धा मान्य करावे लागेल की आत्माच नव्हे तर ते पदार्थसुद्धा अनादिकालिक आहेत ज्यांच्याद्वारे आत्म्यांना निरनिराळ्या प्रकारचे शरीर प्राप्त झाले आहेत. हेसुद्धा मान्य करावे लागेल की ही पृथ्वी, आकाश आणि सौर जगत वगैरेची व्यवस्थासुद्धा अनादिकालिक आहे. परंतु तर्क व शास्त्रीय शोधावरून असे कळते की वर्तमान लोकाची व्यवस्था तर अनादिकालिकही नाही आणि ही शाश्वत आहे असेही म्हटले जाऊ शकत नाही. हिचा एक आरंभ आहे आणि हिचा अंतसुद्धा ठरलेला आहे.

एखादी चालणारी प्रक्रिया अथवा चक्राला अनादिकालिकसुद्धा म्हटले जाऊ शकत नाही. एखाद्या विशेष कार्याच्या क्रम-शृंखलेला पाठीमागे अनंतपर्यंत नेले जाऊ शकत नाही. हे अशक्य आहे. तिचा कोणता ना कोणता प्रारंभ मान्य करावाच लागेल. कुठे ना कुठे जाऊन आम्हाला थांबावेच लागेल. कार्याचा आरंभ तर मान्य करावाच लागेल, मग त्याचा शेवट असो किंवा नसो.

(२) पुनर्जन्माच्या धारणेनुसार ईश्वर स्त्री व पुरुष दोघांना सुरुवातीलाच निर्माण करू शकत नाही. त्याला कारण असे की हे न्यायाच्या विरूद्ध ठरेल की कर्माचा फरक न करता आत्म्यांना स्त्री-पुरुष या दोन भिन्न जातीत ईश्वराने विभक्त करावे. एक तर असे की ईश्वराने आरंभीच सर्वांना स्त्री बनविले असेल अथवा पुरुष आणि सर्वांना समान योग्यता व समान परिस्थिती प्रदान केल्या असतील. आता प्रश्न असा आहे की जर प्रत्येक पैलूने सर्व समान होते तर त्यांच्या कर्मातसुद्धा सर्व प्रकारे समानता असली पाहिजे. परंतु पुढचा जन्म होईल तरी कसा की जेव्हा समानतेमुळे त्यांची जोडी बनू शकत नाही. जोपर्यंत कर्मामध्ये अंतर नसेल तोपर्यंत त्यांच्यापैकी काही स्त्रिया व काही पुरुष कसे बनू शकतील? याशिवाय स्त्रीविना पुरुषाचे जीवन अपूर्ण आणि पुरुषाविना स्त्रीचे जीवन अपूर्ण राहते. या दृष्टीने पाहिले तर प्रारंभिक जीवनातसुद्धा स्त्री-पुरुष दोन्ही असणे आवश्यक आहे. पुनर्जन्माच्या धारणेनुसार असे घडणे अशक्य आहे की ईश्वराने कर्मामध्ये फरक न करता एखाद्याला पुरुष व एकीला स्त्री बनवावे. जर त्याने असे केले तर तो कर्माविना अकारण पशु-पक्षी, वनस्पती वगैरे सर्वकाही निर्माण करू शकतो. आम्ही असे का समजावे की हे सर्वकाही कर्मांचे फळ आहे?

(३) आत्मचेतना व चांगले-वाईटाचे ज्ञान केवळ मानवालाच आहे. पशु व वनस्पतीमध्ये आत्मचेतना असत नाही व चांगले-वाईटाचेसुद्धा ज्ञान नसते. अशा स्थितीत त्यांची कसलीही नैतिक जबाबदारी असत नाही व त्यांचे कसलेही नैतिक चरित्र असत नाही.

याच कारणामुळे आम्ही मानवाचे कर्म व त्याचे चरित्र पाहूनच तो अपराधी अथवा पुण्यात्मा असल्याचे ठरवितो. परंतु कोणत्याही झाडे-झुडुपे अथवा पशु-पक्ष्यांच्या बाबतीत असा निर्णय देत नाही की तो अपराधी अथवा पुण्यात्मा आहे. वास्तविकत: पुनर्जन्माच्या धारणेनुसार तर जनावरांचीसुद्धा अशी स्थिती असली पाहिजे की त्यांच्याकडून विचार, भावना आणि चरित्राचे प्रदर्शन व्हावे आणि जर त्यांना वाटले तर त्यांनी आपले चरित्र व कर्माद्वारे अशी योग्यता प्राप्त करावी की त्यांना पुन्हा मानव-योनी प्राप्त व्हावी. परंतु शास्त्रीय प्रयोगाने व अनुभवाने सिद्ध केले आहे की पशु व झाडे-झुडुपांकडून तर नैतिक व आध्यात्मिक विचार व भावनांची अभिव्यक्ती होत नाही आणि एखाद्या नैतिक अथवा आध्यात्मिक व्यवहार किंवा चरित्राचेसुद्धा प्रदर्शन होत नाही. म्हणून स्पष्ट आहे की त्यांच्या बाबतीत हा विचार की ते आपल्या सत्कर्म व सद्भावनांच्या आधारे निम्न योनीतून मुक्त होऊन पुन्हा मानवांच्या उच्च योनीत प्रवेश करू शकतील, पूर्णपणे उपहासजनक आहे.

आम्ही जर असे मानले की पशु, वनस्पती वगैरेंच्या योनीत मानव आत्मा केवळ शिक्षा भोगण्यासाठी जातो, शिक्षा प्राप्त केल्यानंतर त्याला आपण होऊन मानव योनीची प्राप्ती होते, तर या गोष्टीचे आकलन होत नाही. त्याला कारण असे की पुनर्जन्माच्या सिद्धान्तानुसार तर कोणतीही योनी कर्मानुसार प्राप्त होते आपण होऊन प्राप्त होत नसते.

मग मनुष्य एका मानव योनीत इतके अगणित चांगले अथवा वाईट किंवा दोन्ही प्रकारचे कर्म करतो की त्यांचे फळ प्राप्त करण्यासाठी सहस्त्र पटीने दीर्घ जीवन अपेक्षित आहे. जर त्याला कर्म करण्याच्या संधी वारंवार दिल्या गेल्या तर मग पुनर्जन्माच्या चक्रातून त्याच्या मुक्तीचा प्रश्नच उत्पन्न होत नाही.

(४) जर आमचा एखादा जन्म आमच्याच कर्माचे फळ आहे आणि वाईट कर्मांच्या प्रभावामुळे आम्हाला वाईट जन्म मिळतो व त्या जन्मात आम्हाला वाईट फळ मिळते तर मग हे कसे शक्य होईल की त्या फळातून सत्कर्मांचा प्रादुर्भाव होईल आणि त्याच्या परिणामस्वरूप पुढील जन्म अधिकच वाईट असेल आणि त्यात अधिकच वाईट कर्म प्रकट होतील. अशा प्रकारे तर वाईट व्यक्तीच्या पुनर्जन्मातून मुक्त होण्याची कसलीच शक्यता उरत नाही.

विचारणीय गोष्ट अशी आहे की जी व्यक्ती मानव असून सत्याची प्राप्ती करू शकत नाही आणि वाम मार्गावरच चालत राहिली, तिच्यापासून अशी अपेक्षा कशी करता येईल की जेव्हा ती उंट, गाढव अथवा झाड-झुडुप म्हणून जन्म घेईल तेव्हा त्या व्यक्तीला सत्याची प्राप्ती होईल आणि ती सदाचार करून उच्च कोटीच्या योनीत येऊ शकेल?

(५) शासन अथवा शिक्षेसाठी न्यायसंगत गोष्ट अशी आहे की अपराध्याला याची जाणीव असावी की त्याने पूर्वजन्मी अमुक अमुक पाप केले होते, ज्यांच्यामुळे त्याला ही शिक्षा मिळत आहे, परंतु जनावरांना आणि झाडांना तर सोडाच खुद्द मानवालासुद्धा हे माहीत असत नाही की त्याने पुनर्जन्मात कोणते पाप अथवा पुण्य केले होते की ज्यांचे फळ त्याला वर्तमान जन्मात चाखावे लागत आहे.

शिक्षेचा एक पैलू असासुद्धा आहे की ज्याची उपेक्षा केली जाऊ शकत नाही आणि तो म्हणजे माणसाच्या अत्याचार व दुराचाराने जे लोक प्रभावित झाले असतील, ज्यांना त्याने नुकसान पोहोचविले असेल त्या लोकांना कळावे की दुर्व्यवहार करणारा शिक्षा भोगत आहे. परंतु असे दिसत नाही.

याशिवाय पशु व वनस्पती वगैरेचे निरीक्षण करा. आपण पाहाल की त्यांचे जीवन, त्यांची शारीरिक शक्ती वगैरे, त्यांच्या अभिरुची व स्वभावाच्याच अनुरूप आहेत, मग या स्थितीला शिक्षा कसे म्हणता येईल?

(६) जर पशूंची संख्यात्मक वाढ व वनस्पतींची वृद्धी पाप आणि अपराधांचा परिणाम असेल तर मग पापाला धन्यवाद दिले पाहिजे की त्याच्यामुळेच आम्हाला आहार व सुख उपलब्ध होत आहे. जर आम्ही असे इच्छितो की येथे दुधाच्या नद्या प्रवाहित व्हाव्यात आणि धान्याचे व खाद्यान्नाचे भरपूर उत्पादन व्हावे तर पुनर्जन्माची अशी धारणा असणाऱ्या लोकांच्या दृष्टीने याचा वास्तविक उपाय असा असेल की पाप कर्मांना भरपूर प्रोत्साहन दिले जावे आणि सदाचार व पुण्याच्या मार्गात अडथळे उत्पन्न केले जावेत. परंतु या उपायाचे समर्थन करण्यास कदाचित एक मनुष्यसुद्धा तयार होणार नाही.

(७) जर एखादा दु:खी व पीडित मनुष्य वास्तविकत: आपल्या न्यायाचे फळ प्राप्त करीत आहे तर त्यावर दया करणे व त्याच्याशी सहानुभूतीचा व्यवहार करणे अनुचितच नव्हे तर अपराध ठरेल. मानवासाठी हे कसे योग्य ठरू शकते की ईश्वर ज्याला शिक्षा देत आहे त्याला आम्ही कोणत्याही प्रकारे मदत करावी?

जर एखादा मुलगा आपल्या वडिलांना मारत असेल आणि त्यांच्याशी अशिष्ट व्यवहार करीत असेल तर आम्ही त्याच्या या दुर्व्यवहाराला कशी मनाई करू शकतो? जर त्याबद्दल आम्ही त्याला रोखले तर तो म्हणू शकतो की जे काही होत आहे ते तर कर्माचे फळ आहे. यांनी पूर्वजन्मात मला खूप त्रास दिला आहे. त्याचा सूड मी आज त्यांच्यावर उगवीत आहे.

(८) याशिवाय हेसुद्धा एक तथ्य आहे की माणसाच्या चांगल्या-वाईट कर्मांचा

प्रभाव त्याच्या जीवनाबरोबर समाप्त होत नाही तर त्याच्या मृत्युनंतर अनेक शतकापर्यंत नव्हे तर त्याच्यापेक्षाही अधिक काळापर्यंत त्याच्या कर्मांचा चांगला अथवा वाईट प्रभाव पडू शकतो आणि तो मनुष्य त्याला जबाबदार असतो. अशाच प्रकारे एक पिढी जे काही करते त्याच्या प्रभावांचा क्रमसुद्धा त्याच्या नंतरच्या पिढ्यांत शेकडो वर्षांपर्यंत चालूच राहतो. त्यासाठी ती पिढी जबाबदार असते. म्हणून सत्कर्मांचे मूल्यांकन व दुष्कृत्यांच्या वाईटपणाचे मूल्यमापन करण्यासाठी अनिवार्य आहे की कर्मांच्या सर्व प्रभावांना पाहिले जावे आणि त्यांचे पुरावे गोळा केले जावेत आणि अपराध्यांना त्या सर्वच लोकांसमोर शिक्षेचा आदेश ऐकविला जावा की ज्यांना त्याच्यामुळे कोणत्याही प्रकारची हानी पोहचली असेल. ही हानी धन व प्राणासंबंधीसुद्धा असू शकते आणि मान-मर्यादेसंबंधीही असू सकते.

मग विचार करा, एखाद्या अशा व्यक्तीला या वर्तमान लोकात (जगात) शिक्षा देणे शक्य आहे काय? जर यावर विचार केला तर याच निष्कर्षाप्रत तुम्ही पोचाल की या लोकात एखाद्या माणसाला पूर्ण शिक्षाही दिली जाऊ शकत नाही आणि पूर्णपणे कोणाला पुरस्कृतसुद्धा केले जाऊ शकत नाही. त्याला कारण असे की अद्याप व्यक्ती व जातींच्या कर्मांचे व नीतींच्या होणाऱ्या प्रभावांची शृंखला संपली नाही आणि आज त्या सर्व लोकांना एकाच वेळी एकत्र आणले जाऊ शकत नाही जे अन्य लोकांच्या कर्मामुळे प्रभावित झाले आहेत अथवा भविष्यकाळात प्रभावित होतील. ही गोष्ट स्पष्ट आहे की असे तर या जगात शक्य होईल असे वाटत नाही, असे तर केवळ परलोकात घडणे शक्य आहे जेथे आरंभापासून प्रलयापर्यंतचे लोकसुद्धा एकत्रित केले जातील आणि व्यक्ती व जातींच्या बरे-वाईट कर्मांच्या प्रभावांचासुद्धा पुरेपूर हिशेब घेतला जाणे शक्य व्हावे.

## पुनर्जन्म व मानसिक रोगांचे विशेषज्ञ

कधी कधी असे म्हटले जाते अथवा वर्तमानपत्रात वाचावयास मिळते की अमुक व्यक्ती आपल्या पूर्वजन्माच्या गोष्टी सांगते. यावरून असे समजले जाते की पुनर्जन्माची धारणा खरी आहे. अशा प्रकारच्या निवेदनावर असा प्रश्न केला जाऊ शकतो की याचे कारण काय आहे की गत जीवनाच्या गोष्टी फक्त दोन-चार लोकांनाच आठवतात आणि बाकीच्या सर्वजणांना आपल्या पूर्वजन्माच्या गोष्टी का लक्षात राहिल्या नाहीत? विशेषज्ञांनी तर आता असे सिद्ध केले आहे की अशा प्रकारच्या निवेदनांची सत्यता सिद्ध होऊ शकली नाही की काही लोकांना आपल्या पूर्वजन्माच्या गोष्टी स्मरणात आहेत. हिंदुस्तान टाइम्स (दिल्ली) ने यू.एन.आय.च्या माध्यमाने आपल्या ७ ऑक्टोबर इ.सन १९६८ च्या अंकात ही बातमी प्रकाशित केली आहे की मानसशास्त्रज्ञांनी काही केसेसची तपासणी

केल्यानंतर असे मत प्रकट केले आहे की काही लोक जे आपल्या पूर्वजन्माच्या गोष्टी सांगतात ते अधिकांश 'मानसिक हिस्टीरिया'ने प्रभावित असतात. जयपूरच्या मानसिक रोगाच्या हॉस्पिटलचे सुपरिटेंडेंट डॉ. बी. के. व्यास आणि एक अन्य विशेषज्ञ श्री. रत्नसिंह यांचा असा दावा आहे की त्यांनी काही केसेस-रोगींचा उपचार केला आहे, ज्यात त्यांना यश मिळाले आहे. डॉ. व्यास यांनी यू.एन.आय.ला मुलाखत देताना सांगितले की जे लोक पूर्वजन्माच्या घटनांचे वर्णन करतात त्यांची मानसिक स्थिती साधारणपणे संतुलित नसते. या बहुतेक व्यक्तिगत समस्यांच्या केसेस असतात. हे लोक मानसिक असंतुलनामुळे काहीतरी वेगळे बनण्याचे इच्छुक असतात. अशा प्रकारच्या मनघडत कथा सांगून काही दुसरे लाभ प्राप्त होतात. डॉ. व्यास यांनी काही केसेसचे विवरणसुद्धा दिले.

## पुनर्जन्माचा मानवजीवनावर प्रभाव

पुनर्जन्माची धारणा इतकीच नव्हे की ती तर्कसंगत नाही तर ती अव्यावहारिकसुद्धा आहे. जेव्हा हिला पूर्णत: मान्यता दिली गेली याचे भयंकर परिणाम समोर आले. विस्ताराचे भय नसते तर इतिहासात घडलेले याचे भयंकर परिणाम दाखविणे शक्य झाले असते. आज जर एखादा मनुष्य पूर्णपणे या धारणेचे पालन करू लागला तर त्याला कुणी धर्मात्मा तर सोडाच एक सज्जन म्हणून मानण्यास तयार होणार नाही. हेच कारण आहे की पुनर्जन्म मानणाऱ्यांचे आचरण पूर्णत: या धारणेच्या अनुकूल असत नाही. ते व्यवहारात आपल्या या धारणेचे स्वत:च खंडन करताना आढळतात आणि जितका अधिक एखादा या धारंणेच्या अपेक्षा व मागणीची उपेक्षा करतो तितके जास्त मानवतेचे गुण त्याच्यात उत्पन्न होतात. उदाहरणार्थ, पुनर्जन्माच्या धारणेनुसार आम्ही दीन-दु:खी, निराश्रित व लंगडे-पांगळे वगैरे लोकांवर दया करता कामा नये, कारण ते आपल्या पूर्वजन्मात केलेल्या कृत्याची शिक्षा भोगत आहेत. अपराध्याला सहाय्य करणे हा केवळ घोर अपराधच नव्हे तर सरकारी कायद्याची अवहेलना व द्रोह आहे. महाभारतात स्पष्ट शब्दांत सांगितले गेले आहे की मुक्यांना, कुष्ठरोग्यांना, अपंग, बुटके, नीच वंशातील लोक व जानवे न घालणाऱ्या लोकांना दान देऊ नये. ब्राह्मण जर अशिक्षित असेल तर त्याला दान देऊ नये. अयोग्य रितीने दिलेले व अयोग्य रितीने घेतलेले दोन्ही प्रकारे दान देणाऱ्या व घेणाऱ्यासाठी धोकादायक व संकटपूर्ण आहे. (शांती पर्व : ३६:३८-३९)

आता आपण स्वत: विचार करा. जर एखाद्या व्यक्ती अथवा समाजाने या शिकवणीचे दृढतापूर्वक पालन करावयाचे ठरविले तर काय जगाच्या दृष्टीने ती व्यक्ती

अथवा समाज सभ्य म्हणविण्यास पात्र आहे? हेच कारण आहे की पुनर्जन्माची धारणा मान्य करूनसुद्धा लोक व्यवहाराच्या क्षेत्रात त्याचे पालन करीत नाहीत. काय हे या गोष्टीचे प्रमाण नव्हे की पुनर्जन्माची धारणा मानव-स्वभावाच्या प्रतिकूल आहे? मानवस्वभाव व या धारणेत एकरूपता आढळत नाही.

पुनर्जन्माच्या धारणेचा अंगीकार केल्याने मानव जीवनावर फार दुःखद व भयंकर परिणाम होतात. एखाद्या समाजात की ज्याने या धारणेचा अंगीकार केला आहे आणि त्यात जर ते प्रभाव पूर्णपणे दिसत नसतील तर याचा अर्थ असा होतो की तो समाज या धारणेचे पूर्णपणे पालन करीत नाही. आता आम्ही थोडक्यात काही अशा प्रभाव व परिणामाकडे लक्ष वेधू इच्छितो की जे या धारणेची कडू फळे होत की जी प्राचीन काळातच नव्हे तर आजसुद्धा चाखावी लागत आहेत.

१) उक्त धारणेचा स्वीकार करण्याचा परिणाम होईल की हे रहस्यमय जग की ज्याच्या माध्यमाने ईश्वराच्या मधुमय रहस्यांचे उद्घाटन होते. जे अत्यंत सुंदर व विस्मयकारी आहेत, ज्यात पदोपदी मनात इच्छा होते की प्रभुचे गुणगान करावे असे जग एक दुःखपूर्ण स्थान बनून राहील की ज्यातून मुक्त होण्यासाठी व त्यातून पलायन करण्यासाठी तडफडावे. ज्याला प्रेमाच्या दृष्टीने पाहण्याऐवजी उपेक्षेने पाहावे, ज्याला मुक्तीच्या मार्गातील फार मोठी धोंड समजण्यात यावे. त्रास व संकटांनाच नव्हे तर ज्यात मिळणाऱ्या सुखालासुद्धा यातना म्हटले जावे. हा प्रभुच्या कृपा-प्रसादाचा निरादर नव्हे काय? ही उपकार आणि दयेबद्दल अशी प्रतिक्रिया नव्हे काय की जी आमच्या चेतनेसाठी केवळ कलंक मात्र आहे?

उक्त धारणेच्या दृष्टीने वर्तमान लोक आणि मानवाच्या स्वाभाविक, उच्च व मुक्तावस्थेच्या दरम्यान विरोध आहे. उक्त धारणेच्या दृष्टीने तर प्रत्येक व्यक्ती येथे दुःख भोगण्यासाठीच आलेली आहे. ही गोष्ट वेगळी आहे की कर्मानुसार एखाद्याच्या हिश्यात दुःखाचे प्रमाण कमी तर एखाद्याच्या हिश्यात अधिक येते. जो येथे सुखी तोसुद्धा दुःखात आहे कारण वास्तविक सुखाचा तो अद्याप अधिकारी बनू शकला नाही. जर तो त्याचा अधिकारी असता तर त्याला जन्म-मृत्युपासून मुक्ती मिळाली असती. ही मुक्ती तर याच स्थितीत शक्य आहे की जेव्हा आत्म्याला भौतिक वस्तूंशी प्रेमच उरणार नाही. जोपर्यंत भौतिक जीवनाशी त्याला प्रेम व घृणात्मक संबंध आहे तोपर्यंत त्याला पुन्हा पुन्हा मरून नवीन जीवन घ्यावे लागेल आणि दुःख भोगावे लागेल.

यावरून स्पष्ट होते की अपेक्षित मनोवृत्ती अशी आहे की मानवाने या जगाला उपेक्षेच्या दृष्टीने पाहावे. उपेक्षेच्या दृष्टीने जगाला पाहणारा मनुष्य वर्तमान लोकाला

(जगाला) कुरुप घोषित करणार नाही काय? अशा माणसापासून अशी आशा करणे कसे शक्य आहे की त्याच्यासाठी जगाची प्रत्येक विलक्षण वस्तु सत्याचे दर्पण सिद्ध होईल? तो तर आपली संपूर्ण शक्ती आपल्या इच्छांचे दमन करण्यात लावील. त्याने सहजपणे ईश्वराच्या कृपाप्रसादाला प्राप्त करावे याची शक्यताच कोठे उरते?

२) जर एखाद्या व्यक्तीने जगाला उपेक्षेच्या दृष्टीने पाहिले आणि जगाला दु:खमय लोक असल्याची त्याने घोषणा केली तर त्याला कोठे अशी संधी आहे की त्याने ईश्वराचे उपकार मानावे. त्याच्या समोर कृतज्ञता व्यक्त करावी व त्याला धन्यवाद द्यावे, कृतज्ञतेची भावना मानवासाठी सर्वांत मोठी उपलब्धी आहे, परंतु या जगाला व जीवनाला यातना व निव्वळ तुरुंग समजल्यानंतर कृतज्ञतेची भावना मानव-हृदयात कशी उत्पन्न होऊ शकते? ही भावना तर त्याचवेळी उत्पन्न होऊ शकते की जेव्हा या जीवन व जगाला पाहण्याचा दृष्टिकोन काही अन्य असावा. जग व जीवन दु:ख आणि पापाचा चमत्कार न राहता ईश्वराची महानता व त्याची दया व दानशीलतेचे परिचायक असावे. परंतु पुनर्जन्माच्या धारणेच्या अंतर्गत असला दृष्टिकोन स्वीकारलाच जाऊ शकत नाही.

३) उक्त धारणेमुळे मानवाची विचारशीलता व कर्मशीलतासुद्धा शिथिल होते. जीवनाला काही करण्याची सुवर्णसंधी समजण्याऐवजी जर आम्ही त्याला भोग व कर्मफळ समजू लागतो तर स्पष्ट आहे की आम्ही आपल्या जीवनाला ईश्वरी वरदान म्हणून स्वीकारणार नाही तर असा विचार करू की केव्हा आमची मुदत संपते आणि केव्हा आम्ही या तुरुंगातून (जगातून) मुक्त होतो आणि हीच अभिरुची आम्ही धार्मिक असण्याचे लक्षण व प्रमाण असेल. अशा स्थितीत जीवनऊर्जेला, आमच्या संकल्पशक्तीला आणि कार्यकुशलतेला धक्का पोहचेल व आमच्या जीवनात शिथिलता व अकर्मण्यता येईल. मनुष्य तर आपल्या पूर्व कर्मात बांधलेला आहे. त्याला स्वतंत्रपणे पुढे जाण्याची संधी आहेच कुठे? आम्ही काही असाच विचार करू लागू आणि ही मन:स्थिती जीवनासाठी सर्वांत अधिक घातक आहे.

४) उक्त धारणेमुळे अहंकारालासुद्धा बळ मिळेल. ज्या लोकांजवळ धन व सुख-सामुग्री असेल ते त्याला आपल्या पूर्वीच्या कर्माचा परिणाम व आपली कामगिरी समजतील आणि दीन-दु:खींना उपेक्षेच्या दृष्टीने पाहतील. ही नीती माणसाला गर्विष्ठ तर बनवील, परंतु त्याच्यात विनय व नम्रता आणू शकणार नाही की जी मानवतेसाठी सर्वांत मोठी शोभा आहे.

५) जे लोक गरीब असतील अथवा ते संकटात असतील तेव्हा त्यांच्यात हीनतेच्या भावनेचा उदय होईल. ते आपल्या गरीबी व संकटाला अशा भावनेने पाहणार

नाहीत की ही तर सामायिक स्थिती आहे जी सदैव राहणार नाही आणि ही आमच्या वाईट व नीच असल्याचा परिणाम नाही तर केवळ ही आमच्या परीक्षेसाठी आहे की आम्ही गरीबी व दु:खात कसल्या चरित्र व भावनेचा परिचय देतो. पुनर्जन्माच्या धारणेनुसार एखादा दु:खी व निर्धन मनुष्य असाच विचार करील की हे सर्व माझ्या वाईट कर्मांचे फळ आहे. हे भोगावेच लागेल. यातून सुटका नाही. तो स्वत:ला पापी व पतित मानील. त्याला वाटेल की ईश्वराकडून त्याला शिक्षा मिळत आहे. अशा स्थितीत तो ईश्वरालाही धन्यवाद देऊ शकत नाही आणि त्याच्या मनात ईश्वराबद्दल प्रेम व भक्तीची भावनादेखील उत्पन्न होणार नाही. तो कसे धैर्य दाखवू शकेल? तो हीन भावनेच्या ओझ्याखाली दडूनच राहील. तो त्या लोकांना की ज्यांची आर्थिक स्थिती त्याच्यापेक्षा चांगली आहे त्यांना स्वत:पेक्षा उच्च समजेल व स्वत:ला त्यांचा गुलाम व दास समजण्यात त्याच्या स्वाभिमानावर काहीही आघात होणार नाही. स्वाभिमान नावाची चीज त्याच्याजवळ असेल तरी कुठे?

६) पुनर्जन्माची धारणा लोकांना परस्पर जोडण्याऐवजी त्यांच्यात भेदभाव निर्माण करील. काही लोक जन्मत:च अपेक्षाकृत चांगले आणि काही पापी व अपराधी समजले जातील. अशा प्रकारे मानवतेची शकले पडतील व ती छिन्नभिन्न होईल. उच्च-नीच भावना जोपासली जाईल. काही लोक पवित्र व काही लोक अपवित्र घोषित केले जातील आणि हे सर्व धर्माच्या नावाने होईल.

७) मग गोष्ट येथपर्यंत पोहचेल की मानव स्वत: मानवाबद्दल द्वेष व शत्रुतेची भावना बाळगील. त्याच्या हे लक्षात येणार नाही की त्याच्या संपत्तीत गरीब व मोताद लोकांचादेखील हक्क आहे. तो एखाद्याचा हक्क गडप करून आनंद विभोर होईल की, मी एखाद्या पूर्वजन्माचा सूड आपल्या शत्रूवर उगविला.

आर्थिक व सामाजिक स्थितीच्या दृष्टीने लोकांत जे अंतर दिसेल त्याला ते सामाजिक, आर्थिक स्थितीतील अंतर न मानता आत्मिक अंतर समजतील. मनुष्य स्वत:चा संबंध दैवत्वाशी जोडू शकतो आणि दुसऱ्यांना राक्षस घोषित करू शकतो. तो स्पृश्यास्पृश्याच्या नियमांचे पालन करील जणू काय त्याच्यापेक्षा जास्त कलंकाची कोणतीही गोष्ट मानवासाठी असू शकत नाही. आपण स्वत: विचार करा की हा मानवतेचा अपमान नव्हे काय? अशा प्रकारे मानवतेला उंच उठविले जाऊ शकते काय? अशा प्रकारे मानवात खरे ऐक्य आणले जाऊ शकते काय? पडणाऱ्यांना सावरले जाऊ शकते काय? या भावनेसह मानव कोणताही भेदभाव न मानता एकमेकाला गळ्याशी लावतील काय?

८) पुनर्जन्म असल्याचे मान्य केल्यानंतर आम्हाला अनेक असंगत व असंबद्ध गोष्टींचादेखील स्वीकार करावा लागतो. ही धारणा मान्य केल्यास खुद्द श्रीरामचंद्र यांच्या

महानतेलासुद्धा क्षती पोहचते कारण त्यांच्या जीवनातसुद्धा दु:ख व शोक आढळते. सीतेसाठी त्यांना वन वन हिंडावे लागले आणि चौदा वर्षांचा वनवास भोगावा लागला. महाराजा युधिष्ठिर व त्यांच्या बंधुंना की ज्यांच्यावर प्रारंभापासून अत्याचार झाला होता, स्वत:च्या प्राण-रक्षणासाठी किती प्रयत्न करावे लागले. आपल्यापेक्षा अधिक बलशाली शत्रूशी युद्ध करावे लागले. राज्यप्राप्तीनंतरसुद्धा ज्या दु:खद घटना घडल्या त्यांच्यामुळेदेखील जीवनातील सुख क्षीणच होत गेले. अशाच प्रकारे महाराजा हरिश्चंद्राचे जीवन घ्या. त्यांना इतकेच नव्हे की आपल्या राजसिंहासनाला सोडावे लागले तर विवश होऊन आपली पत्नी व पुत्राला विकावे लागले. गुलामगिरीत पुत्राच्या मृत्युचा शोक सहन करावा लागला व पुत्रासाठी व्याकुळ पत्नीला पाहून ते दु:ख निमूटपणे सहन करावे लागले. भक्त प्रल्हादाला सावत्र आईचा छळ व भर्त्सनामुळे दु:खी होऊन जंगलाचा मार्ग धरावा लागला. राजा पाण्डव जे अर्जुन वगैरेचे वडील होते, ते क्षयरोगाने पिवळे पडले होते. राजा धृतराष्ट्र जन्मत: आंधळे होते. विचारणीय गोष्ट अशी की या महान व्यक्ती व भक्तांच्या पूर्वजन्माच्या पापांचीही कडू फळेत आहेत काय जी त्यांना चाखावी लागली. असे मानून तर आम्ही त्यांच्या महान चरित्राला की ज्याला दु:ख व संकटाच्या परिवेश व पार्श्वभूमीने पूर्णपणे व्यक्त केले आहे, कलंकित करण्याचे दुस्साहस करू. दु;ख व संकटांनी तर वास्तविकत: यांना महानतेच्या उच्च आसनावर आरुढ होण्यास सहयोग दिले आहे. या कथांच्या विषयवस्तुवरून असे स्पष्टपणे दिसते की या कथांच्या पाठीमागे पुनर्जन्माची धारणा अजिबात आढळत नाही.

खरे तर असे आहे की जगातील दु:ख व संकटांना एखाद्या पूर्वजन्माचे फळ म्हणणे व धन-वैभवाला एखाद्या पूर्वजन्माच्या सत्कर्माचा परिणाम मानणे अशी धारणा आहे जी मानव-चेतनेसाठी मोठ्या कलंकाची गोष्ट आहे.

याशिवाय या बाबतीत ही गोष्टसुद्धा विचारणीय आहे की जगात कित्येक सुखी व धनवान लोक असे आढळतात ज्यांची आत्मिक स्थिती अत्यंत शोचनीय असते. त्यांचे प्रासाद तर भव्य असतात, त्यांचे सांपत्तिक वैभव तर लक्षणीय असते, परंतु ते स्वत: स्वभाव व चारित्र्याच्या दृष्टीने अत्यंत पतित व नीच असतात. अखेर असे का आहे? जर ते पूर्वजन्मी चांगले होते, म्हणून त्यांना सुख प्राप्त झाले आहे तर त्यांचा तो चांगुलपणा कोठे लुप्त झाला? या उलट कित्येक गरीब, निर्धन व संकटग्रस्त लोक असे आढळतात जे स्वभाव आत्म्याच्या दृष्टीने अत्यंत पवित्र व उच्च असतात. प्रश्न असा आहे की जर ते वाईट व पापी होते की ज्यामुळे त्यांना त्रास सहन करावा लागत आहे तर त्यांचा तो वाईटपणा व त्यांच्या त्या पापी शील-स्वभावाचे मालिन्य कोठे हरवले?

*अध्याय- ९*

# अमृतस्पर्श अथवा...?

## परलोकाला न मानण्याचा मानवी जीवनावर परिणाम

परलोकवादाची धारणा काही सामान्य लोकोत्तर दार्शनिक धारणांपैकी नाही की जी मान्य करणे अथवा न मान्य करण्याचा आमच्या व्यावहारिक जीवनावर काही परिणाम होत नसावा. परलोकवादाचा आमच्या जीवनाशी खोलवरचा संबंध आहे. हे मानणे आणि न मानण्याचा सांसारिक जीवन आणि त्याच्या व्यवहारावर मौलिक रूपाने परिणाम होतो. परलोकाला मानणे आणि न मानल्यामुळे मानवाच्या दृष्टिकोनात मौलिक बदल घडून येतो. जर तो परलोकाला मानत असेल तर स्वभाविकपणे सांसारिक जीवन व त्याच्यासंबंधी त्याचा दृष्टिकोन, त्या दृष्टिकोनापासून अत्यंत भिन्न असेल जो परलोकाला न मानण्याच्या स्थितीत असेल.

परलोकावर विश्वास न ठेवणारा स्वत:ला उत्तरदायी समजणार नाही व तो आपल्या जीवाचा जो काही कार्यक्रम ठरवील त्यात तो कदापि या गोष्टीचे लक्ष ठेवणार नाही की एखाद्या अन्य जीवनात त्याच्या कर्मांचा काही परिणाम निघणार आहे. तो तर केवळ हेच पाहील की त्याच्या कोणत्या कर्माचा चांगला परिणाम वर्तमान जीवनात समोर येऊ शकतो आणि कोणते कर्म जीवनासाठी हानिकारक आहे. त्याच्या दृष्टीने हानिकारक गोष्ट तर ती असेल ज्यामुळे वर्तमान जीवनात हानी पोहचत असेल आणि ती त्या कार्याला लाभदायक समजेल की ज्यामुळे जगात त्याला हानी होण्याची भीती असावी. तो विषपान करणार नाही, कारण त्याला माहीत आहे की विष विनाशकारी आहे. त्याचे सेवन केल्यास तो जिवंत राहू शकत नाही. परंतु असत्य, अन्याय, विश्वासघात वगैरेपासून तो स्वत:ला केवळ त्या सीमेपर्यंत वाचविण्याचा प्रयत्न करील की ज्यामुळे त्याला जगात नुकसान होण्याची शंका असेल. जेव्हा तो असे पाहील की खोटे बोलण्याने तो आपले काम तडीस नेऊ शकतो आणि यामुळे त्याला जगात नुकसानही होणार नाही. तेव्हा तो खोटे बोलून आपले काम करून घेईल. जेव्हा तो पाहील की दुसऱ्यांची फसवणूक करून त्याला फायदा होईल व कोणतीही हानी होणार नाही तेव्हा त्याला दुसऱ्यांना फसविण्यात कोणताही संकोच वाटणार नाही. अशा माणसाच्या दृष्टीने धन-दौलत व अन्न आणि वस्त्राचे तर मूल्य असेल, परंतु हे आवश्यक नाही की न्याय, सत्य, सेवा व जनप्रेमाचीसुद्धा त्यांच्या दृष्टीने काही किंमत असावी. तो तर केवळ हे पाहील की त्याचे हित कशात आहे.

ज्यात त्याला स्वत:चे हित दिसेल तीच गोष्ट तो अवलंबील. सत्यता व न्याय्य गोष्टीत जर त्याला स्वत:चे नुकसान दिसेल तर तो सहजपणे तिचा त्याग करून असत्य अन्यायाचा मार्ग अवलंबील.

परलोकाला न मानणारे लोक केवळ जगात तत्काळ प्राप्त होणारे लाभ व सुख पाहतात, त्यांची दृष्टी एखाद्या स्थायी व शाश्वत परिणामावर नसते, ते कोणत्याही मार्गावर तेथपर्यंतच चालू शकतात जेथपर्यंत त्यांना आपले हित व सांसारिक लाभ दिसतात. त्यांच्यापुढे जाण्याची व एखाद्या मोठ्या त्याग आणि सेवाकार्याची त्यांच्याकडून आशा बाळगता येत नाही. ते केवळ जगाच्या बाह्य रूपालाच पाहतात आणि केवळ त्याचे प्रारंभिक व वरकरणी फायदेच त्यांच्या दृष्टीने असतात आणि त्यांच्यामुळेच फसविले जाऊन आपली नीती व मते निश्चित करतात. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''ते सांसारिक जीवनाच्या केवळ प्रकट (गोष्टी) ना जाणतात आणि ते आखिरत (परलोक) पासून तर गाफीलच आहेत.''** -३०:७

**''आणि ज्यांना सांसारिक जीवनाने फसवणुकीत घातले आहे.''** -७:५१

ते जगालाच सर्वकाही समजून बसले आहेत. तात्कालिक फायद्यासाठी ते आपल्या जीवनाला डावावर लावतात. वस्तुत: ते ज्याला आपल्या जीवनात प्राधान्य देत आहेत ते नश्वर असते. ज्या गोष्टीवर ते राजी होतात ती राजी होण्यासारखी गोष्ट नव्हे. मनुष्याला तर त्याच्यापेक्षा अधिक श्रेयस्कर जी गोष्ट असू शकते तिची इच्छा केली पाहिजे आणि त्यासाठी प्रयत्नशील व्हावयास पाहिजे, परंतु परलोकाला न मानण्यामुळे त्यांची दृष्टी अत्यंत संकुचित बनून राहिली आहे आणि ते जे काही जगात मिळत आहे त्याच्यासाठीच पदर पसरून बसलेले असतात. याच्या पुढच्या गोष्टीसाठी त्यांच्याजवळ कसलेही साहस नाही, कोणतीही अभिलाषा नसते. त्यांची चेतना कुंठित व त्यांची मानसिक स्थिती अत्यंत शोचनीय असते. पवित्र कुरआनमध्ये स्पष्ट शब्दांत म्हटले आहे,

**''वस्तुस्थिती अशी आहे की ज्या लोकांना आमची भेट अपेक्षित नाही आणि जे ऐहिक जीवनावर संतुष्ट व समाधानी बनले आहेत आणि जे लोक आमच्या निशाण्यांपासून गाफील आहेत - त्यांचे शेवटचे ठिकाण नरक असेल त्या दुष्टतेपायी ज्यांची कमाई ते (आपल्या या चुकीच्या श्रद्धेमुळे व चुकीच्या आचरणामुळे) करीत राहिले.''** -१०:७-८

अशाच लोकांना संबोधित करून पवित्र कुरआन म्हणतो,

**''काही नाही! तुम्ही तर लगेच मिळणाऱ्या (जग) ला प्रिय ठेवता व त्यानंतर येणाऱ्या (परलोक) ला सोडून देता.''** -७५:२०-२१

**''परंतु तुम्ही तर सांसारिक जीवन पसंत करता वास्तविकतः परलोक कितीतरी जास्त चांगले व स्थायी आहे.''** -८७:१६-१७

परलोक न मानणाऱ्यांचा नैतिक दृष्टिकोन काही औरच असतो. वस्तूंचे मूल्यांकन करण्यात ते फसतात. कर्माच्या अंतिम परिणामाला न पाहता केवळ तात्कालिक लाभावरच त्यांची दृष्टी टिकून असते. यामुळे त्यांचे सर्वच प्रयत्न व्यर्थ जातात. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''काय यांना वाटते की आम्ही यांना संपत्ती व संततीने मदत करीत आहोत तर जणूकाय यांना कल्याणकारी गोष्टी देण्यात उत्साही आहोत? नव्हे, वस्तुस्थितीची यांना जाण नाही.''** -२३:५५-५६

**''हे पैगंबर (स.), यांना सांगा, काय आम्ही तुम्हाला सांगावे की आपल्या कृत्यामध्ये सर्वात जास्त अपयशी आणि विफल लोक कोण आहेत? जगातील जीवनात ज्यांची सर्व धावपळ सरळ मार्गापासून भ्रष्ट राहिली आणि ते समजत राहिले की ते सर्वकाही यथायोग्य करीत आहेत. हे ते लोक आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्त्याची वचने मानण्यास नकार दिला आणि त्याच्या पुढे हजर होण्याचा विश्वास केला नाही. म्हणून त्यांची सर्व कृत्ये वाया गेली, पुनरुत्थानाच्या दिवशी आम्ही त्यांना काहीच वजन देणार नाही.''** -१८:१०३-१०५

परलोक न मानणारा जगालाच सर्वकाही समजण्याची चूक करतो; म्हणून त्याच्याकडून ही आशा बाळगणे व्यर्थ आहे की तो सत्य-धर्माचा स्वीकार करील आणि तो आपल्या जीवनात खरेपणा आणू शकेल. त्याच्यासमोर उच्चात्युच्च नैतिक आदर्श प्रस्तुत करा, परंतु तो तर तेच करील ज्यात त्याचा भौतिक लाभ असेल. त्याला काय कल्पना सत्य धारणांची, तो काय समजणार सत्कर्म व कल्याणकारी कार्यांना? तो तर केवळ इतकेच जाणतो आणि हेच समजण्याच्या स्थितीत आहे की त्याला जीवनात जितके सुख व सवलती प्राप्त करता येतील तितक्या प्राप्त कराव्यात. येणाऱ्या जीवनाला तो चेष्टेवारी उडविण्याचा प्रयत्न करतो. वस्तुतः शाश्वत जीवन व त्यातील उपलब्धी त्याची प्रतीक्षा करीत असतात. तो त्यांच्यापासून विमुख होऊन आपलाच सर्वनाश करून घेतो. पवित्र कुरआन अशा लोकांच्या बाबतीत मोठ्या मार्मिकतेने म्हणतो,

**''मी आपल्या संकेतांकडून त्या लोकांची दृष्टी फिरवीन जे कसल्याही**

**हक्काविना भूतलावर मोठे बनतात, त्यांनी कोणतेही संकेत जरी पाहिले तरीदेखील कधीही ते त्या संकेतांवर श्रद्धा ठेवणार नाहीत. जर सरळमार्ग त्यांच्यासमोर आला तर याचा अवलंब करणार नाहीत आणि जर वक्र मार्ग दिसून आला तर त्याच्यावर चालू लागतील, याकरिता की त्यांनी आमच्या संकेतांना खोटे ठरविले आणि त्यापासून ते बेपर्वाई करीत राहिले. आमच्या संकेतांना ज्याने कोणी खोटे ठरविले आणि (अल्लाहच्या पुढे) मरणोत्तर जीवनाच्या हजेरीचा इन्कार केला, त्याचे सर्व केले सवरले वाया गेले. काय लोक याच्याखेरीज इतर काही मोबदला प्राप्त करू शकतात की जसे करावे तसे भरावे?''** -७:१४६-१४७

याशिवाय परलोक न मानल्यामुळे मानवाचे संपूर्ण नैतिक व व्यावहारिक जीवन भ्रष्ट होते. अहंकार व उदंडपणाशिवाय त्याच्या पदरी काही पडत नाही. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''विनाश आहे दांडी मारणाऱ्यांसाठी, ज्याची स्थिती अशी आहे की जेव्हा लोकांकडून घेतात तेव्हा पुरेपूर घेतात आणि जेव्हा त्याला मापून किंवा तोलून देतात तेव्हा त्यांना कमी देतात. काय या लोकांना समजत नाही की यांना जिवंत होऊन उठावयाचे आहे.''** -८३:१-४

**''तुमचा ईश्वर तर केवळ एकच ईश्वर आहे. परंतु जे लोक परलोकाला मानत नाहीत त्यांच्या मनात नकार वास्तव्य करून आहे. आणि ते घमेंडीत पडले आहेत.''** -१६:२२

जग आणि भौतिक सुखांनाच सर्वकाही समजणारे व सांसारिक गोष्टींच्या पाठीमागे धावणाऱ्यांचे स्वभाव कठोर बनतात. ते निर्दयतेची जी कोणती नीती अवलंबितील कमीच आहे. जर ते एखादे पुण्याचे कार्य करतील तर ते केवळ जगाला दाखविण्यासाठी करतील. खरी गोष्ट तर अशी आहे की जी व्यक्ती जीवनाचे मार्मिक, मधुर व सुदृढ पैलू मानण्यास इन्कार करते आणि जीवनाचे केवळ पाशवी पैलूच पाहते, तिच्या जीवनात कोमलता, सहृदयता, सहानुभूती व संवेदनशीलतेच्या भावनांसाठी आधारच कुठे उरतो? ती व्यक्ती परलोक अर्थात जीवनाच्या उच्चतम, मनोरम आणि न्यायसंगत संभावनांची उपेक्षा करते. जर ती असे समजते की तिने केवळ पारलौकिक जीवनाचा इन्कार केला आहे तर ही तिची चूक आहे. तिने केवळ परलोकालाच खोटे ठरविले नाही तर वर्तमान जीवनालासुद्धा विषमय बनविले त्यात कटुतेचे बीज पेरले, तिचे सर्वस्व हिसकावून घेतले आणि तिच्या आत्म्याचे हनन केले. मग हे कसे म्हटले जाऊ शकते की तिने वर्तमान जीवनाचे खरे सुख प्राप्त केले. पवित्र कुरआन अशा लोकांच्या मनोवृत्ती व चरित्रावर

प्रकाश टाकताना म्हणतो,

**''तुम्ही पाहिले त्या माणसाला जो परलोकातील मोबदला व शिक्षेला खोटे ठरवितो? तोच तर आहे जो अनाथाला धक्के देतो आणि गरिबांना जेवण देण्यासाठी उत्तेजन देत नाही.''** -१०७:१-३

अशा लोकांनी जर दाखविण्यासाठी नमाज अदा केली तर ती निरर्थक आहे. म्हणूनच पवित्र कुरआन पुढे म्हणतो,

**''मग विनाश आहे त्या नमाज पढणाऱ्यांसाठी जे आपल्या नमाजात गफलत करतात. जे दाखविण्याचे कार्य करतात आणि साध्या हलक्या वस्तुसुद्धा मागितल्यास देत नाहीत.''** -१०७:४-७

हा कंजुषपणा व मनाचा संकुचितपणा अशासाठी आहे की लोकांना ही कल्पना नाही की ईश्वराच्या अपार भांडार व अनश्वर संपत्तीसाठी तेच अधिकारी बनतील, ज्यांच्यात कंजुषपणा नाही, जे दानशूर आहेत. जे ईश्वराच्या प्रसन्नतेसाठी, परलोकाच्या सफलतेसाठी आणि आत्मिक विकासासाठी आपले सर्वस्व लुटविण्याचे धाडस बाळगतात. हे धाडस परलोकाला मानल्याविना आणि जीवनाचे वास्तविक स्वरूप जाणल्याविना कसे येऊ शकते? पवित्र कुरआन सावध करतो,

**''ज्या लोकांना अल्लाहने आपल्या कृपेने उपकृत केले आहे, आणि मग ते कंजूषपणाने वागतात तर त्यांनी या भ्रमात राहू नये की हा कंजूषपणा त्यांच्यासाठी चांगला आहे. नव्हे, हे त्यांच्याकरिता अत्यंत वाईट आहे. जे काही ते आपल्या कंजूषपणाने गोळा करीत आहेत तेच पुनरुत्थानाच्या दिवशी त्यांच्या गळ्यातील जोखड बनतील. पृथ्वी व आकाशांचा वारसा अल्लाहकरिताच आहे, आणि तुम्ही जे काही करता अल्लाह त्याबाबत सर्वज्ञ आहे.''** -३:१८०

जर वर्तमान जीवनातील भौतिक वस्तूंचे पुजारी सांसारिक सुख-भोगविलासाच्या पाठीमागे अस्वस्थ आहेत आणि जी सुख-सामुग्री त्यांना मिळाली आहे त्यावर त्यांच्या आनंदाला पारावार नाही तर ही काही मोठी श्रेय व साफल्याची गोष्ट नाही. किती चांगले झाले असते जर त्यांना हे कळले असते की ज्या गोष्टीला ते अत्यंत प्रिय समजतात तिने त्यांना त्या गोष्टीपासून गाफील करून सोडले आहे की वास्तविकत: जी इच्छा करण्याजोगी गोष्ट होती,

**''हे पैगंबर (स.), शहरांमध्ये अश्रद्धावानांच्या धावपळीमुळे तुम्हाला भ्रम होता कामा नये. ही केवळ काही दिवसांच्या जीवनाची थोडीशी मौज आहे, नंतर**

**ते सर्वजण नरकामध्ये जातील जे अत्यंत वाईट ठिकाण आहे. याउलट जे लोक आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगून जीवन व्यतीत करतात त्यांच्यासाठी अशी उद्याने आहेत ज्यांच्या खालून कालवे वाहतात, त्या उद्यानांत ते सदैव राहतील, अल्लाहतर्फे ही त्यांच्यासाठी मेजवानीची सामग्री होय, आणि जे काही अल्लाहजवळ आहे सदाचारी लोकांकरिता तेच सर्वोत्तम आहे."** -३:१९६-१९८

## परलोक मानण्याचा मानवजीवनावर परिणाम

परलोक मानल्यानंतर मनुष्य त्या सर्व वाईट गोष्टींपासून अलिप्त राहतो ज्यात परलोक न मानणारे गुरफटलेले आहेत. परलोकवादाचा स्वीकार केल्याने मानवावर जे सुपरिणाम होतात त्यांचे वर्तमान जीवनाच्या दृष्टीने फार मोठे महत्त्व आहे. परलोकवाद मानणारा परलोकामध्ये तर सफल होईलच त्याचबरोबर या लोकातसुद्धा जी पवित्रता व महानता प्राप्त होते ती कोणत्या अन्य उपायाने उपलब्ध होऊ शकत नाही. येथे थोडक्यात त्या प्रभावांचा उल्लेख केला जात आहे जे परलोकाचा स्वीकार केल्यामुळे मानवजीवनावर पडतात.

(१) परलोकाचा स्वीकार केल्यानंतर मानवजीवनाचा विस्तार व क्षेत्र फार वाढला. त्यात कोणत्याही प्रकारचा संकुचितपणा उरला नाही. माणसाची दृष्टी अत्यंत व्यापक बनते. तो सामायिक व तात्कालिक लाभांचा पुजारी न बनता आपली दृष्टी त्या गोष्टीवर केंद्रित करतो जी शाश्वत व नित्य आहे. तो अशा आनंद व उल्हासाचा इच्छुक असतो जो स्थायी व अमर आहे.

आपल्याला माहीत आहे की ज्या समाजात लोकांचे उद्दिष्ट पायाजवळच्या स्वार्थाची प्राप्त असेल त्यात स्थायित्व व संतुलन कदापि येऊ शकत नाही. समाजात असंतोष धुमसत राहील. जर प्रत्येक माणसाने जगातील, धनसंपत्ती व वैभवालाच आपले लक्ष्य बनविले की जेव्हा या गोष्टी जगात मर्यादित प्रमाणात असतात, तर हे स्पष्ट आहे की प्रत्येकाच्या हिश्यात समान रूपाने धन व वैभव येऊ शकणार नाही. याचा परिणाम असा होईल की समाजात असंतोष उचल खाईल आणि याला कोणत्याही प्रकारे स्वस्थ समाजाचे लक्षण म्हणता येणार नाही. परंतु समाजातील लोक जर परलोकातील जीवनावर विश्वास ठेवीत असतील तर असे घडणार नाही. अशा समाजात एकीकडे तर धनवान लोक गरीब व दीन-दु:खी लोकांवर आपली सपत्ती खर्च करतील आणि दुसरीकडे परलोकाला प्राधान्य दिल्यामुळे सामान्य लोकांच्या मनात संपत्तीसाठी ईर्ष्या व द्वेष भावना उत्पन्न होणार नाही. पवित्र कुरआनमध्ये केलेले चित्रण पाहण्याजोगे आहे,

**"एके दिवशी तो आपल्या लोकांच्यासमोर दिमाखात निघाला, जे लोक ऐहिक जीवनाचे इच्छुक होते ते त्याला पाहून म्हणू लागले, "आम्हालासुद्धा ते सर्वकाही मिळाले असते जे कारूनला दिले गेले आहे, हा तर मोठा भाग्यवान आहे." परंतु जे लोक ज्ञान बाळगणारे होते ते म्हणू लागले, "खेद आहे तुमच्या स्थितीवर, अल्लाहचा मोबदला उत्तम आहे त्या माणसासाठी जो श्रद्धा ठेवील आणि सत्कृत्ये करील आणि ही संपत्ती संयम बाळगणाऱ्यांनाच प्राप्त होते."**
-२८:७९-८०

(२) परलोकाला मानणारे कदापि निराशाग्रस्त होत नाहीत. एकीकडे त्यांना अल्लाहवर पूर्ण विश्वास असतो तर दुसरीकडे त्यांच्या दृष्टीत पारलौकिक जीवन असते. जगाच्या त्रास व संकटांना ते इतके महत्त्व देत नाहीत की त्यांनी निराशाग्रस्त व्हावे. मोठ्यात मोठे संकट आणि कष्ट सहन करण्याचे सामर्थ्य त्यांना प्राप्त होते. ते कदापि कर्तव्यमार्गापासून विचलित होत नाहीत. त्यांच्यात परलोकाच्या विश्वासाची ती शक्ती असते की ज्यामुळे ते प्रत्येक आपत्ती व संकटाला तोंड देतात आणि आपली जबाबदारी पूर्ण करण्यात मग्न राहतात. पवित्र कुरआनमध्ये आहे की जेव्हा जादुगारांनी प्रेषित मूसा (अ.) यांच्या पालनकर्त्यावर श्रद्धा बाळगली आणि सत्यधर्माचा स्वीकार केला तेव्हा अत्याचारी सम्राट फिरऔनला ही गोष्ट फार वाईट वाटली. त्याने धमकी देऊन सांगितले,

**"फिरऔनने सांगितले, "मी तुम्हाला परवानगी देण्यापूर्वी तुम्ही त्यांच्यावर श्रद्धा ठेवली? निश्चितच हा एखादा गुप्त कट होता जो तुम्ही या राजधानीत केला जेणेकरून त्याच्या स्वामींना सत्ताभ्रष्ट करावे. बरे तर याचा परिणाम आता तुम्हाला माहीत होईल. मी तुमचे हात पाय उलट बाजूंनी तोडीन त्यानंतर तुम्हा सर्वांना सुळावर चढवीन." त्यांनी उत्तर दिले, "कोणत्याही परिस्थितीत आम्हाला आमच्या पालनकर्त्याकडेच परतावयाचे आहे."** -७:१२३-१२५

हीच परलोकावरील विश्वासाची शक्ती होती की जादुगार अजिबात घाबरले नाहीत आणि आपल्या जागी अटळ राहिले.

(३) परलोकावर खरा विश्वास ठेवणारा कधीही धैर्यहीन व निष्क्रिय असू शकत नाही. तो सदैव कर्मक्षेत्रात आपल्या कर्तव्याच्या पालनात निमग्न राहील. तो जाणतो की परलोकातील साफल्य यावर अवलंबून असते की जगात बिघाडाऐवजी समेट करावा. अशांतीच्या ऐवजी शांतीची भूमिका वठवावी, धरतीला दुराचारापासून मुक्त करावे. निर्बल व असहाय्य लोकांच्या उपयोगी पडावे आणि अत्याचाऱ्यांना अत्याचार करण्यास मज्जाव करावा व त्यांना सरळ मार्गावर आणावे व त्यांना ईश्वराचे आज्ञाधारक सेवक बनविण्याचा

प्रयत्न करावा. म्हणून त्यांचे प्रयत्न विनाश व दुराचारास जन्म देणारे नाहीत तर त्यांचे प्रयास सुधारणा व निर्माणात्मक कार्यासाठी असतील.

लौकिक जीवनालाच सर्वस्व मानणारे लोक तर सांसारिक सुख व धन संपत्ती प्राप्त करून संतुष्ट असू शकतात व त्यांच्यात शिथिलता व अकर्मण्यता येऊ शकते, परंतु परलोकावर ईमान आणणारा मनुष्य जाणतो की आम्ही अद्याप मार्गावरच आहोत. अद्याप गंतव्यापर्यंत पोहचलो नाही. म्हणून तो कार्यात तल्लीन होईल. मग त्याला असेही वाटते की तो जगात सत्यासाठी जितके जास्त कार्य करू शकेल त्यानुसार परलोकात त्याला उच्च स्थान मिळू शकेल. म्हणून तो मोठ्यात मोठे कार्य करूनसुद्धा शांत बसणार नाही, तर असेच म्हणेल की अजूनसुद्धा करण्यासाठी बरेच काही उरले आहे. ईश्वराची सेवा व दासतेचा हक्क आता आम्ही कोठे अदा करू शकलो आहोत. पवित्र कुरआन अशाच लोकांच्या बाबतीत म्हणतो,

**''हेच लोक आहेत जे सत्कर्माची घाई करतात आणि त्या सत्कर्मासाठी अग्रेसर राहतात.''** -२३:६१

(४) परलोकाला मानणारा व पारलौकिक जीवनावर विश्वास ठेवणारा आपली वेळ व संपत्ती खर्च करू शकतो. इतकेच नव्हे तर आवश्यक वाटल्यास आपले प्राणसुद्धा अर्पण करू शकतो आणि कोणत्याही लौकिक मोबदल्याविना तो असे करू शकतो. माननीय उस्मान (रजि.) यांनी दुष्काळ पडलेला असता आपल्याजवळ असलेले सर्व धान्य विनामूल्य लोकांना वाटून टाकले, वास्तविकत: अशाप्रसंगी सामान्यत: व्यापारी मंडळी जास्तीत जास्त किंमत लावून लाभ उचलण्याचा प्रयत्न करतात. माननीय खुबैब (रजि.) यांना सुळावर दिले जात असता त्यांच्या तोंडून जर कोणते शब्द निघाले तर ते असे,

''जर मी अल्लाहच्या मार्गात जीव देत आहे तर मला याची काय पर्वा की मी कोणत्या कुशीवर पडतो.''

प्रेषित मुहम्मद (स.) यांचे एक सोबती खजूर खात होते. त्यांनी खजूर फेकून दिले आणि युद्धाच्या मैदानात उडी घेतली. त्यांना हे सहन झाले नाही की त्यांनी तर खजूर खात राहावे आणि अल्लाहच्या मार्गात प्राणार्पण करून स्वर्गात जाण्यास त्यांना विलंब व्हावा. त्यांना माहीत होते की त्यांनी अल्लाहशी जो सौदा केलेला आहे तो तोट्याचा नाही,

**''अल्लाहने ईमानधारकांकडून स्वत: त्यांना व त्यांच्या मालमत्तेला स्वर्गाच्या मोबदल्यात खरीदिले आहे. ते अल्लाहच्या मार्गात लढतात आणि मारतात व**

**मरतात.''** -९:१११

(५) परलोकाला मानणारा सत्यानुगामी असतो. कोणतीही गोष्ट त्याला सत्यापासून विचलित करू शकत नाही,

**''तुम्हाला असे कधीही आढळणार नाही की जे लोक अल्लाह आणि मरणोत्तर जीवनावर श्रद्धा ठेवणारे आहेत ते त्या लोकांवर प्रेम करीत असतील ज्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला आहे, मग ते त्यांचे वडील असोत अथवा त्यांचे पुत्र, किंवा त्यांचे भाऊ अथवा त्यांची कुटुंबीय मंडळी, हे ते लोक होत ज्यांच्या हृदयात अल्लाहने श्रद्धा दृढ केली आहे आणि आपल्याकडून एक आत्मा प्रदान करून त्यांना शक्ती प्रदान केली आहे. तो त्यांना अशा स्वर्गामध्ये दाखल करील ज्यांच्याखालून कालवे वाहत असतील. त्यांच्यात ते सदैव राहतील. अल्लाह त्यांच्यावर प्रसन्न झाला आणि ते अल्लाहशी खुश झाले. ते अल्लाहच्या पार्टीचे लोक आहेत. सावधान, अल्लाहच्या पार्टीचेच लोक सफलता प्राप्त करणारे आहेत.''** -५८:२२

(६) पारलौकिक जीवाचा स्वीकार केल्यानंतर हानी-लाभ, सफलता-विफलतेचा मानदंड बदलतो. ज्याला लोक हानी व तोटा समजतात त्याला तो मनुष्य साफल्य व प्राप्ती समजतो. ज्याला जग साफल्य व लाभ समजते तो त्याला नुकसानीची गोष्ट समजतो. त्याला स्वत: खाण्यापेक्षा दुसऱ्यांना जेवन देण्यात अधिक तृप्ती होते. स्वत: वस्त्र परिधान करण्यापेक्षा गरीबांना कपडे नेसविण्यात त्याला अधिक आनंद वाटतो. त्याला कल्पना आहे की तो जे काही सत्कार्यासाठी खर्च करीत आहे ते वास्तविकत: तो भविष्यासाठी जमा करीत आहे. मार्गात संपत्ती नष्ट करण्याऐवजी तो आपल्या वास्तविक गंतव्यासाठी सुरक्षित करीत आहे. पवित्र कुरआनची ही शिकवण त्याच्या लक्षात असते,

**''हे लोकहो ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, अल्लाहच्या कोपाचे भय बाळगा आणि प्रत्येक इसमाने हे पाहावे की त्याने उद्यासाठी काय सरंजाम केला आहे. अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगत राहा. अल्लाह खचितच तुमच्या त्या सर्व कृत्यांची खबर राखणारा आहे जी तुम्ही करता.''** -५९:१८

(७) परलोकाचा स्वीकार केल्यानंतर सन्मान व अपमानाच्या मापदंडातसुद्धा परिवर्तन होते. मग तर माणसाच्या दृष्टीने प्रतिष्ठित व आदरणीय तोच असतो जो अल्लाहच्या दृष्टीने प्रतिष्ठित असेल. ज्याला परलोकात सन्मान प्राप्त होणार असेल. मग जग त्याचा आदर करो किंवा निरादर करो. तो गरीब व मोतादांची उपेक्षा करणे शक्य

नाही. त्याची दृष्टी जगावर नसते तर परलोकावर असते. त्याला माहीत असते की अल्लाह संपत्ती व रूप पाहत नाही तर तो हृदय पाहतो. पवित्र कुरआनने स्पष्ट शब्दांत सांगितले आहे,

**''अल्लाहच्या दृष्टीने तर तुमच्यापैकी सर्वांत अधिक प्रतिष्ठित तो आहे जो तुमच्यापैकी सर्वांत अधिक (अल्लाहचे) भय बाळगतो.''** (-४९:१३

**''आणि प्रतिष्ठा तर अल्लाहसाठीच व त्याच्या प्रेषितासाठी आहे आणि श्रद्धावंतांसाठी, परंतु कपटी लोक अनभिज्ञ आहेत.''** -६३:८

(८) आखिरतवर विश्वास ठेवणारा चरित्रवान असतो. त्याचे चरित्र असे नसते की ज्याला वाटेल तिकडे वळवावे अथवा त्यात संकल्प व चरित्राची दृढता असू नये. त्याचे चरित्र दुर्बळ व अस्थिर असत नाही. त्याच्या चरित्रबळावर विश्वास ठेवणे शक्य आहे. पारलौकिक जीवनाची धारणा एक स्थायी व शाश्वत मूल्याच्या रूपात त्याच्या जीवनाची मेरुदंड असते. ही गोष्ट त्याला चरित्रबळ प्रदान करते. त्याच्या जीवनात कोणत्याही प्रकारचे द्वंद्वात्मक तत्त्व आढळत नाहीत. असे घडत नाही की त्याचे जीनन परस्परविरोधी गोष्टींनी युक्त असावे आणि तो तुच्छ इच्छा व वासनांच्या वशीभूत झालेला असावा. ही गोष्ट शक्य नाही की नैतिकतेची मागणी व सामाजिक मर्यादेची अपेक्षा काहीतरी असावी आणि त्याची लोलुपता मात्र त्याला अन्य दिशेकडे ओढून नेत असावी आणि तो कधी इकडे तर कधी तिकडे झुकत असावा. जरी चरित्र नव्हे तर याची शक्यता तरी असते की माणसाकडून कधीतरी एखादे पुण्य कार्य व्हावे, परंतु त्याचे मन अपराधीच राहील. पुण्य कर्म अथवा चांगुलपणा व्यक्तित्व किंवा चरित्राचे द्योतक असणार नाही. जेव्हा त्याला संधी मिळेल तेव्हा तो दुराचारापासून अलिप्त राहू शकणार नाही. तो तूप, लोणी, दूध, तेल वगैरेमध्ये भेसळ करू शकतो. त्यात असा पदार्थ मिसळू शकतो जो आरोग्यासाठी हानिकारक असेल. आश्चर्याची गोष्ट तर अशी आहे की औषधातसुद्धा तो भेसळ करू शकतो, की ज्यामुळे रोगी रोगातून मुक्त होण्याऐवजी तो जीवनातूनच मुक्त व्हायचा. जर परलोकावर विश्वास नसेल तर मनुष्य जे काही अपराध करील ते कमीच आहेत.

जोपर्यंत मनुष्य आंतरिक द्वंद्वापासून मुक्त होत नाही, त्याच्या इच्छा शुभ व स्थायी नसतील आणि त्याच्या भावना कर्मांमध्ये एकरसता व सामंजस्य आढळत नाही तोपर्यंत तो आपल्या इच्छा व बाह्य प्रभावांच्या हातचे खेळणे असतो. त्याच्या जीवनाचा प्रत्येक श्वास संयोगाच्या पडद्याआड लपलेला असतो. कोणत्याही क्षणी त्याची नीती बदलू शकते. सामान्यपणे समझोते व करारासंबंधी आमची अशी समजूत आहे की त्यांच्यामुळे समाजातील प्रत्येक व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीशी जोडली जाते. वस्तुस्थिती अशी आहे की

खऱ्या अर्थाने हे तेव्हाच शक्य आहे की जेव्हा समाजातील प्रत्येक व्यक्ती सर्वप्रथम स्वत: आपल्याशी जुडलेली असावी. त्याच स्थितीत ही आशा केली जाऊ शकते की जेव्हा ती एखाद्या कराराच्या अंतर्गत एखाद्या अन्य व्यक्तीशी संबंध स्थापित करील तेव्हा तो विश्वसनीय संबंध असेल.

(९) परलोकाला मानणारा मनुष्य जीवनाला त्याच्या संपूर्णता व साकल्याच्या दृष्टीने पाहतो. त्याचे जीवन आपल्या समग्रतेशी संबद्ध होते. तो जीवनाच्या खंडित रूपाच्या पाठमागे धावत नाही. त्याच्या दृष्टीसमोर वैयक्तिकतेपासून त्याचे सामाजिक स्वरूपसुद्धा असते. यापुढे जाऊन तो जीवन परलोकापर्यंत विस्तारलेले असल्याचे पाहतो आणि परलोकाला जीवनाची अंतिम व श्रेष्ठतम संभावना मानतो. त्याला याची कल्पना असते की वास्तविकतेच्या दृष्टीने परलोकच ते यथार्थ आहे ज्याचे वर्तमान लोक केवळ प्रतिबिंब आहे. समग्रतेच्या प्राप्तीसाठी आवश्यक आहे की मानवाने परलोकासाठी जिवंत राहावे आणि परलोकासाठीच मरावे. तो स्वत:ला परलोकाच्या दिशेत ठेवतो जेणेकरून जीवन खंडित होऊ नये. कारण साफल्याचे केवळ तेच साधन आहे. म्हणून स्वभावत: त्याच्या दृष्टीत कोणत्याही प्रकारचा संकोच आणि संकीर्णता शिल्लक राहत नाही. त्याचे हृदय विशाल बनते आणि त्याला धैर्य व सहनशीलतेसारखी शक्ती प्राप्त होते जी चरित्राचा वास्तविकत: आत्मा आहे. त्यात सर्वच नैतिक गुण आपोआप येतात. जीवनाची समग्रता पारलौकिक जीवन आहे. जे लोक त्यासाठी एकाग्र झाले, ज्यांनी त्याला गंतव्य मानले तेच सफल झाले. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**''आणि आमचे दास इब्राहीम (अ.), इसहाक (अ.) व याकूब (अ.) यांचे वर्णन करा, प्रचंड कार्यशक्ती बाळगणारे आणि द्रष्टे लोक होते. आम्ही त्यांना निव्वळ एका गुणवैशिष्ट्याच्या आधारावर निवडले होते आणि ते परलोकाच्या घराचे स्मरण करणारे होते.''** -३८:४५-४६

(१०) परलोकाला मानणाऱ्या माणसात शौर्य व निर्भयतेचे गुणसुद्धा असतात. जर तो कुणाला भीत असेल तर केवळ एका अल्लाहला भितो. ईश्वराच्या भयामुळे दुसरे सर्व प्रकारचे भय त्याच्या हृदयात निघून जातात. ईश्वरासमोर दुसरे सर्वजण त्याला निर्बळ दिसू लागतात. त्याला माहीत असते की त्याचा मामला वास्तविकत: ईश्वराशी आहे. त्याच्याकडेच परत जावयाचे आहे. मग अन्य कोणाची भीती कसली? याशिवाय तो असेही समजतो की परलोकाचे जीवन ईश्वराच्या हातात आहे. ते कोणी हिसकावून घेऊ शकत नाही, मग त्याला भीती कोणत्या गोष्टीची बरे? ही निर्भयता त्याच्या वीरतेचे सूत्रपात करते, ज्याची कशाशी तुलना अशक्य आहे.

याच वीरता व निर्भयतेमुळे त्याला असा आत्मसन्मान प्राप्त होतो की तो कोणासमोरदेखील हीन भाव प्रकट करीत नाही. हीन भावना त्याच्यातून मुळासकट निघून जाते. त्याला उच्च भावना आणि विचारांची जी संपत्ती प्राप्त होते त्यामुळे मोठमोठाले धनवान व विश्वप्रसिद्ध व्यक्तित्वसुद्धा त्याच्या दृष्टीने कमकुवत ठरतात. त्याला कल्पना आहे की जो जीवनाच्या रहस्यापासून अनभिज्ञ आहे आणि ऐहिक जीवनालाच सर्वकाही समजतो आणि त्याच्यासाठीच प्रयत्नशील असतो त्याची दशा तर अत्यंत दयनीय आहे. त्याच्या तुलनेत स्वत:ला हीन समजण्याचे काहीही कारण नाही. तो सर्वांपासून बेपर्वा असतो आणि स्वत: संतुष्ट असतो. त्याला कशाचा लोभही असत नाही आणि कोणतीही आशा नसते. एका ईश्वराकडून असलेली त्याची आशा दुसऱ्या सर्व प्रकारच्या आशांपासून त्याला मुक्त करते. तो खोट्या आशेच्या आधारे जिवंत राहत नाही. परंतु हा संतोष ही निर्भयता आणि ही आत्म-सन्मानाची भावना त्याला गर्विष्ठ बनवीत नाही. ईश्वराच्या महानतेचे ज्ञान व त्याच्यासमोर आपल्या निर्बलतेची अनुभूती त्याच्यात जे गुण निर्माण करते तो अहंकार नसून विनम्रता आहे. तो गुण गर्व व क्रूरता नसून विनय, दया आणि प्रेम आहे. या संबंधाने पवित्र कुरआनमधील या आयती दर्शनीय आहेत,

**''आणि अल्लाहचे भय बाळगा, हे समजून घ्या की तुम्हाला त्याच्याशी भेटावयाचे आहे, आणि श्रद्धा बाळगणाऱ्यांना शुभवार्ता द्या.''** -२:२२३

**''आणि अल्लाहचे भय बाळगा आणि समजून घ्या की तुम्ही त्याच्याच सेवेत एकत्रित केले जाल.''** -२:२०३

परलोक तर अल्लाहची भेट आहे, त्याच्या सेवेत उपस्थित व्हावयाचे आहे. त्याची मुलाखत घ्यावयाची आहे, मग परलोकाला मानणाऱ्याची दुनिया का बरे मधुर व व्यापक होणार नाही! शिवाय त्याने अल्लाहला सोडून इतरांची भीती बाळगण्याची काय गरज आहे? त्याच्यात हीनतेची भावना का उत्पन्न होईल? तो तर ईश्वराशी, जो आनंदमय व दयावान आहे, आपला संपर्क साधून आहे, त्याच्या दातृत्वाशी कोण स्पर्धा करू शकेल?

**''जे लोक अल्लाहच्या मार्गात ठार झाले त्यांना मृत समजू नका, ते तर खरे पाहता जिवंत आहेत, आपल्या पालनकर्त्यापाशी उपजीविका प्राप्त करीत आहेत, जे काही अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले आहे त्यावर ते फार खूश आहेत, आणि समाधानी आहेत जे श्रद्धावंत त्यांच्या पाठीमागे जगात राहिले आहेत आणि अद्याप तेथे पोहचलेले नाहीत, त्यांच्यासाठीदेखील कोणत्याही भयाचे अथवा दु:खाचे कारण नाही.''** -३:१६९-१७०

यावरून हे ज्ञात झाले की अल्लाहसाठी प्राणार्पण करणारे मेल्यानंतर आणि आखिरतपूर्वीसुद्धा अशा स्थितीत असतात की ते मेले आहेत असे म्हणणे शक्य नाही. ते जिवंत असतात. जीवन त्यांच्यापासून हिरावून घेतले जात नाही. जीवनाचे तर शरीरापासून एक वेगळे असे स्वतंत्र अस्तित्व आहे. शरीर वेगळे झाल्याने जीवन नष्ट होत नाही. ईश्वरी मार्गावर चालणारे जगाच्या परिभाषेत जरी मेलेले असले तरी त्यांना तर अमरत्व प्राप्त होते, ते मरूनसुद्धा केवळ जिवंतच राहतात असे नव्हे तर त्यांना ईश्वराकडून अनुकूल आहारसुद्धा मिळत् रांहतो. अल्लाहने त्यांना ते सर्वकाही दिलेले आहे की ज्यामुळे ते आनंदोत्सव साजरा करीत राहतात. त्यांना आपल्या त्या मित्र व बंधुंच्या संबंधीसुद्धा शुभवार्ता पोहचत राहतात, जे त्यांच्या पाठीमागे जगात राहिलेले असतात. त्यांना परलोकामध्ये ज्या दुर्लभ गोष्टी व सन्मान प्राप्त होईल ते वेगळेच आहे. या गोष्टी तर त्याला मृत्युनंतर ताबडतोब प्राप्त होतात.

जर वस्तुस्थिती अशी असेल आणि माणसाला याची खात्रीसुद्धा असेल तर आपण स्वत: अनुमान लावू शकता की त्याची मन:स्थिती कशी असेल? तो मृत्युच्या भीतीने सन्मार्गावर चालावयाचे सोडून देईल काय? त्याला जगाचा लोभ राहू शकेल काय? त्याच्यात वीरतेचे अंकुर फुटणार नाहीत काय? त्याच्यात औदार्य, धैर्य व सहनशीलतेने गुण उत्पन्न होणार नाहीत काय? तो आत्मगौरव व स्वाभिमानाचे प्रतीक बनणार नाही काय? पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"ही संपत्ती व मुलगे सांसारिक जीवनाची शोभा आहेत आणि उरून राहणारी पुण्येच तुझ्या पालनकर्त्याच्या दृष्टीत फळाच्या दृष्टीने उत्तम आहेत."**

-१८:४६

आता आपण स्वत: विचार करू शकता की जर एखाद्याच्या ही गोष्ट लक्षात आली की जिचा उल्लेख या आयतीत झाला आहे तर तो काय असे समजणार नाही की धन, संपत्ती आणि माणसाची खरी कमाई तर पुण्ये व सत्कार्ये आहेत? मनुष्य आपली रक्कम लावून आपल्या व्यवसाय व व्यापारात नफ्याची आशा करतो मग त्याने जास्तीत जास्त पुण्ये व सत्कार्ये करून त्या सर्वोत्तमाची आशा का करू नये की ज्याची सूचना त्याचा प्रभु त्याला देत आहे? तो पुण्याच्या दृष्टीने पुढे असणार नाही काय? त्याचा लोकांशी व्यवहार चांगुलपणा व सहृदयतेचा बनणार नाही काय? तो दया करण्यात व प्रेमभाव दर्शविण्यात पाठीमागे पडू शकतो काय? त्याच्यात दातृत्व व सहिष्णुता आढळणार नाही काय? तो जगासाठी प्रकाशस्तंभ व मार्गदर्शक ठरणार नाही काय?

(११) पारलौकिक जीवनाचा स्वीकार करणारा मनुष्यसुद्धा मनुष्यच असतो.

त्याच्याकडून चूकभूल होणे शक्य आहे; परंतु कुमार्गावर तो जास्त वेळ टिकून राहत नाही. तो लवकरच सावध होतो आणि प्रायश्चित्त करतो व नुकसानभरपाई करण्याचा प्रयत्न करतो. असले लोक अत्यंत भाग्यवान होत. त्यांच्यावर अल्लाहची अपार कृपा व दया राहील. पवित्र कुरआनमध्ये आहे,

**"त्या मार्गावर धावत चला जो तुमच्या पालनकर्त्याची क्षमा व त्याच्या स्वर्गाकडे जातो ज्याचा विस्तार पृथ्वी व आकाशासमान आहे, आणि तो त्या ईशपरायण लोकांसाठी तयार केला गेला आहे. जे कोणत्याही स्थितीत आपली संपत्ती खर्च करतात, मग ते बिकट स्थितीत असोत अथवा चांगल्या स्थितीत, जे राग गिळून टाकतात व दुसऱ्याचे अपराध माफ करतात – असे सदाचारी लोक अल्लाहला अतिशय प्रिय आहेत– आणि ज्यांची स्थिती अशी आहे की जर त्यांच्याकडून एखादे अश्लील कृत्य घडल्यास किंवा एखादा गुन्हा करून त्यांनी स्वतःवर अत्याचार केल्यास त्यांना लगेच अल्लाहचे स्मरण होते आणि ते त्याच्याकडे आपल्या अपराधांची क्षमा-याचना करतात – कारण अल्लाहशिवाय इतर कोण आहे जो अपराध माफ करू शकतो– आणि ते समजूनउमजून आपल्या कर्मावर अडून बसत नाहीत."** -३:१३३-१३५

**"(हे पैगंबर (स.)) सांगून टाका की हे माझ्या दासांनो, ज्यांनी आपल्या स्वतःशीच आगळीक केली आहे, अल्लाहच्या कृपेकडून निराश होऊ नका, निश्चितच अल्लाह सर्व गुन्हे माफ करून टाकतो, तो तर क्षमाशील परमकृपाळू आहे."** -३९:५३

याचा अर्थ असा आहे की माणसाकडून चूक होऊ शकते परंतु अल्लाह व परलोकावर श्रद्धा बाळगणारे आपल्या चुकीवर अडून बसत नाहीत. एकीकडे ते जास्तीत जास्त सत्कर्म करतात आणि दुसरीकडे जर त्यांच्याकडून एखादा गुन्हा झाला तर ताबडतोब त्यांना अल्लाहचे स्मरण होते. ते त्याच्याकडे आपल्या पापांची व चुकांबद्दल क्षमेची प्रार्थना करतात. ईश्वरदेखील त्यांच्यावर दया दाखवितो आणि त्यांना क्षमा करतो. अशा प्रकारे अल्लाह आणि परलोकावर विश्वास ठेवणाऱ्यासाठी कोणत्याही परिस्थितीत निराशेची शक्यता राहत नाही. कधी ते ठेच लागून पडतात तर लगेच उठतातसुद्धा. हे मोठे वैशिष्ट्य आहे जे त्यांना प्राप्त होते. ते ईश्वराची क्षमाशीलता व दयाळूपणावर पूर्ण विश्वास ठेवतात.

हेसुद्धा कळले की जन्नत अथवा स्वर्गाचा मार्ग मानव-समाजापासून वेगळा होऊन जात नाही की जेणेकरून असे म्हणता यावे की परलोकाला मानण्याचा अर्थ असा आहे

की मनुष्याने सांसारिक व सामाजिक जबाबदाऱ्यांकडून तोंड फिरवून सर्वांपासून वेगळे राहावे आणि मानव-समाजासंबंधीच्या जबाबदाऱ्या विसरून जाव्यात अथवा त्या जबाबदाऱ्या त्या लोकांवर टाकाव्यात जे ईश्वरावर विश्वास ठेवीत नाहीत आणि पारलौकिक जीवनालासुद्धा मानीत नाहीत. कुरआनात म्हटले आहे,

**''आणि ज्यांची स्थिती अशी आहे की देतात जे काही देतात आणि हृदयाचा त्यांचा या विचाराने थरकांप होत असतो की आम्हाला आमच्या पालनकर्त्याकडे परतावयाचे आहे, तेच भल्या गोष्टीकडे धाव घेणारे आणि अहमहमिका करून त्यांना प्राप्त करणारे आहेत.''** -२३:६०-६१

परलोकाला मानणारे व त्याची चिंता करणाऱ्यांची स्थिती अशी असते की जिचे वर्णन या आयतीत केले गेले आहे. ते सत्कर्म करून अथवा कल्याणकारी कार्यात पुढाकार घेऊन संतुष्ट नसतात आणि कोणत्याही प्रकारचा अभिमान व अहंकार त्यांना वेढून टाकीत नाही; तर ते प्रत्येक स्थितीत भीत राहतात की न जाणो परलोकामध्ये आमचे सत्कर्म स्वीकृत होतात की नाही? असे लोक पवित्र आत्मा असण्यात काय बरे शंका असू शकेल?

शेवटी आमच्या वाचकांना आम्ही सांगू इच्छितो की परलोकाची समस्या खरे पाहता आमच्या जीवनाची समस्या आहे. म्हणून आमचे हे कर्तव्य आहे की आम्ही या विषयाचा गांभीर्याने विचार करावा आणि यासंबंधी आपले खरे मत निश्चित करावे आणि जीवनाला त्याचप्रमाणे बनविण्यासाठी प्रयत्नशील व्हावे. असे घडता कामा नये की वेळ निघून जावी आणि आम्ही साफल्यासाठी काहीही करू न शकावे.

--- o *समाप्त* o ---